# आत्मचरित्रातले काल्पनिक क्षण

## Touchy

## खंड : १

## कोल्हापूर : ट्रॅव्हलॉज

## (१९८७)

- श्रीधर तिळवे

# आरंभ

## कोल्हापुरी चप्पल

तिला मी पाहिलं प्रथम ते बापाच्या कष्टाळू पायात जाडजूड काळाचा भुगा जाताना करत करकर स्वत:च्या आवाजात पाऊल ठोकलं की शड्डू ठोकल्याचा आवाज यायचा आकाशातून आणि बापाची चाल अधिकच व्हायची दमदार

तिची ओळखच करून दिली बापानं जेव्हा मी धरला युरोपियन बुटांचा हट्टाहास. जमिनीवर आपटत बाप म्हणाला, "ही पावलांची स्वातंत्र्य चळवळ आहे जी बुटातून पावलांना मोकळं करते ही घालून चाल आणि मोकळी हवा घे"

तेव्हापासून मी तिला घालत हिंडतोय ह्या शहरातल्या तापलेल्या रस्त्यावरून माझ्या कोल्हापुरी काळजानं ती वाहतीये माझ्या पायापर्यंत करत तिचा रंग अधिकच लाल

तिचा गोंडा असा रक्तमुखी देखणा जणू सूर्यच कातड्यातला उधळतो गुलाल

ती ज्या कातड्यानं बनते ते कातडं लावतं बाईच्या कातड्यासारखी लपलेली तप्त ओढ.

वाटतं हिच्यात शिरायच म्हणजे बाईच्या कातड्यातच उतरायचं पाऊल नागवं ठेवून तिचा आल्हाद ठोकस्पर्श पाय ठेवताच येतो तळव्यात अलगद उमलून.

ती होत नाही सहजासहजी वश तिला घालून घालून करावं लागतं सैल. ती पायाला चावते अशी करवादून जशी तुक्याची बायको गेलेली कावून ती शिकवते पावलांना संत व्हायला मग संथ वाहत घेते स्वत:त सामावून.

पावसात ती होते भिजून जड इतकी की तिला डोक्यावर घ्यावं लागतं कधीकधी आश्चर्य म्हणजे पावसात तिला घालून चालताना ती स्वत:च्या आवाजाबरोबर काढते पाण्याचाही रपरप आवाज आणि पायांना त्यांच्या ताटात थोडीशी नदीची ओल वाढते

तिला तयार करताना उचंबळून येतो प्रेमळ हात रापी कातडं कापत जाताना होते मुलीला जन्म देणाऱ्या आईसारखी चोकस वादी शिवते संवादी तळ आणि हस्ती पाळू तिला मजबूत बनवताना गोळा करतात सोळा हत्तींच्या शहाणपणाचे बळ

ती एखाद्या चांगल्या संस्कार झालेल्या कुलीन मुलीसारखी चालून येते माझ्या घरात आणि तिचा बाप उचबंळतो, "राजा,मी पोरीसारखी बनवलीया तू बायकोसारखी सांभाळ" मीही मग कसलीही घासाघीसी न करता देतो माझा संपूर्ण खिसा आणि कपाळ

ती आजही एकाच जातीत तयार होते सर्वच जातीत फिरते तिला बनवणारा मात्र कंगाल संतापतो माझा जीव तापतच जातो ह्या भाडखाऊ व्यवस्थेत माझ्या श्वासाचा ताल ती माझ्यासाठी असते एका संपूर्ण संस्कृतिचा पाया इतरांसाठी मात्र खरेदी केलेला मजबूत माल

पायातली वहाण पायातच बरी म्हणणाऱ्यानां कळत नाहीत तिच्या काळजातले हुंदके ते तिच्या त्वचेवरच पायाची त्वचा आपटत चालत जातात मैलोमैल कोसो दूर मी आजही पाऊल ठेवताना प्रथम तिचा मुका घेतो तिचाही भरून येतो ऊर

मला धुळीची ॲलर्जी म्हणून धुळीला बाजूला सारत तर कधी उन्हाच्या चटक्यापासून मला वाचवत ती झेलते माझ्यासोबत माझ्या आयुष्याचा समग्र वनवास माझ्याही बोलण्यात येतो तिखट चामड्याचा कोल्हापुरी वास

आताशा कळत नाही तिला घालून मी चालतोय की मला घालून ती ह्या चामड्याच्या जगात कधी ती पायाखालून मला चालवत असते कधी मीच असतो बसून तिच्या पायात.

# पूर्वज

## मी

कुणास ठाऊक
किती पूर्वजांच्या जनुकांचे मनुके घेऊन
माझ्या जनुकांतून असा बेदम वाहतोय
कर्नाटक
गोवा
महाराष्ट्र
माझ्या आयडेयंटीचा हा द्राविडी प्राणायाम
कुठल्या कुठल्या आयामात
कुठले कुठले श्वास घेतोय
कुणास ठाऊक
माझ्या रक्तात किती लाल छटा आहेत
माझ्या डोक्यात किती दर्शनांच्या जटा आहेत
किती भाषांची गाणी भांगलतायत माझी जीभ माझ्या ओठात
माझ्या पोटात किती चवींची चावी आहे
मी आहे एक उडणारा पक्षी
जो शतकानुशतकं
झाडं बदलत
ह्या पृथ्वीवर उडतो आहे
आणि पृथ्वी
माझ्या सगळ्या पूर्वजांची आदिपूर्वज
मी केलेली प्रत्येक पूर्व अपूर्व करत
मी बसलेल्या प्रत्येक झाडामधून
माझ्या अभूतपूर्व रक्ताशी कॉन्टॅक्ट ठेवूनाय

## पंचगंगेच्या काठावरून नारळास

कोकणातल्या कुठल्या माडावरून तू कोसळला असशील
कुठल्या दुकानातून पडला असशील ह्या पाण्यात
कुठल्या देवापुढं तू ठेवला गेला असशील
कुठल्या नवसाचा तू असशील प्रसाद
कुठलीच ओळखीची खूण नाहीये तुझ्या देहावर
तू आलायस पंचगंगेच्या पाण्यातून
माझ्या पायाशी
जसा माझा बाप आला गोव्यातून ह्या शहरात
पाण्याच्या थपडा खाऊन खाऊन तुझे केस ओले झालेत
आणि निर्वासितासारखा तुझा चेहरा
दुःखाने गच्च आहे
तुला पाण्यात सोडावा
तर तू भटकत कुठे जाशील ह्याचा अंदाज नाही
आणि पाण्यावाहेर काढावा
तर हे शहर तुला फोडून
तुझ्या आतंल खोबरं खाऊन
तुला फस्त करणारच नाही ह्याची खात्री नाही
भटकंती की मरण
मी पुन्हा पुन्हा विचारतोय तुला तुझा चॉईस
आणि तू तुझ्या आयुष्याचा अख्खा नॉईज कवटीत पचवून
तुझी जीभ कापल्यासारखा
माझ्या हातात कसलाही काथ्याकूट न करता
त्रिकालाबाधितित सत्यासारखा बसलेला आहेस.

## पोर्तुगीज

राणीच्या डोळ्यातला तृष्णेचा डायमंड चमकला तर तोच घालून बोटात
तुम्ही आलात जहाजाच्या पावलांनी आवाज न करता पाण्यावर चालत
किनाऱ्यावर उतरलात ते तलवारीच्या हातांनी हव्यासाच्या श्वासांनी
फुफ्फुसातही सोनं असेल म्हणून नाचला आमच्या छाताड्यावर गोळ्यांनी
आमच्या छात्या खोलत
प्रथम सोललीत आमची भगवी त्वचा शोधलात तिच्या त्वचेखालचा सोनेरी
धूर
मग रक्ताचा लाल रंग काळवंडला जाईपर्यंत उभं केलत उन्हात आमचं रक्त
येशूच्या सक्तीच्या भक्तीत रंगत गेलं आमचंही अस्पृश्यतेचं लाल पान
आणि धक्क्यावर धक्के खात जहाजांचे आम्ही झालो आमच्याच
जमिनीत गुम
पळून आलो गोव्यातून ह्या महाराष्ट्रात चटक्यांचे सूत कातत
चालवत राहिलो चरखा
खजिन्यांनी हराम झालेले आमचे जीव गांधीवर चर्चा करत घेत
राहिले फेणीचा घुटका
तुम्ही निघून गेलात आल्या वाटेने कायमची तुमची पावले पाण्यात
उमटवून
आम्ही मात्र आमचा माग काढताना तुमच्याच पावलांचा घेत
राहिलो मुका
आता तुम्ही नाही फक्त आमच्या लढ्याचे आमच्या काळजात
फडफडते कागद
ज्यांच्या कागदी नावा ह्या कोल्हापूरातून सोडतोय मी अरबी समुद्रात
ज्यांना तुमची जहाजे अद्यापही करतायत गारद

## माझ्या बापाची एन्ट्री

माझा बाप प्रथम कोल्हापुरात उतरला तेव्हा
कपडे काढले
नंगा झाला
पंचगंगेच्या पाण्यात त्याने त्वचा स्वच्छ केली
मग अनवाणी पावलांनी त्याने अंबाबाई पाहिली
तिची लुगडी पाहिली
आणि मग स्वतःचा निर्वासितपणा
त्याने तिच्या कानात सांगितला
तो निर्वासितपणा टेंबलाईच्या डोंगरावर जाऊन आदळला
आणि त्याने ट्रेनमधून आलेले बापाचे सामान
घोड्यावर उतरवून घेतले
घोडा बापाच्या चित्रात शिरून रंगीत झाला
नाच नाच नाचला
पण त्याचे पैसे झाले नाहीत
घोडा मग नाण्यांच्या शोधात जेलसमोर आला
आणि बापासाठी नाण्यांचा आवाज सोडून
स्वतः मात्र आवाज न करता नाहिसा झाला
बापाला ऐकू आलाच त्याच्या तीक्ष्ण कानांनी
त्या नाण्यांचा आवाज
आणि सामानाच्या शोधात बाप बिंदू चौकात उतरला
आणि बिंदू चौकातच दूकान थाटून स्थायिक झाला
आजही माझ्या बापाला त्याचे सामान सापडलेले नाही
आणि घोडा जो नाहीसा झाला तो परतलेला नाही
आजही माझा बाप माझे केस घोड्याचे समजून कुरवाळतो
आणि माझ्या पाठीवर थाप ठोकतो
गेली कित्येक वर्षे मी ह्या शहरात
माझ्या बापाचे सामान शोधत
घोडदौड करतोय

# बालपण

## दसरा

सगळं कसं आनंदानं टाळ्या पिटतय
हा महाव्दार रोड
आनंदान सुस्त
प्रत्येक जण त्याला आपल्या पावलांनी गिळत
अंबाबाईला चाललाय
सगळं कसं मस्त हाय
हा दसरा चौक
आपट्याचा आपट बार आपटत
प्रत्येकाच्या काळजातल सोनं स्फोटतोय
आणि प्रत्येक सौभाग्यवती नजर
आपल्या अंगावरचा कोल्हापूरी साज
त्या स्फोटात मिरवत
सुर्य गुणगुणत चाललीये
सगळं कसं बेस हाय
हे खासबाग मैदान
लाल पुट्टी मारत
आव्हान देत उभंय
आणि प्रत्येक कोल्हापुरी फटका

आपल्या रंगीत मिश्या पिळत
स्वत:चे दण्ड ठोकत
त्वचेतून आरोळ्या मारतोय
सगळं कसं झ्याक हाय
हा भवानी मंडप
उधळतोय राजाभाऊच्या भेलमधून चर्चेचा भंडारा
आणि जोतिबाच्या नावानं टेंबलाईच्या नावान चांगभलं म्हणत
प्रत्येक मिसळ आयुष्याची दाही बोटं मोडत
प्रत्येकाची भाषा तिखट करतीये
सगळं कसं निरागस हाय
हे शहर
साठीची नाठी बुद्धी चालवत
प्रेमळ म्हाताऱ्यासारखं माझ्याशी साठमारी खेळतय
आणि मी उनाड नातवासारखा
त्याच्या श्वासाच्या थरथरणाऱ्या सुईतून
काळाचा आख्खा हत्ती पार करत
त्याच्या खांद्यावर बसून
शहरभर रूबाब मारत हिंडतोय.

## कलिंगड

किती सुखद होतं बालपण
जेव्हा वाटायचं
कलिंगडाची बी पोटात गेली की
कलिंगडाची वेल पोटातून उगवेल
मी तर नुस्ता कल्पनेतंच
पोटातून उगवलेली कलिंगड
पोटभर खायचो
बालपणी पोटापाण्याची चिंता
कधीच वाटायची नाही
वाटायच हाय काय नाही काय
पोटात बी घेतलं की झालीच पोटापाण्याची व्यवस्था
मग कधीतरी एकदा
मी हट्टानं कलिंगड सोडून
कलिंगडातल्या बियाच वेचून वेचून खाल्ल्या
आणि महिनाभर वाट पहात राहिलो
पण पोटातून कलिंगडाची वेल उगवलीच नाही
त्या दिवशी मला कळालं
माणूस जमीन नसतो म्हणून
मी जो तोवर जमिनीसारखा जगत होतो
त्या दिवशी माणूस झालो

## घर

टाईल्समधून उगवतय गवत
भिंती दिसायला लागलेत
हिमखंडाच्या तुकड्यासारख्या सफेद
छत बदलतय ढगासारखं
आकार आणि रंग
राजा
तुझ्या शरीराचं ह्या घरात काही खरं नाही गड्या
दरवाजा बदलायच्या आत पळ

## लाईट खांब

॥१॥
कधीपासून तेही आठवत नाहीत
पण एखाद्या प्रेमळ आजोबासारखे ते उभेच आहेत
दुतर्फा
रस्त्याच्या कडेला
पूर्वी ते पुरूषप्रधान होते
आणि फक्त बल्ब खपवून घ्यायचे
पण नंतर टयूब नावाची बाई आली
आणि तेही थोडे बांधेसूद झाले
पूर्वी सरकार त्यांच्या मूळाशी
सिमेंटचा गोल बांधायचं
आणि आम्ही मूलं त्या गोलावर बसून गोलगप्पा हाणायचो
पण पुढे सरकारला मुलांनी लाईटीखाली बसू नये असं वाटलं
आणि हे सिमेंटी गोल गायब झाले
लहानपणी त्यांच्यावर चढताना
मला नेहमीच आपण सूर्य गिळायला चाललोय
असा फील यायचा
आणि लाईटबॉक्सवर आरूढ होऊन खाली पाहिलं
की सगळं जग बुटकं आणि प्रकाशहिन वाटायचं
पुढे मी थोडा मोठा झालो
आणि एकदा चढल्यानंतर माझ्या वजनामुळं
लाईटबॉक्ससकट खाली आदळलो
खरतंर उंचीचा विचार करता मी मरायलाच हवा होतो
पण का कुणास ठाऊक पण थोडं खरचटून मी जिवंत राहिलो
मात्र आपण आता हलके राहिलो नाही
ही जाणीव मला वयात आणणारी होती
॥२॥
आता रस्त्यांवरून जाताना
दिवसा माझे लक्ष्य त्यांच्याकडे जात नाही
मात्र रात्र
त्यांच्याशिवाय असह्य वाटते
रात्री चन्द्र उधाणतो
आणि रस्त्ये वेड्यासारखे अपघातात बरळायला लागतात
तेव्हा विजेचे झटके देत
तेच ताळ्यावर ठेवतात
रस्त्याचं डोकं
त्यांच्यामुळेच रस्ते एकमेकांना जोडल्यासारखे वाटतात
आणि शहरातही झाडे दुतर्फा असल्याचा फील येतो
खरेतर त्यांना ना फळे येतात ना फुले ना पाने
पण त्यांच्यात असलेले दिवे त्यांना प्रेमळ बनवतात
आजही त्यांच्याखालून जाताना
त्यांचा प्रेमळ प्रकाश मी गृहीत धरतो
मात्र जाताना मी डोकं वर करून बघत नाही
त्यांच्या शेंड्यावर हलंकफुलंक बसलेलं माझे बालपण
माझ्या नजरेच्या वजनानं खाली कोसळेल
अशी मला भिती वाटते

## कबूतरखाना

क क कबूतर
कळण्याआधीच मी कबूतरं उडवली आझाद चौकातल्या
कबूतरखान्यामधून
कबूतर सर्वांचीच होती
कुणीही यावं
कुठलंही काढावं
कुठेही उडवावं
कबूतर उडायची ढगात मिसळायची वाऱ्यात मिसळायची
नदीवरून उडायची तळ्यावरून फिरायची
आणि आमच्याच कपाटात येऊन त्यांची उड्डाणं मिटवायची
त्यांच्या चोच्या आमच्याच वाढलेल्या पाण्यात बुडायच्या
पुढे थट्टी गल्लीत आल्यावरही ती उडायची थांबली नाहीत
आझाद चौकात शेजारी मन्दिर
तर थट्टी गल्लीत शेजारी देवमामा
देव त्यांच्या नशीबीही चुकला नव्हता
देवमामा असला की कबूतरं देवासकट उडायची
तो नसला की मात्र ती माणसासारखी
कपाटाच्या चौकोनी खान्यात टपायची
कबूतरं होती तेव्हा गल्ली एक असायची
सर्वांचीच सार्वजनीक मालकी !
मात्र पुढे कबूतरावरूनच प्रॉपर्टीसारखे वाद व्हायला लागले
आणि मी कबूतरांतून काढता पाय घेतला
मात्र तरीही ती उडायची थांबली नाहीत
आणि आजही ती उडतायत
फरक इतकाच की शाळेत असताना ती शांततेचं प्रतिक आहेत
हे माहीत नव्हतं
आणि आज कॉलेजात ते माहीत आहे
पूर्वी कबूतरं उडताना माझ्या डोळ्यात कबूतरच उडायची
आणि आज ती उडताना शांतता उडते
माझ्या गल्लीतून उडून जाणारी
परतणारी

## थट्टी गल्ली जिथे भूतं राहतात असा प्रवाद आहे

प्रत्येक खांब हातात टॉर्च घेऊन
आपापल्या प्रकाशाचा एरिया न्याहाळतोय
रस्ता वाकडातिकडा प्रत्येक उंबरठ्यावर
गल्लीतली थडगी पोहचवतोय
ह्या गल्लीत भूते राहतात ह्याची मोठ्या माणसांना खात्री
म्हणून मीही देवाचं नाव घेत
दबकत दबकत
जातोय
आसपास एवढी लोकं घरात बन्द
आणि मी मात्र मनोमन भुतांच्या गर्दीत
शरीरानं एकटा
झोकांड्या खात
माझ्या हातात पयल्यांदाच घेतलेली देशी दारूची बाटली
ती खाडकन गळून फुटतीये
आणि मी भुतांना आपलं दारू विरू पिणं आवडल बिवडल
नाही की काय
ह्या संशयाने दचकून
त्यांचा अदमास घेत
मला चढलेल्या नशेत चाललीये
गल्लीतल्या भूतांची पालखी
जन्मल्या पासून सतत ऐकलेली
आणि कुणीच कधी न पाहिलेली

## धडा : १

दंगा झाला तेव्हा
मी होतो एक कोवळा मुलगा
मीही फोडलीच एक सोडा वॉटरची बॉटल
आझाद चौकात
एक सोडा घटाघट प्यालो फुकटचा
मारूतीच्या देवळाआड
आणि मग रस्त्याभर पसरलेल्या काचांतून चालत
काहीतरी पराक्रम केल्याचा कोवळा कैफ अंगावर बाळगत
रक्तबंबाळ घरी परतलो
ह्या शहराने माझ्या हातात दिलेले पहिले शस्त्र
मग समज येईपर्यंत
ते मी फोडत राहिलो शहराच्या टाळक्यात
कैफ ओसरण्याची वाट पहात
ह्या शहराने माझ्या हातानां लावलेले ते पहिले चमत्कारिक वळण
आजही डोकावते माझ्या प्रवासात
अधूनमधून
अहिंसेचे घाट पार करताना

## बालपण

माझा मूलावर विश्वास नाही
देवाघरची फूल काय
देवाच्या प्रार्थना काय
केवळ असं कोवळं कोवळं म्हणून
मूल चांगली होतील काय?
ताजगी आणि कोवळीक
माझ्या बालपणात कधीच उगवली नाही
मी लहानपणीच पाहिला एक विलक्षण चक्रव्यूह
जो मला शिकवत होता खोटं बोलायला
ज्याने भरवले माझ्या कोवळ्या जीभेला दांभिकपणाचे घास
आणि माझे श्वास
तलवारीची धार वाजवतच
आयुष्य गायाला शिकले
मूलपणावरचा दारूण अविश्वास
मी सर्वत्र पाहिला
आणि कोवळिकीला मिश्या काढून
तिला विद्रूप करणारा हातही
जर मीच मूल म्हणून फूलासारखा नव्हतो
तर बालपणाच्या वसंतावर मी विश्वास ठेवावा काय?
माझ्या आत एक फूलपाखरू उडतय हे खरं
पण ते तुमच्या हातात सोपवण्यापेक्षा
माझ्या कवितेतच खेळवलेलं बरं
माझा मूलांवर विश्वास नाही
जो पर्यंत ती संत होत नाहीत
किंवा मी

## विद्याधर मामाचा खून

मामाला पाण्यात बुडवून
दोन खुनी हात
पळून गेलेत
पाण्यावर कसलेही ठसे नाहीत
रक्त स्तब्ध
बघे स्तब्ध
डोळे स्तब्ध
फक्त शांतता
आणि माझे बालपण
प्रेताच्या तरंगत्या तोंडावर बोट ठेवून
एकमेकात वाहतायत.

## आजोबा

रात्रीच्या झोपेतून माझे आजोबा
स्वप्नासारखे चाललेत
माझी आई उगवतीये
नेहमीसारखीच निरागसपणाचा प्रकाश वाटत उगवाई
माझी अपंग मावशी
दुपारमध्ये ठाम उभी आहे
तिच्या दु:खी डोळ्यातून अश्रूचं उन्ह वितळतय
माझी आजी
तिच्या त्वचेच्या सुरकुत्या
संध्याकाळच्या पाण्यात सोडतीये
कधीपासून माहीत नाही
पण माझं आजोळ आख्खी पृथ्वी ऑपरेट करतय
आणि काळ
माझ्या ह्या फॅमिलीचं कुळ शोधत
तिच्याबरोबर स्वत:चा टाईम पास करतोय

## खेळ

वड्डोरामागून टाकत वड्डेर
ह्या शहरातल्या कित्येक गल्ल्या
आम्ही घातल्या पालथ्या
गोट्यावर आपटत गोट्या
ठरवत हिन्नी आणि गंड
ह्या शहरातील कित्येक पत्ते आम्ही केले पाठ
चालत चालत
टायरीमागून पळवत टायरी
आम्ही शोषून घेतले आमच्या स्पंजाळू पायात
ह्या शहराचे कित्येक मैल
आता ना ते भटके खेळ उरलेत
ना आम्हा मित्रांची भटके खेळ खेळणारी जमात
आता हे शहर झालयं एक मोठं स्टेडीयम
जिथे माझे मित्रही दुरूनच पाहतात मॅच
एकत्र जाऊन
आणि खेळातला ह्युमन टच अनुभवतात
बसूनच
फक्त मीच असा
जो झालाय ह्या शहरातला एक भटका कवी
जो आजही
शब्दामागून टाकत शब्द
अद्याप ह्या शहरात हिंडतोच आहे
त्या वड्डेरांच्या शोधात
त्या गोट्याच्यां शोधात
त्या टायरींच्या शोधात
ज्या आम्ही निरागसपणे सोडल्या होत्या
लहानपणी ह्या शहरात

## शेवटची मारामारी न करताच पळून गेला जो क्षण

मित्र मरून पडलाय
सगळ्यांनाच कळून चुकलय
तो मेलाय
शिवाजी पेठ दबा धरून होती
शुक्रवार पेठ चाहूल घेत होती
मंगळवार पेठ शोध घेत होती
तरीही आम्ही
ह्या बुलेटवरून
मृत्यने लावलेल्या फिल्डींगमध्ये अंगोदर शिरलोच
निघतानाच पेट्रोल संपलं होतं
पण आम्ही ते बाटलीतून भरलं
पंपावर पोहचून पेट्रोल भरून घेताना
पैसे देताना नोट फाटली
पण आम्ही दूसरी नोट दिली
वाटेत एकाने भजी खाण्याचा आग्रह धरला
पण आम्ही मिसळच खाल्ली
मृत्यू प्रत्येक ठिकाणी आम्हाला चॉईस देत होता
आणि आम्ही त्याला नॉईज समजून
ह्या केऑसमध्ये बिनडोक शिरत होतो
मित्र मरून पडलाय
आणि मला आठवतोय
तो जिवंत होता आत्ताच माझ्यासोबत
तेव्हा मिसळ खातानाचा त्याचा चेहरा
माझ्या रक्तात भीतीची टीकटीक होतीये
माझ्या काळजात बर्फस्फोट क्षणभर
आपणही जाऊ ह्या विचाराचा
माझ्या ट्रॅप झालेल्या शर्टावरून
उन्मादाची तलवार फिरतीये
पण माझी मान अद्याप शाबूत आहे
माझा सावधान मणका अंदाज घेतोय बेभान धारेचा
मागं वळलो की मान गेली
बुलेट जिनं मृत्यूत पोहचवलय
माझी पळून जाण्याची फास्ट शक्यता गिळून
मोडून पडलीये
प्रत्येक घराचा उत्सूक दरवाजा करकरतोय कुतूहलात
प्रत्येक खिडकी जिज्ञासेच्या कोलाहलात करवादतीये
मित्राचा अंत पहात असलेली शांतता
माझ्या होऊ घातलेल्या अंताच्या शांततेला वाट देत
डास फडफडल्याचा त्वचेत आभास
हत्येचे हात मागं सरकतायत बहुधा
मान वळवावी?
नको मान वळली की कटली
तलवार फेकल्याचा घरंगळता आवाज - ठणाण ठण्ण ण
कदाचित् गळून पडलीये पश्चातापात

मित्र एकदम मरेल ह्याचा त्यालाही अंदाज नव्हता बहुधा
बूट
कोल्हापूरी चप्पल
एकएक नाहीसा होतोय
बहुधा स्वत:च केलेल्या हत्येला घाबरून
माझ्या प्रतिहल्ल्याचा अंदाज घेत
सुनसान शांततेत
सगंळ शून्यावर येतंय
जणू अंटारटिका फुटलाय
आणि वस्तीतला प्रत्येकजण त्यावेळी आईस्क्रीम खात होता
माझ्या आत
थर्मामीटर तडकल्याचा आवाज
एका बाईची बोंबझुरळी किंकाळी
जिची दिशा कळत नाहिये
माझ्या मेंदूतल्या कासवाला
निळा शर्ट माघार घेतोय स्वत:च केलेल्या धाडसातून
जीनची पॅन्ट साहसात थबकलीये पण गप्प
पळ
मी अफाट वेगानं सुंबाल्या करत
माझी तडक गांड पायाला तडका देत
मी मित्राला त्याच्या प्रेतात सोडून
मृत्यूकडे पाठ फिरवून
फक्त पळतोय
जीवनाच्या दिशेनं
जगण मूठीत घेऊन

## मित्रांनो

आपण मिशी येण्याची वाट पाहत होतो एकसाथ
पण तुम्ही मृत्यूत पिकत होता
आपण शिवाजी स्टेडीयमवर मैदान फुलवत होतो एकसाथ
आणि तुम्ही गवताबरोबर वाळत होता
आता ह्या दिवाळीला काळजात फटाके वाजतायत
तर त्यात तुमचा आवाजच नाही
दिवे जळतायत डोळ्यात
तर बुबुळात तुमचा चेहराच नाही
मित्रांनो का गेलात मला ह्या सडाफटींग शहरात
एकटं टाकून
का मारलीत मला न सांगता
आयुष्याच्या आझाद चौकातून कल्टी
कुठचं नाहिये तुमची पुट्टी
आणि मी आयुष्याशी कुस्ती खेळण्याच्या आधीच
आयुष्याला अडकून तुमच्यात तोण्डघशी पडलोय
माझ्या चेहऱ्यातून येतंय रक्त
आणि तुम्ही मात्र तुमच्या दोस्तीची हळद काढून घेऊन
दूर निघून गेलाय

# न्यू कॉलेज : ज्युनियर

## विद्यार्थी

सगळे
सगळले
सगळ्यात
सगळीकडून
सगळे
सगळीकडे

## इशारा

दोन आधिक दोन
चार होतातच असं नाही

## स्कायलॅब

स्कायलॅबला माहीत नाही
की ती कोसळणराय
तिला तिच्या नाकाबद्दल कॉन्फीडन्स आहे
आणि पृथ्वीच्या गुरूत्वाकर्षणाबद्दल विश्वास
ती फिरतीये
एखाद्या आईभवती एखाद्या अजाण मुलीनं
देवदासी होण्यापूर्वी फिरावं तशी
तिच्या यांत्रिक केसाच्या जटा झाल्यात
कुठलं तेल कुठलं स्क्रू मिस झालाय काही कळत नाहीये
फक्त तिचे डोके कोणत्याही क्षणी नादुरूस्त होऊ शकते
एवढं तिच्या आईला कळून चुकलय
खरतर तिला सूर्याभोवती फिरायला आवडल असतं
पण ती त्वचेसकट जळेल म्हणून तिची आईच
तीला सूर्याकडे फिरकू देत नाही
तिचा कंट्रोल नासातल्या तिच्या बापाकड आहे
आपण कोणत्याही क्षणी तिचं डोक मॅनेज करू शकतो
किंवा तिच्या जटा स्टॅटीस्टीक्समध्ये अचूक रचू शकतो
हा त्याचा आत्मविश्वास धुळीला मिळालाय
तो पाहतोय आपल्या कोवळ्या मुलीची धडपड
जी अजून वयातही आलेली नाही
त्याला ती वयात आलेली आवडली असती
पण ती वयात येणार नाही हे स्विकारून
तो तिच देवदासीसारखं कोसळणं
सहन करण्याची तयारी करतोय
स्कायलॅब फिरतीये
आणि शहरातले सगळे लोक तिच्या मृत्यूची बातमी वाचत
तिच्या मृत्यूखाली फिरतायत
स्कायलॅब फिरतीये
आणि तिच्या मृत्यूबद्दल ती सोडून प्रत्येकजण जाणतोय
प्रत्येकाला भिती आहे
ती आपल्याच डोक्यावर कोसळेल अशी
प्रत्येकजण नवस करतोय
बिरोबाला
अंबाबाईला
ज्योतिबाला
यल्लामाला
देवांपुढे तिच्या नावाने दिवे जळतायत
आणि देव आपल्या देवळात कनफ्युज आहेत
त्यांना आपला आणि स्कायलॅबचा काय संबंध ते कळत नाहीये
स्कायलॅब कोसळतीये
आणि तिला वाटतय ती एका मोठ्या जलतरण तलावात
स्विमिंगसाठी उतरतीये
तिचे कपडे गळतायत

आणि ती आपल्या मृत्यूचा फोटोग्राफ देत
समुद्रात उतरतीये
ती तिच्या जटासकट बुडतीये
आणि माणसे आपल्या शाबूत डोक्यावर हुश्श्यचे हात फिरवत
तिचे शेवटचे स्माईल हसत हसत पाहतायत

## अरूण सरनाईक गेले तो क्षण

अभिनयाचा मुख्यमंत्री निघून गेलाय
माझ्याच वर्गात शिकणारी त्यांची मुलगी सविता सरनाईक
आज तिचा बॉबकट झुलवत
आलेली नाही
तिचा अभाव कुणीतरी गेल्याचं दु:ख खर्जात लावतोय
आणि वर्गाला वर्गमूळ सापडत नाहियै
काळ लहरी महंमदासारखा चालून आला
आणि अभिनय करणारं प्यादं उचलून
घेऊन गेला
प्यादं जे कधीही वजीर बनण्याची क्षमता बाळगून होतं
फक्त रिकामी जागा सोडून
निघून गेलयं
ना कुणी चेक म्हंटल
ना कुणी मेट
तरीही डाव संपलाय
सिंहासन झालंय खाली
आणि तरीही त्यावर बसण्याचं धाडस कुणी करत नाहीये
कुणी त्याकडं नुस्तं पाहिलं
तरी वाघाची डरकाळी त्याला ऐकू येतीये
ज्याचे गळा आणि कान सशक्त आहेत
त्यानेच आता हा आवाज रिप्लेस करावा

### प्रेम : १

आंधळे प्रकाशाची वाट नाही पाहात
ते स्पर्शाची वाट पाहतात
म्हणून म्हणतो
''माझेही प्रेम आंधळे आहे''

### प्रेम : २

संभोग म्हणजे शरीराबाहेर आत्म्याने टाकलेले पाऊल
तेव्हा विचार कर
तू नर्तिका आहेस म्हणून सांगतोय
हे कुमारिके

### प्रेम : ३

मी चांगला मुलगा आहे
प्रेम करायला
माझ्या डोळ्यात प्राण देऊन तरी बघ
पुन्हा पुन्हा जन्मण्याची विद्या
तासाभरात शिकवेन

### प्रेम : ४

मी चालत येईन
तुझ्या बागशाही डोळ्यात जंगले पेटतील
मी थांबेन
तुझ्या त्वचेचा बर्फ वितळायला लागेल
मी मिठीत घेईन
माझ्या हातातून नवा वसंत सुरू होईल
मी तुला ओठात ओढेन
रक्ताची नदी स्पर्शाचे काठ गरम करायला लागेल

शेवटी मी होईन तुझ्यात नाहीसा
तेव्हा हा काळजाचा लालबुंद ससा
संपूर्ण विश्वाला ऐकू जाईल अशी डरकाळी फोडेल

### प्रेम : ५

मी प्रथम वयात आलो तेव्हा
विलक्षण झालो
झाडापाशी आलो
झाड झालो
पाण्यात शिरलो
पाणी झालो
शेतात घुसलो
शेत झालो
डोंगरावर गेलो
डोंगर झालो
मग थकून
पुन्हा तिच्या ओठापाशी आलो
ओठ झालो

## बारावीचा अभ्यास करताना

१.

अविनाश त्याचं डोकं स्वत:त खूपसून
अभ्यास करत बसलाय
त्याच्या मेंदूची पानं फडफडताहेत
अविनाश एक्झॅक्ट अविनाश सारखा आहे
आणि तरीही जेव्हा मी त्याला अभ्यास करताना पाहतो
तेव्हा तो अविनाशसारखा दिसत नाही
अविनाश म्हणतो
तू मला मी आहे तसा बघ
आणि अभ्यास कर
मी त्याला तो जसा आहे तसा माझ्या डोळ्यात उमटवतो
आणि तरीही अविनाश
जो माझा मित्र आहे
जो स्वत:चं डोकं स्वत:त खूपसून अभ्यास करत बसलाय
माझ्या डोळ्यात अविनाशसारखा उमटत नाहीये

२.

अमोल आख्खी गल्लीच माझ्या नजरेत खेळवतोय
खरंतर त्याचा वाडा आता जुनाट दिसायला लागलाय
तो कधीही मास्टरप्लानमध्ये जाईल
पण तरीही तो अभ्यास करतोय
त्याला उभी करायची मास्टरप्लाननंतर इमारत
जिच्या जिन्यावरून पैसे आणि स्टॅबिलीटी
पायऱ्यापायऱ्यांनी चढत येईल

३.

अभय एकेका मेटलमध्ये सेटल होत
करिअरचे गुणधर्म तपासतोय
त्याचे हात स्वत:चे दोन्ही डोळे
पुस्तकाला ठोकतायत

आणि त्यातून होणाऱ्या आवाजाचे परीक्षण करून
स्वत:चं करीअर जर्नलमध्ये उतरवतायत.

४.

तिघंही अभ्यास करतायत
अविनाशला मेडीकलला जायाचय
अमोल पीसीएम आणि पीसीबी दोन्हीत रेंगाळतोय
आणि अभय इंजिनीअरिंगमध्ये ठाम आहे
एक मीच आहे
ज्याला कुठं जायचं ते माहीत नाही
आणि जो आयुष्य जसं आहे तसं जगतोय
जसं आहे तसं न पाहता

५.

दामले त्याच्या नोटस दुकानात ठेवून निघून गेलाय
त्याचं डॉक्टर होणं निश्चित आहे
आणि मीही काहीतरी करावं असं त्याला निश्चित वाटतं
मी त्याच्या नोटस वाचूनही
काही निश्चित करत नाहिये
लॉ ऑफ अनसर्टनटी
मी चालत जाताना आवाज करत राहतो
आणि माझी पावलं त्याच्या तालावर नाचत
आख्खी सिटी अनिश्चित करून टाकतात

६.

किती अवघड असतं ध्येय निश्चित करणं
किती अवघड असतं आपल्या काळजाचा शोध लावून
आपलं सारं रक्त त्याच्या दिशेनं ड्राईव करणं
किती अवघड असतं आपला मेंदू प्रयोगशाळेत हाताळत
त्याला अॅडमिशनच्या दिशेनं हाकणं
अमोल अविनाश अभय राजू
माझे सगळेच मित्र कुशल ड्रायवर आहेत
आणि मला अजून मी कुठल्या गाडीत बसायचं
तेही माहीत नाही.

७.

पूर्वी निदान सूर्य माझी भाषा समजून घ्यायचा
पण मी अभ्यासाचं टाईमटेबलही नीट आखत नाही म्हणून
तोही नाराज होऊन
पाठ करून बसलाय
आणि चन्द्र तर माझ्यासाठी होता फक्त एक दगड
परप्रकाशित

८.

आळस जीभ काढत दाखवतोय मला वाकुल्या
त्याचं तोण्ड माझ्या चेहऱ्याचं परावर्तन आहे

९.

मी दगडावर बसून झालोय दगड
ज्याच्या हातात छिन्नी नाही त्याचे आणखी काय होणार ?

१०.

अभ्यासाला कुठून सुरवात करावी?
पहिल्या पानापासून?
शेवटच्या पानापासून?
मला तर अभ्यास जगासारखाच दिसतोय
आदिअंत नसलेला.

११.

मी मनात आणले तर माझे काहीही होऊ शकते
मायक्रोस्कोपीक फूल
मेकॅनिकल मध
नासाळू पूल
समुद्राचा हस्तसामुद्रिक
पण मला तर ह्या सगळ्यांचा ऑर्केस्ट्रा वाजवावा
असं वाटतय
बिनहातांचा

१२.

ह्या कनफ्यूज झालेल्या दुपारी
ह्या शहरात पडत नाहीये माझी सावली
ही पृथ्वी होऊन गेलीये माझ्यासाठी
एक चपटी डबी
आणि मी तिच्यात करत फुलापाखराचा स्टडी
एखाद्या सुरवंटासारखा हिंडतोय
मऊसूत काटेदार

१३.

प्रथम पहिला पेपर द्यायचा
मग दुसरा
मग तिसरा
परीक्षामागून द्यायच्या परीक्षा
परीक्षानळी व्हायचं
आणि एक दिवस त्वचा तडकेल तेव्हा
लॅबमध्ये ठिकऱ्या ठिकऱ्या व्हायचं

१४.

आपणच दिवा व्हायचं
म्हणजे आख्खं जग उजळून जातं
मी वंशाचा दिवा
की जगाचा दिवा
दिवे तरी कुठे कुठे आणि कसे लावायचे
मी वंशाचा दिवा
आणि वंशाचा जनेटीक खांब
शहरभराच्या कुत्र्यांनो
या
मुता
आणि निघून जा
नवी म्हण : कुत्र्यांच्या मूतानं खांबाचा दिवा विझत नाही

१५.

गोष्टी जश्या होत्या तश्या राहिलेल्या नाहीत
जग जसं होतं तसं राहिलेल नाही
मी जसा होतो....
मी कसा होतो
आणि कसा राहिलेलो नाही?

१६.

आयुष्यात अॅडमिशन शिवाय आहे काय?
प्रथम गर्भाशयात अॅडमिशन
मग घरातं अॅडमिशन नातेसंबधांत अॅडमिशन
मग शाळेत अॅडमिशन शेजाऱ्यात अॅडमिशन मित्रात अॅडमिशन
आणि आता कोर्समध्ये अॅडमिशन
आणि शेवटी मृत्यूमध्ये अॅडमिशन

सगळा खेळ अॅडमिशनचा
प्रत्येक क्षण अॅडमिशनचे मिशन
आणि तरीही मी बाहेर असा उभा
हा खेळ न खेळता
फक्त पाहतोय
माझ्या आसपास फक्त प्रवेशदारंच आहेत
कुठल्या ना कुठल्या बिल्डींगची

१७.
स्पर्धा करा
भांडा
झगडा
रॅटरेसमध्ये भाग घेऊन टॉपमोस्ट उंदीर व्हा

१८.
माणूस हाच विषय आहे माणसाचा
फिजिक्स केमिस्ट्री बॉयॉलॉजी मॅथ्स जॉमेट्री
सगळं माणसातच परततं
माणसातून निघून
मीही माणूस आहे म्हणून
विज्ञानात बसून
सायंटिफिकली माणूस पिंजतोय
पिंजण हा माझा जन्मसिध्द हक्क आहे
तरीही तो वापरून माझे कापड तयार होत नाहीये

१९.
कशापासून काय वेगळंच?
कशासारखं काय आहे?
सल्फ्युरिक अॅसीड काय
नायट्रीक अॅसीड काय
ही आहे एक अॅसीड टेस्ट
ही लॅब हीच रिअॅलिटी
प्रॅक्टीकल्स रिफ्लेक्ट करतायत
जे प्रॅक्टीकल नाही त्याचा वर्णपट

२०.
"हायड्रोजनपासून निघालाय पुरूष - पुरूषापासून हायड्रोजन बॉम्ब
ऑक्सिजनपासून स्त्री- स्त्रीपासून मूलाची बोंब
म्हणून $H_2O$ म्हणजे कम्प्लीट जीवन"
माझ्या ह्या शोधाबद्दल मला नोबल मिळेल काय
किंवा अॅडमिशन

२१.
मी प्रत्येक विषय
अभ्यासानं धुऊन काढतोय
आणि मला काहीच कळत नाहीये
मी तिथेच परततोय
जिथून निघालो होतो
इमॅजिनेशनचे पहिले पान रिकामे
आणि शेवटचेही

२२.
अभ्यासाचं केवळ नाटक स्टडीरूममधून
फिजीक्सला आकार नाही
केमिस्ट्रीला मूळं नाहीत
बॉटनी फक्त आवाजच करते
आणि मॅथ्सचा बैल
पेठेसरांनी इतकं चांगलं शिकवूनही
डोळ्याच्यां चिखलात रूतून बसलेला
मला नेमकं काय हवंय?

२३.
मला ढगातील विजेचा आवाज ऐकू येतो
पण विजेचे सायंटिफीक रहस्य वाचता येत नाही
मला झाडातील बीजाचा नकाशा न्याहाळता येतो
पण मला स्लाईडवर साधी वनस्पतीपेशी वाचता येत नाही
मला पृथ्वीचा त्वचेचा स्पर्श हुडकता येतो
पण मला मातीचं रासायनिक पृथकरण करता येत नाही
आता हे माझ्या कण्टाळ्यात बसून असलेले मायक्रोस्कोप
मी होपलेस फेकून द्यावेत नाहीतर काय करावे?

२४.
नाकासमोर चालणारे मोर होतील काय?
पायासमोर चालणारे डौलदार होतील काय?
डोळ्यासमोर पाहणारे पाणीदार होतील काय?
मी स्वत:लाच प्रश्न विचारतोय
आणि मी वाकड्यात शिरतोय

२५.
मी आयुष्याचा मूळ रहिवासी आहे
आणि अॅडमिशनसाठी लागणारं डोमिसील सर्टिफीकेट
माझ्याजवळ नाहिये
मी आयुष्याचा मूळ फोटोग्राफ आहे
आणि अॅडमिशनसाठी लागणारी फोटोप्रत माझ्याजवळ नाहीये
मी आहे एक वेडा
ज्याला अॅडमिशनची कसलीही फिकीर नाही
आणि मी शहाणा असल्याचं सर्टिफिकेट कुणीच माझ्याकडून
मागणार नाही
ह्याची मला खात्री आहे

२६.
मित्राचं अॅडमिशनचं स्वप्न
फक्त स्वप्न राहणार नाही
वस्तुस्थिती हाईल
आणि मी त्या वस्तुस्थितीवर स्वप्नासारखा बसून
मित्रांकडून ऐकत राहीन
"राजा तुझं काहीच कळत नाही बुवा
डोकं अफलातून आहे
पण कुठल्या दिशेनं चालतं तेच कळत नाही"

२७.
मी राक्षस होईन
आणि दिसेल त्या वस्तूवर हात ठेवत जाईन
ज्या वस्तू जळतील त्यांची राख गोळा करेन
ज्या वस्तू उजळतील त्यांची त्याच्या प्रकाशात रोज साफसफाई
करेन

२८.
मला मूळं हवीयेत
आणि पंखही
मला व्हायचंय
पक्षी आणि झाड
ह्यांच अनोखं मिक्सिंग

जे खोलात जाताना पाहील
आकाशी मूळांचा ग्राफ
आणि उडत जाताना काढेल
पृथ्वीच्या पोटातील ढगाचा फोटो

२९.

व्याख्या ख्या ख्या करून बुडतायत
थेऱ्या थेरं करून बुडतायत
प्रकाश काश काश करून बुडतोय
फक्त मीच बुडत नाहीये
तरंगतोय
आणि माझ्यात कुणीतरी पोहतोय
ज्याच्या पोहण्याचा आवाज
ह्या स्टडीरूममध्ये इतका काळ बसूनही
मला ऐकू येत नाहीये

३०.

माझ्यात एक माणूस उत्क्रांत होतोय
जो ॲन्टीक्लॉकवाईज वाऱ्यासारखा वाहतोय

## न्यू कॉलेज : सिनीयर

### पोवाडा

काय काय शोषून घेतो त्वचेचा स्पंज
प्रत्येक पोरगी मारते नजरेने पंच
चेहरा तिचा म्हणजे आनंदाचा खजिना
नाव असो राधा अॅना किंवा मीना
त्या नसल्या म्हणजे कॉलेजला ग्रहण
सरांना खपत नाही असेल प्रकरण
मैदानावर खेळतो मर्दानगीचा फुटबॉल
कोणी असो स्मॉल वा कोणी असो टॉल
एखादी पोरगी नजर वळवून बघते
तिच्या डोळ्यात आमचे आख्खे नशीब वाकते
तशी आम्ही पोरं आहोत सद्‌गुणी
बोच्याखाली पेटते कधी कधी धुनी
ही आग घेऊन काय डोंबारवाड्यात जावे
त्यापेक्षा परवडतात चड्डीतले चावे
कधी कधी वाचते कानाखाली म्युझिक
सॅण्डललाही लाभते समाधानाची कीक
किती पारदर्शकता आमची लाईन मारण्यात
का दिवस घालवावेत दुरून डोंगर पाहण्यात
मागू नये भीक मात्र कधी प्रेमात
सोडू नये कधी धरलेला हात
जातपात काय बघतोस करताना प्रेम
शेम शेम शेम शेम शेम शेम शेम शेम
कोल्हापूरच्या स्टूडंटने जातपात बघावी?
शाहू महाराजांनी आता चप्पलच काढावी
हे जाड्या तू कसा पडला नाहीस प्रेमात
आयुष्य घालवणार का नुस्तं खात खात
तुझ्या डोळ्यावरती बाबा कसले शेवाळ
कानाखाली आजसुध्दा निघाला का जाळ
तू काय स्वत:ला ताराराणी समजतेस
लाईन दे ना जवानीची वाट का लावतेस
आरं बाबा ही तर खराड्यांची पोरगी
आमदाराच्या पोरीसंग नको बाबा सलगी
बिल्याचं बरंय रे सांगलीची पटलीये
सांगलीला जाऊन जाऊन हौस सारी फिटलीये
ही तर बोलून चालून कॉलेजची क्वीन
प्रत्येकाने मारून बघा तिच्यावरती लाईन
पटेल त्याला पटेल न पटली तर द्या सोडून
खोडरबरासारख्या काढतात ह्या चिकन्या पोरी खोडून
आली बघा आली बघा यादवांची शिस्त
तोपर्यंत आपापले डबे करा फस्त
अहो जाळेवाले काळे किती किती फिराल
तुमच्या ब्लॅक टचने किती पोरी ताराल
हे आन्या तुज्याजवळ नाहीत चार आणे
रंकाळ्याकाठी घ्यावे लागतात निदान शेंगदाणे
एकीवरती फिक्स कर बाबा तुझी नजर
प्रत्येक पोरगी नसते बाबा प्रत्येकाचे फ्युचर
प्रेमही करावे आणि अभ्यासही करावा
आयुष्याचा समजून घ्यावा गनिमी कावा
शाहीर राजा तिळवे सांगतो रहस्य हे शेवटी
पोरगी कधी काढू नये खिश्यापेक्षा माठी

### लावणी

मला घालण्यापेक्षा भुरळ
तू असतीस जर झुरळ
तर बरे झाले असते
पण तुझा प्रत्येक अवयव तरणाबांड
आणि माझा जोश असा आडदाण्ड
जो टपलाय तुझ्या आडवाटेवर
तुला आडोश्याला नेऊन भर
आडवी करायला
तेव्हा जा वाटेनं सरळ
न टाकता कुठला गळ
तुझ्या डाव्या हाताचा मळ
पुरूष आहे
राहून बेसावध
करून घेवू नकोस वध
माझ्याजवळही मध
खास आहे
चोळी तुझी हिरवी तंग
दाखवते नेमके अंग
जिथे नको तिथे तरंग
उठतात
जा बाई जा
हा तिळव्यांचा राजा
नालायक आहे

### प्रेम : १

माझ्याच कॉलेजात शिकतेयस तू
आणि तुझ्या आसपासच्या हवेत
माझा श्वास नाही
माझ्याच कॉलेजात चालतीयेस तू
आणि तुझ्या चालण्यात
माझ्या पावलांचा आवाज नाही

माझ्याच कॉलेजात वाचतीयेस तू
आणि तुझ्या डोळ्यात
माझे वाचन नाही
माझ्याच कॉलेजात बोलतीयेस तू
आणि तुझ्या जीभेत
माझे नाव नाही
किती डिसगस्टींगं आहे हे सगळं पोरी
की जिथे हातात हात घेऊन जाण्याऐवजी
आपण सेपरेट बेंचवर बसून
आयुष्याचं ॲपल सेपरेटली खातोय
आपण
जे बोलण्यास उत्सुक आहोत एकमेकांशी
भयात थांबून ह्या सूर्याच गरम गरम उन्ह
एकमेकाच्या नजरेत न्याहाळतोय
ना तुझ्यात धाडस
ना माझ्यात धाडस
मग अंगाला एकमेकांची सर्वांगांन धाड भरून
काय फायदा
भय आपलं तारूण्य फस्त करत चाललंय
आणि आपण
ते शाकाहारी आहे की मासांहारी
ह्याचा अदमास घेत
एकमेकासमोर
एकमेकाचं
आयुष्य वाया घालवतोय

## इजहार

I love you कारण की इंग्लिशमधून मराठी की I love you की
प्रेम की करतो की डोळ्यात तळं कानात मळ तरी आणून बळ
I love you की त्वचेवर वाचा माशीसारखी बसली आणि
जीभेची काशी झाली काबा झाली आणि काळजाचा दगड
हालला हजयात्रा फिरली नमाज उलटा झाला सुलट तू सावळ्या
रंगाचं बर्फ ओघळलं माझ्या ध्रुवावर की माझं प्रेम I lovE you
की समजून घे की अडव्या तिडव्या ढगातून साप चढतात शिड्या
उतरतात जेव्हा डोळ्यांचे टाकतेस फासे आणि सगळे वासे
फुफ्फुसांचे पोकळ होतात आणि बासरी वाजते कृष्णाची की ती
समजून की I lovE you चा केऑस आणि कनफ्युजन आणि
कनक्लुजन नको काढूस हा
चॅटरबॉक्स सॉक्स घालून प्रेमात चालतो की I lovE you की
I love की Loveकी only youकी you
प्रिये
ही शांतता स्विकार .

## प्रेम : २

प्रेमात पडलीयेस तर
पावसापुढे नग्न होऊन मुक्त नाच
प्रेमात पडलीयेस तर
शेकोटीवर दोन्ही हात जाळायला शिक
प्रेमात पडलीयेस तर
माझ्याच चेहऱ्याच्या हालचालीत चालायला लाग
प्रेमात पडलीयेस तर
काळीज कणकेसारखं मळ आणि चपाती लाटायला घे
प्रेमात पडलीयेस तर
भर गर्दीत डोळ्यांनी फक्त माझाच हात पकड
प्रेमात पडलीयेस तर
माझ्यात आत्महत्या कर

## प्रेम : ३

ही झाडं तुला मला काय सांगतायतं बघ
त्यांनी सळसळीत लावलाय शांततेचा वग
त्याच्यां फांद्या एकमेकास कधीकधी झोंबतात
तरीही त्यांची मुळे एकमेकात थांबतात
ती फक्त आहेत रात्र असो वा पहाट
काळ मग फिरवो कसेही त्याचे रहाट
ती हसतात हसतात आणि हसतात
इतकी मोकळी की फुलांचे दात दिसतात
प्रकाशाचा गोंधळ आणि आवाजाचा केऑस
तरीही आवडतो त्यानां एकमेकाचा सहवास

## पार्टी(शेतातली)

प्रत्येकजण पार्टीत शिव्याच थुंकतोय जमिनीवर
कुणी काळावर आरूढ होऊन तर कुणी देशावर
कुणी अन्नावर बसून तर कुणी चकण्यांवर
प्रत्येकाचा माज उंच तरी झालाय
किवां टंच तरी
प्रत्येकालाच जमीन आपल्या पायाची दासी वाटतीये
आणि जमीन शहरातून आलेली कॉलेजीयन थुंकी झेलत
शांतपणे बुध्दासारखी जे मिळतय ते नाकारत
जो जे देतोय त्याला ते दारूतून लिव्हरमध्ये परत करत
झिंगलेल्या पायांना आधार देत
मेडीटेशन करतीये

## रेल्वे स्टेशनवर वेटिंगरूमवर कवी

पाऊस नसतानाच जास्त कळतो पाऊस
माणूस नसतानाच कळत जाते माणसाची किंमत
तहानच सांगू शकते पाण्याविषयीच्या शहाण्या गोष्टी
आणि भुकेलाच स्वप्नं पडू शकतं चोवीस कॅरेट भाकरीचं
तू नाहीयेस
आणि तुझी अनुपस्थिती माझ्या काळजाच्या स्टेशनवरून
दर मिनिटाला ट्रेन सोडतीये
एक वेटिंगरूम आहे
जी आख्खी पृथ्वी कवेत घेतीये
आणि माझं लगेज
ज्यात तुझ्या फक्त आठवणी आहेत
सगळे वजन काटे मोडून काढून
वाट पाहतय तुझ्या येण्याची
तू आलीस की सगळं हलकं होऊन जाईल
आणि ही पृथ्वी पुन्हा फुलपाखरासारखी उडायला लागेल

## वाचन

पहिल्याच पानावर ती वाकून बघतीये
माझ्या डोळ्यातील पंचगंगेत
तिच्या स्तनांचे मोदक तयार होतायत नैवेद्यासाठी
आरतीची वेळ अद्याप झालेली नाही

म्हणून ती वाट पाहतीये माझी पहिल्या पानावर
सव्वीसाव्या पानावर ती बसलीये शिवाजी महाराजांना
रिप्लेस करून त्यांच्या घोड्यावर
तिला जिंकायच आहे ताराराणीसारखं आख्खं दख्खन
आणि माझ्या मांड्यावर तिच्या नाकाची तलवार लटकते आहे
चाळीसाव्या पानावर तिला सुचलीये एका बाईकची खरेदी
रस्ते तिच्या हातातील नोटात फरफरताहेत
त्वचा अफाट वेगाच्या कल्पनेनंच गोल्डन झालीये
माझे पाय खिळून राहिलेत तिच्या जिभेच्या गिअर्सवर
ती शब्द अफाट वेगाने चालवतीये
शेवटच्या पानावर तीला ॲक्सीडंट झालाय
बाईक घोड्याच्या मुंडक्यावरून निघून गेलीये
आणि आरतीसाठी खोळंबले गेलेले स्तन
नाकाच्या तलवारीखाली भेदरून चिडीचूप आहेत
माझ्या डोळयातील पंचगंगेत तिचं जळतंय शव
आणि मुखपृष्ठावर असलेल तिच्या मृत्यूचं चित्र
मी सवयीप्रमाणं सर्वात शेवटी वाचतोय.

## पिकनीकमध्ये

तिचा हात हातात घेऊन पिकनिकला जाताना
आपोआपच आम्ही मागे रेंगाळलो
आपोआपच आमच्या वाटा वेगळ्या झाल्या
आपोआपच आम्ही एका झाडाच्या आडोश्याला पोहचलो
जेव्हा सर्वांच्या चालण्याचा आवाज नाहिसा झाला
तेव्हा आपोआपच माझे ओठ
तिच्यावर ओठवर टेकले
आणि आम्ही एकमेकाच्या शरीरात
चालायला सुरवात केली
आम्ही भटकंती संपून
जेव्हा हॉटेलपाशी आलो
तेव्हा विझून गेले होते सारे दिवे
आणि काळोखात आमचे हात
आपोआपच एकमेकांच्या हातून सुटून गेले
आणि आपापल्या रूमच्या चाव्या
त्रयस्थपणे काऊंटर वरून घेऊन
कुलूप उघडायला लागले

## मी मुंबईला निघून गेल्यावर

आज एक तारीख असेल किंवा दोन किंवा चार
सूर्य टाईप करतोय माझ्या त्वचेवर एक एक मिनिट
आणि तू दिलेला जालिम कीस माझ्या ओठात लेझीम खेळतोय
ह्या तळपत्या पत्र्यावरून मी उडवतोय स्वप्नांच्या मधमाश्या
माझ्या दोन्ही गुडघ्यांचे तबले एकमेकांवर वाजवतायत एक ताल
तुझ्या स्पर्शाचा टेलीफोन कानात गुणगुणतोय
ह्या भीषण उकाड्यात माझा श्वास तुझ्या वासाने सुगंधित होतोय
तुझे भास जसे अंधारात चालतात तसेच उजेडातही
उजूला वाटतय मी ह्या तळपत्या पत्र्यावर योगसाधना करतोय
आई माझ्या डोळ्यातलं उन्ह पाहून होतीये अस्वस्थ
पण तसं दाखवत नाही
माझे केस ह्या जैन गल्लीत रोज जळतात
तुझ्या प्रेमात कदाचित मी दिगंबरही होईन
मला माहीत नाही मी तुझा कोण आहे
माझ्या हातांना तुझ्या डोळ्यात सम्मान नाही
तुझ्या नजरेत माझे डोळे रोज तडकतात
हा उन्हाळा मला नेहमीच आवडतो
माझा मागील जन्म वाळवंटातला होता म्हणूनही असेल
एक पिळदार ढग आपल्या रंगाचा पिसारा घेऊन समोर उड्या
मारतोय
उरलेले जळालेत त्यांची राख थोडी आकाशात उडतीये थोडी
माझ्यात
तू मुंबईला निघून गेलीयेस
आणि मी हा असा कोल्हापुरात उन्हाळा उबवत बसलोय
तू कुठं आहेस
तू काय करत असशील
मी हा असा तुझ्या आठवणींच्या बर्फात गच्च
आणि अंगाखालचा तापलेला पत्रा अनपेक्षित घामात
तुझ्या नावाने मला अंघोळ घालतोय.

## प्रेम : ४

मी रंकाळ्यात जाऊन आत्महत्या केली
तर मला मॅडचॅप समजू नकोस
ज्या माणसाच्या अंगाची मत्सराने लाहीलाही होते
त्याने आपली चीडचीड
पाण्यात बुडवून शांत करावी नाहीतर कुठे
कोटीतीर्थवर फार गर्दी असते
आणि पंचगंगेवर तर नजर ठेवून असतात आजकाल लोक
बुडवणाऱ्या लोकांना वाचविण्यासाठी
आत्महत्या करू पाहणाऱ्यालाही नको असतो कोलाहल
आधीच काळजात केऑसचे हलाहल
आणि मेंदूत आत्मव्देषाचा चिखल
अशावेळी लोकांची कलकल
कोण किती कलाकलानं घेणार
तुझ्याशिवाय जगणं मुश्किल
हे आजकाल फार फिल्मी वाटतं
पण एखादा माणूसच फिल्मी असेल
तर त्यानं वास्तववादी कादंबरीकारासारखी आत्महत्या का
टाळावी?
माझ्या जीवाचे तुकडे तुकडे होतायत
आणि तू तिकडे तुझ्या बर्थडे कापत
वाढदिवसात मेणबत्त्या पेटवत बसलीयेस
मला असा राग येतो ना ट्युबलाईटच्या प्रकाशात
मेणबत्त्या पेटवणाऱ्यांचा
साला त्या एडीसनला काय वाटत असेल
एडीसन
त्याचं तर सगळचं जळून गेल होतं
आणि तरीही तो अथक धडपडत राहीला
त्याच्या नुसत्या आठवणीनंच माझी आत्महत्या कॅन्सल होत
चाललीये बघ
इलेक्ट्रीसिटीचा शोध अशाच माणसाला लागू शकतो
जो नक्कीच एकदातरी माझ्यासारखा आत्महत्येत चालत
रंकाळ्यापर्यंत असा पोहचतो

## प्रेम : ५

आजकाल मी फूलांशी कॉन्टॅक्ट ठेवत नाही
माझ्या साध्या स्पर्शाने
किंवा साध्या नजरेने
किंवा साध्या वासाने
ती जळून जातील
अशी मला भिती वाटते
माझे काळीज सद्या इतके ज्वालाग्राही झालय
की त्यात मी सुध्दा जळून जाईन की काय
अशी मला शंका येते
हा माझा मत्सर आहे की ती दूसऱ्याबरोबर गेली
ह्याचा वाटणारा भयंकर संताप आहे
मला माहित नाही
तिला घेऊन जाणारा व्यवसायाने माळी आहे
एवढीच वार्ता मला शेवटची मिळाली होती .

## प्रेम : ६

आता आलोयच ह्या चादरबदली हॉटेलात
तर तुझी त्वचेची चादर बदल
तूझा मूड बदल
प्रेमाचा गूळ काढायला वेळ कुठाय
तेव्हा भिडव नजरेला नजर
उभार अवयवाची सहकारी चळवळ
लावू दे तुझ्या ऊसाला मला माझ्या जवानीचा कोल्हा
आणि ह्या उन्मादानं भरलेल्या बेधुंद नजरेचा
अंत होण्याआधीच
वारणेच्या वाद्यवृंदाइतकीच मुक्त वाजू देत ही शरीरं
अपराधीभावाची शांतता सुरू होईल तेव्हा होईल

## एकदा कधीतरी

एकदा ह्या जनीला सांगायला हवं
अंबाबाईला जाते म्हणून सांगून येतेस हे ठीकय
पण प्रत्येकवेळी भजनाचा मूड बरा नव्हे
अधून मधून हेलनही ट्राय केली पाहिजे
एकदा ह्या सगुणाला सांगायला हवं
तुझा कासोटा फुफाटा पेटवतो ठीकय
पण प्रत्येकवेळी सोट्याकडं सोसाटा घेऊन येताना ती गहनी चड्डी
कशाला?
एकदा त्या बाळीला बजावायला हवं
खा खा खातेस ते ठीकय
पण सगळं वाजल्यानंतर प्रत्येकवेळी वेफर तोडल्यासारखे
दात वाजवणे बरे नव्हे
प्रत्येकवेळी अन्न होऊन थाळी वाजवणं कधीतरी सोडून द्याव बाईनं
एकदा त्या कमळीला समजवायला हवं
स्तन बारीक आणि अंग खारीक ह्याचा कॉम्प्लेक्स कशाला
कितीवेळा तू भरीव आहेस असं खोटं बोलायला लावणारायस
एकदा कधीतरी सगळे कपडे काढूनच
भिडता यायला हवं नागड्यानं
आणि त्वचेचा कापूर जाळत
पंचारती करता आली पाहिजे चौघींची प्रामाणिकपणाच्या
भर उजेडात
एकदा कधीतरी

## हॉस्टेल

दाण्डीला लटकलेली हँगर्ससारखी माझी सात मुण्डकी
आणि माझा एकुलता एक शर्ट
झोपेतून उठलेले चौदा पाय माझे
आणि फाटत चाललेले एकुलते एक कोल्हापूरी चप्पल
चौदा हात बोअरवेलपाशी पाण्यासाठी उभे
आणि हात धुण्यासाठी चौदाशे मैल लांब रांग हातांची माझ्या
हातांखेरीज
सण्डासासाठी पाळीत उभी एकशे चाळीस ढुंगण माझ्या चौदा
ढुंगणाकडे पहात
आणि सहा सण्डास ढुंगाण झेलून झेलून थकून गळालेले
मी घालतोय माझ्या एकाच अंगाला आंघोळ
आणि सहा अंगं पाण्याचं दारिद्रय पाहात साबण ढुंगण्यात संतुष्ट
माझ्या ताटात घातली गेलेली एकच भाकरी
आणि ती मात्र सात जण करत शेअर
देतायत एकच ढेकर
आता जरा जीवात जीव येतोय

## सेन्डॉफ

शेवटच्या दिवशीही
स्तब्ध निळ्या आकाशाखालीच कॉलेज नॉलेज कधी कासव कधी
ससा सूर्य चढवतोय बोटॅनिकल गार्डनमधील प्रत्येक वनस्पतीच्या
बोटास उन्हाची सोनेरी अंगठी 'महाराष्ट्र हायस्कूल' मधला महाराष्ट्र
कोवळा शाळेत बसून देतोय निरागस हजेरी दोन्ही बिल्डींग्ज जणू
सख्ख्या शेजारी एकमेकाला घालतायत भिंतीतून सिमेंटी मिठी
शेवटच्या दिवशीही
यादवसरांची दमदार दहशत हत्तीसारखी पावलं टाकत आपटतीये
शिस्तीची काठी मुले ग्रूपग्रूपने येतायत एकत्र विखूरतात सरांच्या
आवाजात प्रेम आणि कठोरतेची एकत्र दाटीवाटी
वाचनालयातील पुस्तके हलवतायत हात थव्याथव्यांनी
उत्सुकतेच्या निळ्या झाडवर बसून आर्ट शाखा सोसतीये
झाडाखाली विज्ञान शाखेकडून नेहमीचीच मिस्कील दमदाटी
शेवटच्या दिवशीही
वाय बी पाटलांच्या मराठी संहितेतून उगवतायत मराठी चन्द्र मराठी
सूर्य मऱ्हाटमोळ्या माध्यमावर पसरलेल्या आगामी बेकारीचे
त्यांच्या प्रकाशावर सावट लॅबोरेटरीज टॅप करतायत येणाऱ्या
चान्सेसचे ग्लोबल केऑस इतिहासाच्या विभागातून पन्हाळा
उपटतोय मराठेशाहीतून उगवलेले तणकट
शेवटच्या दिवशीही
डोळ्यात एक ओल खोलवर रक्तात आरक्त अनुरूक्त मैत्रय
एक नदी वाहतीये आम्हा सगळ्यांतून जी जाणवतीये पण दिसत
नाही कुणालाच कळत नाही निरोपातही कोण आमच्यापैकी
शंभर कौरव कोण पांडव पाच टाचेवर मनोमन उभा प्रत्येकजण
एकाच ताण आणि मौजेचा आतमध्ये नाच
निघावं तर लागणारच ! निघायचच ! पुन्हा कधी भेटू ? काय देणे
घेणे या वास्तूशी यार उगाचच दाखवलेली डिटॅचमेन्ट आणि
निघताना तरीही भर उन्हात पाय थंडगार

## परिसर :

### ओळख

ह्या शहरात कित्येक आहेत
ज्यांना मी जाणत नाही
ह्या शहरात कित्येक असतील
जे मला जाणत नाहीत
तरीही ह्या शहराबाहेर आमची दोघांचीही ओळख
'कोल्हापुरी' अशीच असेल
कदाचित मी आता घेतलेला श्वास
मी ज्याला जाणत नाही त्याचा उच्छ्वास असेल
कदाचित् ज्या ग्लासातून मी आता पितोय पाणी
त्याच ग्लासला झालेला असेल त्याच्या ओठाचा स्पर्श
जो मला ओळखत नाही
हवा, पाणी, सिनेमा, नाटक, पाऊस
अश्या कित्येक गोष्टी आम्ही शेअर कलेल्या असतील
एकमेकाला न जाणता
म्हणूनच ह्या शहराबाहेर आमची एकच ओळख असेल
कोल्हापुरी
आणि आम्ही एकमेकाला न जाणताही ती बरोबर असेल

### कोल्हापुरी मिसळ

सगळंच एकामेकात सरमिसळतय
चेहरा गायब
मुखवट्यांची संमिश्र मटकी जागोजागी
कुठे जैन कुठे कन्नडीगा कुठे पंजाबी तर कुठे चक्क नेपाळी
पंचगंगेत फक्त पंचगंगा वहात नाही
चिनाब वाहते गंगा वाहते कधी कधी ब्रम्हपुत्राही
राजस्थानातून आलेलं मारवाडी वाळवंटही
दुकान थाटून बसलय शेव आणि पापडीचं
शुध्दता एक अफवा आहे
आणि मिश्रता एक वास्तव
एक नवा विस्तव वाहतोय सर्व माणसातून
अग्नीचा पवित्रपणा पत्र्यासारखा उडून चाललाय
आणि गॅस पेट्रोल रॉकेल येशेल एकमेकात एकमेकाची आग
मिसळवत
शिजवतायत कटाचं पाणी
जो वास येतोय तो आहे एक सुर्याचा प्रकाश
आणि सावल्या प्रत्येकाच्या वेगळ्या
एकमेकात टेबलावर मिसळलेल्या
सर्वत्र एकच पैसा वाजतोय
आणि प्रत्येकाला त्यातून ह्या मिसळीचा वेगळाच आवाज ऐकू
येतोय
सर्वत्र मिसळीच्या गाड्या आणि हॉटेल्स
आणि मी हजार तोण्डानी
ह्या शहरच्या प्रत्येक गाडी हॉटेलमध्ये
रोज नव्या मिसळीची नवीन टेस्ट आजमावत
आयुष्याच्या पावाचे नवे नवे तुकडे तोडतोय

### कोल्हापुरी मिसळ :२

ह्या नगरीत बाहेरून आलायच तर
सवय करा इथल्या तिखटाची
इथल्या तिखट झटक्याची
इथे तोचं वयात येतो
जो कोल्हापूरी मिसळ पचवतो
आणि आयुष्यातून प्रसवतो
ही नगरी आहे मोकळीढाकळी आणि दिलदार
तिच्यात शिरायचं तर
जिभेच्या पुनर्जन्माची तयारी करा
आणि तिच्या चवीत चालत रहा
तुमचे पाय मजबूतपणे ह्या चवीत चालत राहिले
तरच तुम्ही इथे जगण्यास लायक आहात
मिसळ हे इथे केवळ जगण्याचे सेलिब्रेशन नाही
सेलिब्रेशन आहे आयुष्याच्या चटकदारपणाचे
जे आख्खा माणूस
जीभेला चटके देत देत
पुन्हा जन्माला घालतं
तेव्हा या
आणि तिच्या ह्या तिखट कटात झणझणीत जन्मा

### राजाभाऊ : ऑल इंडिया स्पेशल भेल

गेली कित्येक वर्ष
तुझ्या भेलीची चव जिभेत खेळवत
मी तुला पाहतोय
तुझी भेल देखणी की तू अधिक देखणा
हे मला ठरवता येत नाहीये
ह्या राजवाड्याला
जिथे हवी भिडायला घोडागाडी
तिथे तू तुझी ऑल इंडिया स्पेशल भेलगाडी भिडवून
कोल्हापुरात साजरी करतोयस खाण्याची लोकशाही
तुझे बादशाही रूप असे की
ह्या राजाराम हायस्कूलच्या राजवाड्यातून शाहू महाराजांचे कपडे
चढवून
पडशील बाहेर तर
लोक समजतील तुलाच शाहू महाराजाचा राजबिंडा वंशज
एका अर्थाने हे बरेच आहे की
तू आहेस भेलवाला
ज्याला निसर्गाने धाडलंय आमच्या संस्थानिक शहरात
हे सांगण्यासाठी की
देखणेपण आणि रूबाब फक्त राजवंशी नसतो
हे शहर
जे दहा बोटांनी खातं तुझी भेल
आणि दोन पायांचा फेरफटका संपवत
तुझ्याच चवीत आपली जीभ पार्क करतं
आपला स्पार्क वाढवत
आधिकच वाढत चाललंय डार्कनेसमध्ये
ह्या समंजस लाईटीखाली
वाढतच चाललीये तुझ्या भेलची मागणी
वाढत्या शिरगणतीनुसार
तुझे चिरमुरे चिरंजीव
तुझी पापडी पुण्यवान
तुझं चिंचेच पाणी चमत्कार
कोणत्या दळदार डाळीचे अवतारी पीठ
आयुष्याच्या कोणत्या गिरणीत दळून

तू ह्या शेव पापडीत करतोस मोल्ड
कोणती तांदळाची जात
तरातरा नाचते तुझ्या चिरमुऱ्यात
कोणते पाणी होते वेल्ड
तुझ्या चिंचेत नित्यनूतन चालत
देत आंबटपणालाही डोल
कोणता कौल अन्नदेवतेला लावत
तुझ्या भंडगातच होतो
हळदतीखटाचा प्रयागसंगम
राजाभाऊ
गेली कित्येक वर्ष ठेवून
तुझ्या पातेल्यात आपली आख्खी जीभ
आख्खं कोल्हापूर बोलतय
मिश्र चवीची एकात्म भाषा
आणि तू
ह्या चवीचा मालककवी असूनही
भाषांतराची अडचण सांगत
ह्या चवीचं रहस्य
कुणालाच सांगत नाहीयेस . .

## कोल्हापुरी : गजल

नजरेआड करण्यापेक्षा नजर भिडवलेली बरी
तशीच सोडण्यापेक्षा पोरगी अडवलेली बरी
शब्दांना शब्द भिडवून चर्चाच होईल फक्त
ओठ निसर्गाने दिलेत चुंबने घेतलेली बरी
हे घर अनोखे आहे भिंतीशिवाय उभे राहते
कपड्यांची भिंत मोठी ती पाडलेली बरी
काठोकाठ भरली आता तर उफाळतीये
कशाला सांभाळतेस त्वचा सांडलेली बरी
देहाच्या डिस्कोमध्ये कशाला हवे भान
स्पर्शाने धरलाय ठेका बॉडी नाचलेली बरी

## कोल्हापुरी भाषा

राजा जन्मलं
राजा येतंय
राजा तरकाटलं
राजा फेंदारलं
राजा गेलतं
राजा मेलं
गेली वीस वर्ष
मी ह्या शहरात
नपुंसक वावरतोय
पुणेरी पुल्लिंगाच्या
प्रमाण शीर नाकावर टिच्चून
गेली वीस वर्ष
माझे अप्रमाणिक श्वास
मोकळे आहेत

## जागर

हा जागृतीचा गर
हा जागर
हा केरवा
नाश करत उद्या,परवा,थेरवा
केवळ आज आणि आता
इथे आणि वाहता
हा देवीला गुप्तांगातून खेचून आणणारा वारा
भरारा
हा ज काठीचा गरारा
हे बळीराजाचं पूर्ण बळ
संबळ! संबळ!
उदे ग आई उदे...

## अंबाबाई

मी तिला आई म्हणालो
आणि ती दगडाच्या बाहेर हसत हसत आली
तिलाही तिच्या बाळाचा स्पर्श हवा होता
मग तिने मला
सोळंकी कोल्ड्रिंक हाऊसमध्ये न्हेऊन दूध पाजलं
म्हणाली
दगडात राहून राहून स्तन आटून गेलेत
बर झालं माणसांनी दूध कोल्ड्रिंक शोधलं
मग तिनं मला प्रेमानं जवळ घेतलं
माझे केस कुरवाळत राहिली
म्हणाली
तुझे केस माझ्या दगडाच्या वळणावर गेलेत
शेवटी आईचं काहीतरी मुलातं येतंच
मग तिनं मला अगत्यानं घरात सोडलं
मी म्हणालो नको जाऊ तर
मंदिरात घण्टेचा आवाज झाला
म्हणाली
माझी साडी बदलण्याची वेळ झाली
उद्या नवरात्र आहे
मला गेलंच पाहीजे
मग ती मंदिरात गेली
त्यानंतर नऊही रात्री माझ्या पायात
मुंग्यासारखे दगड येत राहिले आणि मी जड जड होत गेलो
मी त्या नवरात्री नाचलो नाही
तिच्या पायरीत खिन्न बसून राहिलो

## अंबाबाई : २

मन्दिर बांधताना
प्रत्येक दिवशी नवं होतं होतं
मन्दीर बांधून झाल्यावर
प्रत्येक दिवशी जूनं होत गेलं
आता एवढ्या शतकानंतर
ते शाश्वत वाटतय
कदाचित् माझ्या मृत्यूनतंरही ते टिकणार
ह्याची ग्यारन्टी मला वाटत असल्याने असेल

## खिद्रापूर

कुणाचेच ऐतिहासिक डोळे
न पोहचलेले हे मंदिर
एकशे चार हत्ती पाठीवर आकाश घेऊन झुलताहेत
त्यांच्या पायाखाली आहेत काळाचे कीडे
आणि नष्ट झालेल्या माणसांची अदृश्य वारूळे

हा देश अद्भूत आहे
इथे कोपाचे आणि संतापाचे मंदिर होते
आणि कोपणाराही ईश्वर होऊ शकतो
माझ्या डोळ्यात कोपेश्वराचा संताप नाही
किंवा त्याची इथं येण्यापूर्वीची शांतता
एक उत्सूकता की इथे माणसे का नाहीत
साक्षात शंकर असूनही
की त्याच्या रागाला घाबरुन माणसं पळून गेलेत ?
मी गोल गोल फिरतोय
ह्या काळ्या पाषाणांभवती
त्यांची त्वचा माझ्यात मिसळतीये
आणि माझे डोळे अधिकच काळे पडतायत
कापणारे कापून गेलेत मूर्त्यांचे नाक मूर्त्यांचे स्तन
पण आख्खे मंदिर कापणारी तलवार
त्यांच्याजवळ नसावी
मूर्त्या ज्या मुळातच होत्या मुक्या
स्तन कापल्यानंतर दूध देणं थांबूनही आयासारख्या
प्रेमळ उभ्या आहेत
ज्यांचे नाक गेलयं त्याही आसपासची फुलं
नाकारत नाहीत
एखाद्या जिद्दी अपंगासारख्या त्या एकमेकाला आधार
देत
दगडी पाषाणात जगतायत
काळ कित्येक शतकं त्याची साल सोलतोय
पण त्या नुकत्याच तयार झालेल्या फळाइतक्या ताज्या
ह्या मंदिरपासून त्यांना मुक्तता नाही
त्यामुळेच त्यांचे जे पाय शाबूत आहेत
ते फक्त उभे राहण्यासाठीच कामाला येतायत
त्या उभ्या आहेत कधीपासून अशाच
स्वर्गमंडपाचं छत मात्र उघडंच आहे
एरव्ही शंकराला कधीही न सोडणारा नंदी
ह्या मंदिराचं भवितव्य ओळखून
बहुधा तिथूनच पळून गेलाय

## दर्शन

स्वर्ग हलत नाही
काल्पनिक आहे
नरक हलत नाही
काल्पनिक आहे
ही पृथ्वी सूर्याभोवती फिरतीये
तीच खरीखुरी आहे

## बुद्धत्व

शहरभर गाभाऱ्यासारखा सन्नाटा
अंबाबाईची घण्टा चोरीला गेलीये
त्यामुळे देवीचा आवाज नाही
मुलांना सुट्टी आहे
म्हणून माणसाला आवाज नाही
पंचगंगेचा आवाजही कुणी चमत्कार करुन
ऑफ केलाय
आकाशात विजांचा कडकडाट नाही
कोणी मेलं म्हणावं तर कुत्रीही चिडीचूप
बहुधा
कुणीतरी आवाज न करता
शांततेच्या वृक्षाखाली
सत्याला उपलब्ध होतोय
आता
विश्वाचा
संपूर्ण ऑर्केस्ट्राच वाजेल

## जोतिबा

बळी तर कधीच
पाताळाखाली गेला
निदान तू मार्ग दाखवशील म्हणून
लहानपणापासून खेटी टाकतोय
तुझ्या डोंगरावर
तर तूही नुसता घोड्यावरच बसलेला
बळीची राजेशाही संपली
तरी घोड्यावरुन लोकांचं चांगभलं करणारी तुझी सुभेदारी
अद्याप सुरुच
तुझ्या डोळ्यात आमच्या पिकाची काळजी
आणि पायात आमच्या नांगराची होणारी मोडतोड
तुझ्या नावाचा एक फुले होऊन गेला
तरी आमची शेती
जशीच्या तशी सुकलेली
आणि आमची खेटी चाललेली
कधी सुलट
कधी उलट
आमच्या खेट्यांचा भरभक्कम आवाज
म्हणून आम्ही नाणी मिळवतोय
आणि वामनाच्या पावलाचा आवाजही नाही
म्हणून तो नोटा घेऊन पसार
आजकाल त्याची पावले तीन नाहीत अनंत आहेत
आणि त्याचा देह तर ॲमिबासारखा लवचीक
कोणत्याही क्षणी आमचं डोकं गाडलं जाऊ शकतं
कोणत्याही क्षणी आमची खेटी बिनडोक होऊ शकतात
जोतिबा,
आता तूच ठेव तुझ्या डोंगराचं हेल्मेट
आमच्या डोक्यावर
आणि दे तुझी तलवार
नवी धार काढून
आमचं डोकं शाबूत ठेवून
वामनाचे पाय कापण्याचा पराक्रम करण्यासाठी
रिकामा कर तुझा घोडा
आता खेटी खूप झाली जोतिबा
आता भक्तांना मावळ्यासारखं दौडू दे

### यल्लमा

तू देवी आहेस का भित्ताड
तू जीव घेणारी विहीर की आत्महत्या पचवणारं आड
खलास करतोय तुझा महिमा कित्येकांचा गरिमा
आंधळ करतय तुझं दर्शन कित्येक बोधी डोळ्यांना
यल्लमे
तू होतीस पृथ्वीवर ज्वालामुखीच्या वेलीला आलेले सर्वात बण्डखोर लाल्हाद
फूल

आणि तू झालीयेस
पृथ्वीवर झालेली सर्वात लाचार जट
यल्लमे
कुठल जंगल मंगल होता होता वाट चुकलं बाईच्या केशसंभारात
कुठल्या पीकाच्या गलेलठ्ठ बण्डाचा झाला भण्डारा
कुठल्या भाजी पिकवणाऱ्या परडीची झाली जगं
यल्लमे
जे पीकवत होते त्यांच्याच हातून कुठून आला
हा भीक मागणारा जोगवा
यल्लमे
तुझ्या नावाने दोरा ओवत ओवत एक दृष्टचक्र
कापत सुटलय खाटिकासारखं माणूसकीची मान
एक तहान
जिच्यात सगळा गळा गळतोय
पिसाटत सुटलीये तुझ्या दर्शनात
यल्लमे
तुझ्या नावानेच उगवतायत सामूहिक बलात्काराच्या जटा
ज्यांच्या डोक्यात तेल नाही ते तुझ्याच जटांत जळतायत औडकं
ज्यांना विज्ञान माहित नाही ते तुझ्याच कटातं निरागस वाजवतायत
त्यांच्या त्वचेचं चौंडकं
बये
तू तर होतीस अस्सल द्राविडी बाई
मातृसत्ताक
मुक्त स्त्रीची लडाकू हाक
लढत राहिलीस जमदग्नीच्या पुरुषसत्ताक व्यवस्थेविरुध्द अपार
केसांच्या जटा झाल्या तरी खाली नाही ठेवलीस तलवार
भरत राहिलीस भंडारा
परशुरामानं केलेल्या जखमात
पण मानली नाहीस हार
दमली भागलीस थकलीस
तेव्हा चर्मवाद्य वाजवून पेटवत ठेवलीस लढाईची मशाल विस्तवाची धार
आज त्या लढाईचाच केलाय ह्यांनी मोठा केशसंभार
जी मुक्त बाई होती तुझी अनुयायी
तीलाच केलीय देवदासी
एक वनवासी बण्ड
नगरात मोडून काढून
त्या पुरुषांचे केले जोगते
जे तुझ्यासोबत लढले
तुझ्या स्तनात वाढले होते
तुझं मातृसत्ताक स्वातंत्र्य पद्धतशीरपणे
बन्द केलं गेलय जटात
आणि तुझा गळा केसानं कापला गेलाय
बये
आता बाहेर काढ
गतकाशतकात म्यान झालेली तुझी तलवार
वाट ह्या पुरुषसत्ताक बोकडाचा मृत्यू माझ्या ताटात
बये
आता बाहेर पडू दे आम्हाला तुझ्याभवती गुंफलेल्या दंतकथेच्या सागवानी दारातून
तुझ्या वक्षाळू तलवारीची धार चढू दे आमच्या सायंटिफिक कात्रीला
आता मोकळ होऊन पाण्यासारखं खळाळू दे
अंधारात तुबलेलं तुझं तुडुंब मन्दिर
मुक्त करु दे तुझ्या खोट्या इतिहासाच्या खऱ्या बेड्यातून
आम्हाला आमचा हात
दुःखाच्या पाण्यात बुडालेली जागराची वात
जागृतीच्या तेलात पेटवू दे
बये,
एक युध्द जटा वाढवून तू लढलीस
एक युध्द जटा कापून आम्हाला लढू दे

## देवमामा (जोगता)

तुझ्या ह्या उदास डोळ्यांच्या कवड्याचं काय करु?
काय करु तुझ्या ह्या सुरकुतलेल्या त्वचेच्या चौंडक्याचं
तुझ्या ह्या हिरव्या लुगड्यातील नदीचं काय करु?
काय करु तुझ्या ह्या नथीतल्या मीठाचं
तुझ्या जगातल्या जराजर्जर दैवीपणाचं काय करु?
देवमामा
काय करु तुझ्यातल्या ह्या पृथ्वीसारख्या भव्य बाईचं?
हवा पडलीये काळीठिक्कर
भंडाऱ्यातून वहात वहात तुझ्या पुरुषात्वाची वही शेवटी मिळालीये गटाराला
तुझ्या हातातून रक्त गळतय गटारी अमावस्येत टप टप टप
आणि भाषेचं शव पडलय मान मुरगळून बेइमान जिभेत
हे इपरीत जगणं
हे इपरीत बोलणं
हे इपरीत हात उडवणं
एक लादली गेलेली आख्खी बाई पचवून
तू पुरुषासारखा उभा
कसली शक्ती आणि कसला शिव
कसली देवी आणि कसला देव
कुणीतरी गोंदवून गेलं भयाच्या शाईनं तुझ्या अंगावर
किडत जाणारं किडुकमिडुक भविष्य
आणि तुझं आयुष्य
तुझ्यात असलेल्या भयाची लिपी वाचत
तुझ्या अंगावर हसत खेळत नासत चाललय
देवमामा
दुःख पचवणारे हे तुझे दात कुठले
वेदना पचवणारा तुझा हा गळा कुठला
तू आजही
कुठून कुठून जागरतोस
आणि भेटलास की
मला न चुकता खारीक देतोस
आत्ता ह्या क्षणी
नुस्त्या तुझ्या आठवणीनचं माझं खजूरी अंग
होत चाललय खारीक
माझ्या त्वचेवर उमलतोय
तुझ्या डोळ्यातला माणूस बारीक
जो माणूसकीचं लुगडं नेसून चालत जातो
जगाच्या अंतापर्यंत
आणि माझ्यासाठी शोध लावतो
नव्या पुरुषत्वाचा
देवमामा
मी आजही तुला मामाच म्हणतो
आणि कवितेचं लुगडं नेसून
तुझा माग काढत
भाषेच्या मागोमाग चालतो

## जोगतीण (स्वगत)

आई तुजा सोडते कायमचा नाद
तुज्यामुळं आयुष्य झालं समदं बाद
डोंगराचे आई घाल तुज महातम खड्ड्यात
तुज्यामूळं जिन्दगानी आली आत बट्ट्यात
तू इदरकल्याणी तुजं चौंडकं भीषण
तुजं घालून भ्या लुटलं माजं भूषण
तुज्या डोंगरास लाव काळजातील आग
तुज्या भंडाऱ्यात माजी करपली बाग
किती नेसली लुगडी तरी मी नागडी
जी नजर आदळली ती नजर वाकडी
तूच माजी आय आणि तूच माझी सवत
बापासंग झोपायची ही कंची नियत
तूच माजी आय मर म्हंजे सुटल सारा तीढा
लय जाहली नाटकं लय जाहली पीडा
उदं उदं उदं म्हणत बुड आता पान्यात
फेकून तुजा जग मी निघाले गाण्यात

## गणेशोत्सव

किती ह्या गल्ल्या
आणि प्रत्येक गल्लीत तू
चिंतेचे दाखवले गेलेले मोदक खाऊन
पोट पुढं काढून तू उभा किंवा बसलेला दादू चौगूले सारखा
तुझ्या सोंडेने हे आख्खं शहर करतो आहेस उष्टं
आणि लोक तुझ्या डोळ्यादेखत सीन करतायत
ह्या हम्या पाळ्या ही फुगी गर्दी
तू फेऱ्या मारुन मोकळा
आणि आम्ही प्रत्येक ठिकाणच्या तुझ्या उपस्थितीला पहायला
सर्वत्र शहरभर चकरा मारत
कार्तिकेयासारखे रात्रभर हिंडतोय
उद्या तुला विसर्जित करताना
आम्ही करु मारामाऱ्या
तुमचा पहिला की आमचा पहिला
आणि आदिअंत नसलेला तू
कोटीतिर्थ, रंकाळा, पंचगंगा असा भेद न करता
सर्वत्र पाण्यातच बुडशील

## बाराइमाम पिरास (ताबूत)

शेवटी बुडायचच आहे तर
हे इतके शोभिवंत कपडे कशाला
कशाला इतका नट्टापट्टा
जर शेवटी शोकच करायचा आहे
कि माझीही गत
तुझ्यासारखीच होणाराय?

## पंचगंगा

पंचगंगेच मूळ मला माहीत नाही
आणि कुळही
पंचगंगा कधीच नव्हती वैदीक ऋषीसारखी रहस्यमय
तिने लपवली नाहीत कधी सनातन सत्ये कुठल्या जलदाढीत
बांधला नाही कधी तिने शाश्वततेचा आश्रम तिच्या काठी
किंवा भेटली नाही तिच्या काठी वेद पठण करणाऱ्यांची मला दाटीवाटी
पंचगंगा नदीच राहिली पाण्याच्या मूळातली
आणि तिने तिचे कूळ कधीच जोडले नाही कुठल्या हेवनरिटर्न्ड देवाशी
ती वाहत राहीली तिची नम्र धिटाई मिरवत
ह्या शहरात
आणि जेव्हा तिच्या शेजारी जळल्या ह्या शहरातल्या चिता
तेव्हाही उदार पाण्याने तिने आश्रय दिला मृत शरीरांना
मंदिर आणि स्मशान मिरवत एकत्र
आजही ती शिरते जेव्हा माझ्या शरीरात
तेव्हा एकाच क्षणी आयुष्य फुलातही असते
आणि जळतही माझ्या त्वचेतील काळात
आणि मन्दीरापुढे जुळलेले माझे जुळे हात
मी जेव्हा तिच्या हाती देतो
तेव्हाही आईच्या मायेनेच काढते
ती माझ्या अंगावरील कपडे
करते मला स्वच्छ तिच्या पाण्यात
अंघोळ घालते गाण्याची
आणि पाणी कॅश करणारी तिची नाणी देऊन
मला ह्या शहरांच्या पाठशाळेत पाठवते
आजही शहराच्या कुठल्याही डॉक्यूमेन्टवर माझी ओळख
पंचगंगेचा नागडा पोर
अशी मातृसत्ताक आहे.

## रंकाळा

॥१॥

एखाद्या राजेशाही भिकाऱ्यापुढं
थाळी असावी
तसा राजवाड्यापुढे तू
समुद्राने वाढलेल्या पाण्याने तयार झालेला
दगडी तटबंदीच्या काळ्या थाळीत
तुला लागलेलं राजेशाही कुलूप दिसत नाही
पण तू कैदेत असावास
अशी शंका अधूनमधून येते

॥२॥

पुण्यतिथी असो की सण
लहानपणापासून तू माझ्या भाषेतील अपरिहार्य म्हण आहेस
आजही आयुष्याचा ताळा चुकला
की ताळ्यावर येण्यासाठी मी तुझ्या तळावर येतो
तुझ्यासाठी छावणी टाकली
की जिवंत होते मेलेली तलवार
आणि कण्टाळ्याने नासलेली धार पुन्हा रसरशीत होते

॥३॥

तू आहेस माझ्या प्रेमाचां अभूतपूर्व साक्षीदार
तुझ्याच लाटात माझं ऱ्हदय वयात आलं
आणि तुझ्यात पाहिलेल्या प्रतिबिंबात प्रथम चिंब झालो
आजही एखादी पोरगी घायाळ करुन गेली की
तुझ्याच साक्षीने करतो मी तिच्या त्वचेवर माझ्या त्वचेची सही
तुझ्याच काठाने चालत चालत
हातात हात घालत
मी वाचतो
तिच्या डोळ्यात लिहिलेली प्रेमाची वही
जी शेवटी तुझ्याच पाण्यात बुडते
काळोख उगवायला लागला की

॥४॥
तुझ्याच दारात फ्रेश होतो माझा वैताग
तुझ्याच उरात कण्टाळा रामनाम सत्य म्हणतो
आजही मी आणि माझे मित्र
खेळत असतो तुझ्या पाण्याशी चेस
आणि तोण्डाला फेस येईपर्यंत तू सूचवत राहतोस
नव्या नव्या चाली
कधीपासून तेही आता आठवत नाही
आपण नवे नवे चेक देतच आहोत
आणि तरीही कुणाचीच मेट होत नाहीये
॥५॥
कुणालाच नीट माहीत नाहीत
तुझ्या पाण्यात झालेल्या हत्या आणि आत्महत्या
तुझ्यात बुडालेली कुलुपे आणि किल्ल्या
तुझ्यात तंरगणारी निर्माल्ये आणि फुले
तपशील कळतात
पण शील सापडत नाही
तुझं पाणी वाहण्याचा कसलाही चान्स नाही
आणि तरीही तुझ्या पाण्यात
मी माझं प्रतिबिंब वाहतं होण्याचा इतंजार करतोय
तुझी दगडी तटीबंदीतली कैद
कुणालाच दिसत नाही
फक्त कधी तटबंदीतल्या तटबंदीत नासून
तुझा मृत्यू होईल
ह्या भयाने
मी झोपेतल्या झोपेत दचकून उठतो
॥६॥
मी तुझ्याआधी मेलो तर
तुझ्याच पाण्यात बुडून मरेन
किंवा इतरत्र
तुझ्या पाण्याअभावी.

## रंकाळा : आत्महत्या

पोलीस रंकाळ्यात आत्महत्या केलेली बॉडी
बाहेर काढतायत
रंकाळ्याचं पाणी आत्महत्येला नेहमीप्रमाणंच
आश्चर्यानं पाहतय
खंरतर पाणी विचार करतय
की प्रत्येक बॉडी तंरगत ठेवण्याइतकं पाण्याचं शरीर
हलंक असताना
माणंसं नेमकी आत्महत्येत पाण्यापेक्षा जड कशी होतात
पोलीसही नेहमीप्रमाणंचं भांबावलेत
आत्महत्येचा निर्णय हा आत्म्याचाच असतो
आणि पोलीसांच्या हाती मात्र फक्त बॉडीच लागते
आता बॉडीवरुन आत्म्याचं इनवेस्टीगेशन कसं करायचं
गर्दी नेहमीप्रमाणचं आत्महत्या उत्सूकतेनं पाहतीये
प्रत्येक आत्महत्येमागं कारण असतं
पण जगणं हे कारण का दुरुस्त करु शकत नाही
की माणूस दुरुस्तीसाठी मरणाकडं वळतो?
मरण हे कारण दुरुस्त करतं का ?
एक धाडसी माणूस
जो आयुष्यात आपण कधीही आत्महत्या करणार नाही
हे ठामपणानं सांगतो
त्याला तर सगळचं विचित्र वाटतंय
माणसानं इतकं डरपोक असावं
की मरणाचं भय संपतं तेव्हा माणूस आत्महत्या करतो ?
ज्यानं आत्महत्या केलीये
तो मात्र एका वेगळ्याच स्टेशनवर विवंचनेत आहे
ही जुनी बॉडी आत्ताच सोडावी?इथंच सोडावी?
की स्मशानात सोडावी ?
त्याच्या दृष्टीने आत्महत्या हा आता संपलेला विषय आहे
खरी चिंता बॉडी आहे.

## आत्महत्या : २

आत्महत्या तर दिवसरात्र घडतायत
आतल्या आत
फक्त त्यांची बॉडी रंकाळ्यात उशीर सापडते
त्या मानवीच असतात
आणि माणसाप्रमाणे त्यांनाही कपड्याची चटक लागलेली असते
त्यामुळे अगदी घडतानाही
त्या विचार करतात
मेल्यानंतरही बॉडी कशी दिसेल त्याचा
म्हणूनच आत्महत्येनंतरची बॉडी कधी नागडी नसते
आत्महत्या कधीच विचार करत नाहीत 'का' ह्याचा
त्यांनी तो प्रश्न कामू आणि रामूवर सोडलेला असतो
त्यांना 'कसे'चे चन्द्रग्रहण ग्रासलेले असते
त्या सूरीकडे, पाण्याकडे, आगीकडे, उंचीकडे, विषाकडे, ड्रग्जकडे
अगदी प्रेमाने पाहतात
त्यांचे डोळे एखाद्या कसलेल्या तांत्रिकासारखे
मृत्यूवर खिळलेले असतात
आणि त्या मृत्यूच्या आसपासचे प्रत्येक मंडल
बण्डल समजतात
त्या जन्मतात तेव्हा मुलाइतक्याच निरागस असतात
आणि वयात येतात तेव्हा तारुण्यांनं मुसमुसलेल्या उफाड्याच्या
पोरीसरखा उत्ताट
त्या जीभेखाली मौन लावून बसतात
आणि श्वासाखाली तणाव
त्या वाट पाहतात माणसात
त्यांची वेळ येण्याची
आणि त्यांची वेळ येते तेव्हा
माणसाची मान मूरगाळून
त्या शांतपणे सही करुन
निघून जातात
Invisible

## कोटीतीर्थ

कोटीतिर्थ म्हणजे एक जाळचं आहे पाण्याचं
जे माझ्या डोळ्यात
फूलासारखं विविध रंगात टाचलेलं असतं
माझी पेन्टिग्ज त्यातून जन्म घेत असतात
माझी सेटिंग्ज त्यातूनच वहात असतात
दिवस झाला की झुलतात
त्याच्या काठची झाडं माझ्या पापणीवर
आणि त्यांची पाने थेट काळजात पडतात माझ्या
त्यांच्या डोळ्यातून

संध्याकाळ झाली की लाटांचे ओले आवाजही
पिऊन घेतात माझे रंग
आणि थव्याथव्यानी उडत जाणारी माझी पेन्टीग्ज
शहरभर शोधत राहतात
आबालाल रेहमानांचे हरवलेले हात
रात्री सारे काही शांत असते
आणि माझ्या झोपेत घोरत असतो
पेन्टीग्ज करताना झालेला
आबालाल रेहमानाचां आवाज

## प्रलय

पंचगंगेकाठी सफेद गायी एकामागून एक
गळ्यातला घंटा वाजवत आकाशात उडाल्या
कोटीतीर्थाकाठी फुलपाखरे
अंगावरचे रंग उधळत पाण्यात बुडून गेली
रंकाळ्याकाठी बदके
पायांनी जमीन नांगरुन वीजेच्या वेगाने पळून गेली
अचानक सफेद ढग माझ्या डोळ्यात येऊन तरंगले
अचानक मासे माझ्या श्वासात येऊन गडबडले
अचानक विंचू माझे त्वचेत नांग्या टाकून विसावले
माणसे दिसेनात म्हणून
बेंबीपासून ओरडलो
तर जमिनीखालून पाणी माझ्या पायांचा कानाज पुटपुटले
''हा प्रलय आहे आणि परमेश्वराने अजून एकही नौका पाठवलेली नाही.''

## महाव्दार रोड

कधीपासून तेही आठवत नाही
मी हिंडतोय ह्या रोडवर माझ्या न उमटवणाऱ्या पावलांनी
हा रोड ह्या नगरीचे महाव्दार आहे की पायजमा
हे कळायच्या आत
मी उगवलो ह्या रोडवर
तुळशीत उगवलेल्या भांगेसारखा
आणि तेव्हा पासून मी रोज पाहतोय
ह्या रोडवरुन अंबाबाईचा कळस
ज्याला डोळ्याच्या काखेत ठेवून
मी रोज वळसा घालतोय ह्या रोडला
माझ्या साबणी पावलांनी
त्याची अनवाणी धुलाई करत
हा रोड रोज गाठतो शंभरी गाठींची
आणि ठेवतो माझ्या चेहऱ्यावर उगवलेली
विशीची मिशी ताजी आणि तवानी
मी रोज मलाही न कळलेलं मूल पोटात घेऊन
दाखल होतोय ह्या रोडवर
आणि रोड डिलीवरी करुन परततोय घरी
लाखो डिलीवऱ्यानंतरही मला दिसलेला नाही माझ्या मुलाचा चेहरा
हरवून गेलय माझं प्रत्येक मूल
ह्या रोडवरील बेदर्दी गर्दीत
माझे श्वास कवी असल्याची कबूली देण्यासाठी
रोज इथे येतात
आणि बायकांच्या केसातल्या फुलाप्रमाणं कवितांचे ऋतू बदलतात
मी ह्या रोडवर चालतोच आहे
कधी राक्षसी
कधी दैवी
तर कधी मानवी
जेव्हा कुणी च नसते कधी ह्या रोडवर तेव्हा
मी चार अनावरी पावलांनीही जनावरासारखा
हिंडलो आहे ह्या रोडवर
कामतचा पेपर डोसा दासरामचा पुस्तक जलसा
अंबाबाईचा गाभारा दुकानाचा बाजार पसारा
बायकांचा शृंगारसाज हृदयांचा आतला आवाज
सारचं एकमेकात दळल जातय ह्या रोडवरचं कधीपासून माझ्या डोळ्यात
एक सडकछाप पीठ तयार होतंय माझ्या मेंदूत
एक भाकरी बडवली जातीये उरबडवी माझ्या काळजात
जिला खात खात
माझे रोडरोमियो डोळे पडतात अडखळून एकमेकात
आणि खळखळून हसत चालायला लागतात
हा रोड
जिथे सगळेच चेहरे भुंकतात एकमेकावर
एकमेकाच्या मेकपमध्ये
हा रोड
जिथे सगळेच कपडे जळतात एकमेकात
एकमेकांच्या मत्सरी नजरातून
अनाकलनीय आहे
हा रोड जो सुरु होतो माझ्या काळजातून
कुठे संपतो
हे मलाही माहीत नाही
गेली पंधरा वर्षे मी त्याचा अंत जाणण्यासाठी
ह्या रोडवर चालतोच आहे

## शाहू मिल

काळ खुर्ची टाकून बसलाय मिलसमोर
आणि मिल बलात्काराच्या भयाखाली
नऊवारी गच्च नेसून
त्वचेतल्या त्वचेत रावतीये
तिचे सारे दागिने हिसकावून घेतले गेलेत
आणि काळ कधीही आत घुसून
कपडे उतरवू शकतो
तिच्यावरील डोक्यात उरलेला नाही ती असलेल्या कामाचा आनंद
आणि तिचे हात आत्महत्या करत
स्वत:च्या प्रेतावरील घाम पुसतायत
तिचा प्रत्येक श्वास जन्माला आल्याबद्दल पश्चाताप करतोय
आणि प्रत्येकाचे डोळे पंचगंगेवरील स्मशानाकडे लागलेले
आपण कधीतरी मरणारच आहोत
हे कळून चूकलय तिला
फक्त ती कुणाशीच त्याबद्दल बोलत नाहीये
चर्चा मरण थांबवू शकत नाही
आणि मरण अफवाही असू शकतं
मिल काळाच्या देखरेखीखाली मोलकरणीसारखी
काळाची भांडी घासतीये
आणि काळ तिला कमीत कमी इजा होईल असं मरण शोधण्यासाठी
खुर्ची टाकून निवांत बसलाय

## राजवाडा

मला फक्त भिंत समजू नका
किंवा ऐतिहासिक दस्तावेज

माझ्यावर कित्येक शतकाच्या सह्या असल्या तरी
माझ्यावर कित्येक भूतकालीन ग्राफिटीज असल्या तरी
माझी अजून मुतारी झालेली नाही
माझ्यात चालायंच असेल तर आदबीन चाला
कदाचित तुम्ही जिथे ठेवताय पाय
तिथे असेल शाहू महाराजाचा भरभक्कम ठसा
मी मौन आहे ह्याचा अर्थ
मी मुका झालोय असा नाही
मी माझ्या जीभेला फक्त लांब उडी मारण्याची प्रॅक्टिस देतोय
एवढंच

## साठमारी

हत्तींची संख्या कमी होत गेली
तशी गणपतींची संख्या वाढत गेली
पार्वतीचा मळ वाढत गेला
साठमाऱ्यांची संख्या कमी होत गेली
तशी गणेशोत्सव मंडळे वाढत गेली
मारामारीचा चळ वाढत गेला
आता तू इथे अशी एकटी
स्टेडियमला बिलगून
तुझ्या शेजारी लोक खेळतायत फूटबॉल
आणि तू बसलीयेस इथे हत्तीची प्रतिक्षा करत
तुझ्यासाठी हत्ती आणायचा कोठून?
हत्ती फुटबॉलसारखे दुकानात विकत मिळत नाहीत
नाहीतर आम्ही कोल्हापूरकर इतके शिगोशिग राजेशाही
की हत्ती आणि फुटबॉल एकाच दुकानातून खरेदी करुन
हत्तींनाच लढवलं असतं फुटबॉलसाठी
त्यांच्याच आपापसात टीमा करुन
हत्तींच्यावरुनच केल्या असत्या मारामाऱ्या आपापसात
आणि हत्तीच कापले असते भर बाजारपेठेत मॅचवरुन
आता हत्ती नाहीत
आणि तू अशी राजेशाही दिमाखात एकटी पडलेली
तुझ्या शरीरावर माझे जुळे दोन लहान भाऊ
हत्ती आणि वीर बनून
बालपण खेळवतायत
आणि मी
तुझी खऱ्या हत्तींची वाट पाहणारी नजर सोसत
तुझे साठमारी खेळणारे डोळे
माझ्या डोळ्यात फुटबॉलसारखे खेळवत
तरुण होतोय

## एफ एस सेंटर

इथे शरीराला खिडक्या नाहीत
जे दरवाजे आहेत ते खुले आहेत
कुठलाच श्वास नाही इथे वैयक्तिक
जी हवा वाहतीये ती सामूहिक आहे
कपड्यांची उलाढाल नाही
कपड्यांच्या वाटाघाटी नाहीत
आहेत त्या फक्त त्वचा
आणि त्वचेकडे त्वचा म्हणून पाहणारी मुक्त त्वचाळू नजर
ह्या मुक्ततेला स्टॅम्प नका मारु
ही मुक्तता आहे आदिम संभोगाची पहिली सही
जी लेखनाआधीच जन्मली होती शरीराच्या वहीत
आणि वाचणारा नागडाच होता बारामाही
कपडे त्याच्या मागावर होते
आणि तरीही त्याने ही सही सुखरुप पोहचवली ह्या मुक्ततेत
या दरवाजे उघडेच आहेत ह्या मुक्ततेचे
जिला भिंती नाहीत
आणि तुम्ही तुमची त्वचा मोकळी अंथरली
की झालीच जिची जमीन
तयार

## आझाद चौक प्ले कॉर्नर

हा ब्लॅक बोर्ड नाही
हा आहे मैदानाचं ब्लॅक अॅन्ड व्हाईट प्रक्षेपण
अरविंद ट्रान्सफॉर्म करतोय आख्खा ट्रान्झिस्टर त्याच्या हस्ताक्षरात
डाव्या बाजूनं सरकत उजव्या बाजूपर्यंत
प्लेयर कॉं  गो  स्कोअर
एकूण बाद धावा अवांतर
डोळे ऐकतायत क्लीन बोल्डचा आवाज
कान झेलतायत पकडलेले आणि सोडलेले झेल
आख्खं कोल्हापूर खेळतय इथल्या स्कोअर बोर्डवर
इंडियाच्या वतीनं जीवघेणा सामना
आणि इतका काळ रस्त्यावर उभं राहूनही
थराराचे उत्सुक पाय दुखत नाहीत क्षेत्ररक्षण करुन

## मच्छीमार्केट

मी माश्याना खायला नकार देत ह्या मच्छीबाजारातून चाललोय
आणि मासे मी गोवेकर असूनही खायाला नकार देतोय म्हणून
बाजारात जिवंत होतायत मी नजर टाकतोय तो मासा
माझ्या डोळ्याशी डोळा भिडवून मला सांगतोय थँक्स मी
नाही वाचला पण निदान एक भाऊ वाचलाय तुझ्या ह्या निर्णयानं
माझ्या अंगाला समुद्राचा वास येतोय त्याचं पाणी माझ्या त्वचेवर
अहिंसा वाजवतय बांगडे भांगडा करतायत टोपलीतल्या टोपलीत
आणि पापलेट पापातून मुक्त झाल्यासारखे एकदम धर्मगुरुसारखे
दिसायला लागलेत मी त्यांच कन्फेशन कानात ओतून घेतोय जसा शूद्र
वेद ऐकल्यानंतर शिश्याचा रस कानात ओतून घ्यायचा तीसऱ्या माझ्या
बोटांच्या फिरक्या घेत मला अंगठ्या चढवतायत आणि चुकूनच दिसणारा
टाईल तर फ्रीस्टाईल कुस्ती खेळायला मिळाल्यासारखा अंग
घुसळतोय गोडमासे तर सडेतोड उत्तर गवसल्यासारखे फुशारलेत
आणि अख्खा मच्छीबाजार हे काय होतय म्हणून अचम्बित नजरेने
माझा चेहरा पाहतोय
फक्त एक देवमासाच तेवढा दिसत नाही विकायला आलेला
तो बहुधा परमेश्वराच्या पोटात माझी वाट पाहतोय

## एस टी स्टॅन्ड

माणसं उतरतायत
आणि चढतायत
समोर दोन हॉटेल आणि तिसरं आसपास
ज्याला सह्याद्री चढायच त्यानं सह्याद्री चढावा
ज्याला महाराजा व्हायचय त्यानं महाराजा व्हावं
आणि ज्याला मोक्ष हवासा वाटेल त्यानं गोकुळात शिरावं
तुझी नजर निरोप देताना त्रयस्थ
आणि स्वागत करताना तटस्थ
किती प्रवास तुझ्या अंत:करणावरुन चालले

किती प्रवास तुझ्या मांड्यात हेलपाटले
किती प्रवासांनी तुझ्या नाकात दम सोडला
आणि
काही प्रवास तर तुला फक्त वळसा घालून निघून गेले
तुझ्या डोळ्यांना सतत हालचालीची सवय
आणि ओठावर कायम मिशी येण्याच वय
प्रत्येक माणूस कधीतर तुझ्या इथं येणारंच येणार
प्रत्येकाच्या पायावर तू कधी ना कधी तुझं नक्षत्र ठोकणार
तुझी नक्षत्रं संपत नाहीत
इतकी तुझी पोतडी अफाट
आमचे प्रवास आटत नाहीत
इतकी आमची पावले असंख्य
आमच्या घरापासून निघालेला एक रस्ता
रस्त्यावरनी शेवटी थेट तुलाच मिळतो
तू आमच्या घराचा दी एन्ड आहेस
आणि पाहुण्यांची दि बिगिनींग
येणारा जाणारा प्रत्येक माणूस
एका डोळ्यात घर
आणि दुसऱ्या डोळ्यात तुला घेऊनच हिंडत असतो
तू जागचा हलतही नाहीस
आणि ह्या शहरात
सर्वाधिक भटकंती करणारे पाय
तुझे आहेत

## उद्यमनगर

मी चाललोय
जीभा हसतायत
नेहमीप्रमाण भूक माझ्यासमोर फोल्ड करत
डोळे वेल्डिंग काम करतायत
नेहमीप्रमाणचं आंधळे होण्याची रिस्क होल्ड करत
श्वास जिवंत राहण्याची धडपड करतायत
नेहमीप्रमाणचं हवेकडून ती अमर आसल्याचं आश्वासन मोल्ड करत
कुठल्याच पाठीची साजरी झालेली नाही गोल्डन ज्युबिली
ह्या उद्यमनगरीत
आणि प्रत्येक पाठ तरीही साजरा करतीये
कुठल्यातरी अद्‌भूत एनर्जीने रोजच स्वत:चा नवा वाढदिवस
मी नेहमीप्रमाणचं चाललोय ह्या मेटॅलीक रस्त्यावरुन
वाढदिवस अटेन्ड करत
आणि काळ
त्याची डॅमेज झालेली मशिनरी
त्या अद्‌भूत एनर्जीने रिपेअर होतीये का
ह्याची चाचपणी करत
नेहमीप्रमाणच
माझ्या पाठीवर बसलाय

## डोंबारवाडा

चन्द्र चमकतोय
आणि दोन कोवळ्या पोरी
पैसे घेऊन
त्वचेच्या माचीसवर संभोगाची काडी ओढतायत पेटवतायत
चन्द्र चमकतोय
आणि दोन पुरुष
नवटाकमध्ये काळोखाचा सोडा टाकून
राड पावलांनी त्या पोरींचा उजेड पितायत
एक कोंबडी झोप उबवत बसलीये
चन्द्र चमकतोय
आणि शिवाजी विद्यापीठाकंड शिकायला गेलेला हा रस्ता
पुन्हा स्वत:त परततोय
नो ॲडमिशनचा शिक्का माथी घेऊन
चन्द्र चमकतोय
आणि माझा दु:खी हात चन्द्राला ऑफ करता येत नाही म्हणून
असह्य होऊन कविता लिहितोय

## हुतात्मा पार्क

ज्या बागेचं नाव हुतात्मा
तिथे फुलांना काय नाव देणार?
म्हणूनच ह्या बागेत मी फुलांना नाव देत नाही
किंवा त्यांचे रुपही पहात नाही
फक्त माझे डोळे मिटून घेऊन
निपचीत पडून राहतो
विश्रांतीच्या बाकावर
लोकाना वाटतं मी झोप घेतोय
मी खरंतर मरणाची प्रतिक्षा करत
अंहकाराच्या हौतात्म्याची वाट पहात असतो

## फुटबॉलपटू

प्रकाश रेडेकर गोविंद जठार सदाशिव मंडलिक
त्यांचे पाय आता अस्ताला चाललेत मात्र डोळे अद्याप
फुटबॉल खेळतायत
कोणत्याही क्षणी त्यांचा चष्मा आता फुटबॉलपेक्षाही मोठा होईल
आणि ते नजरेच्या म्हातारपणात बसून राहतील
हा खेळच असा
की तो तुमचा फॉर्म मागतो आणि वयातील वीज
त्यांच्या नाकपुड्या आता श्वासांच्या पुड्या बांधायला लागलेत
आणि फुफ्फुसाची जमीन ऊस काढण्याइतकी प्रबळ राहिलेली नाही
हे पीकचं असं की पाणी खूप मागत
आणि देहात आता थेंबही शिलकीला टाकताना
पाय अवघडतायत
त्यांनाही माहितेय
हे मैदान आता सोडायचय
कितीही झाले तरी कोल्हापूरचे स्थानिक खेळाडू
इथल्या सगळ्या ढाली ह्या फक्त कोल्हापूरपुरत्याच गाजणाऱ्या
ते खेळले ते आनंदासाठी खेळले
आणि त्यांना आता त्या आनंदातून रिटायर व्हावं लागणाराय
त्यांचे डोळे कोणताही गेम शेवटचा ठरु शकतो
ह्या विचारानेच अवघडतायत
आणि मैदानावर उंच होत चाललेल तारुण्याच गवत
त्यांच्या पायापेक्षा स्वत:ची उंची वाढवत
त्यांना आमच्या नजरेतून नाहीसं करत चाललंय

## हे शहर

ह्या शहराला हत्तीचे कान आहेत
त्यात बहिरे राहतात
ह्या शहराला घुबडाचे डोळे आहेत
त्यात आंधळे राहतात

ह्या शहराला डॉयनॉसरचे पाय आहेत
त्यात पांगळे राहतात
ह्या शहराला माकडाचे हात आहेत
त्यात थोटे राहतात
ह्या शहराला कवीची जीभ आहे
त्यात मुके राहतात
ह्या शहरात एक प्राणीसंग्रहालय आहे
त्यात सर्वांना दाखवण्यासाठी
धडधाकट माणसे ठेवली आहेत
विदाऊट तिकीट

## हे शहर : २

मी प्रत्येक चेहऱ्याला लटकतोय घड्याळासारखा
मी जाईल तिथे वाजतायत माझ्याच काळजाचे ठोके
दर तासाला
मी काळातून प्रवास करत
ह्या शहरात कुठं आलोय ह्या काळजात बसून
मी ह्या शहरात सर्वत्रच उगवतोय बहुधा
आणि मीच गहाळ होत चाललोय बहुधा माझ्यातून
अरे कुणीतरी ह्या शहराला आवरा
त्याच्या हातात एक गन आहे
आणि ती माझ्या काळजाच्या दिशेने रोखलेली आहे

## वाघ

एक वाघ
कधीपासून हिंडतोय ह्या नगरीच्या आसपास
कुणालाच सापडलेले नाहीत त्याचे नरभक्षक दात
पण त्याने खाऊनही
शिल्लक राहिलेली माणसे
सापडतात प्रायोगिक नाटकाच्या अवयवबाज नेपथ्यात
परवापासून त्याच्या शेपटीचे फोटोही
प्रकाशित होतायत पेपरात
आणि आत्ता आत्ता तर
संपादकाच्या लेखणीतूनही ऐकू यायला लागल्यात त्याच्या गर्जना
आख्खी नगरी त्या ऐकत जागी आहे
आणि वाघ स्वत:संबंधीचे न्यूज कटींग वाचत
थरार अनुभवतोय

## युगांतर फिल्म सोसायटी

सगळे डोळे मांडी घालून खुर्च्यांत ताठ
पडद्याच्या पात्रातून दृश्यांची नदी वदलतीये
माणूसकीचे रंग
माणूसपणाचे अंग
एक गंभीर शांतता तिचे पैसे वसूल करत
म्हशीसारखी बसलेली बुबुळात
काहीतरी थेट उतरतय प्रत्येकाच्या काळजात
स्वत:ची हत्या
किंवा स्व ने केलेली हत्या
प्रत्येकजण पडद्यावर पाहतोय स्वत:चा मर्डर
आणि इनवेस्टीगेट करतोय
बाहेर मात्र कमर्शिअल रस्त्यांचे फिल्मी ट्राफिक
आणि सुहास हवालदारासारखा हातवारे करत
गंभीरतेसाठी लागणारे पैसे कमी पडतात म्हणून
स्वत:कडे वळवू पाहतोय एक रस्ता
ज्याच्यावर एकही नाही
त्याला हवी असलेली आर्टिस्टिक गाडी

## झू

कुत्री संगीत कम्पोज करतायत
झाडं फूलं मॅनेज करतायत
उंदीर चोऱ्या करतायत
मांजरं लाडीगोडी लावून दूध उकळतायत
अस्वलं भिती दाखवून केसाचेही पैसे घेतायत
माकडं खेळाडू होऊन मानधन उकळतायत
बैल रोजगार हमी योजनेत कामाला लागलेत
गायी वासराना जन्म देतायत
आणि माणंस ह्या प्राणीसंग्रहालयात
खुर्च्या टाकून
बातम्या वाचतायत

## पालिका

एक कार्पोरेटर तुटलेला हात हातात घेऊन उडवतोय
दुसऱ्या कार्पोरेटरच्या श्वासाची माशी
एक पाय तुटलेला कार्पोरेटर खेळतोय
त्या तुटलेल्या पायाला कापड बांधून
शिवाजी स्टेडियमवर फुटबॉल
एक ओठ फाटलेला कार्पोरेटर
तुटलेल्या हाताचा तुकडा सभागृहात ठेवून
त्याच्याकडून घेतोय वाचून
रस्तारुंदीचा प्लान
एक जबडा निखळलेला कार्पोरेटर चघळतोय
स्वत:च्या अक्कलदाढेत
ठरावासारखी आख्ख्या लक्ष्मीपूरीची मान
एक मान कटलेला कार्पोरेटर दाखवतोय
तलवारीला मुंडक अडकवून
कसं जिवंत रहायचं त्याचं प्रात्यक्षिक
एक कार्पोरेटर लिव्हरला लिव्हरोसिस होऊनही
हातभट्टीची दारु पीत मारतो आहे
सत्तेच्या हवेत काविळीची कीक
एक कार्पोरेटरचं काळीजं हिंडतय आवारा
स्वत:च्या उरात शिरलेला सुरा दाखवत निरुपाय
एकाचं लिंग थेट बाईत ओणवं होऊन
तिला ऑरगॉझमचा आनंद देतय शरीराशिवाय
एक डोळा कॅमेऱ्यासारखा हे सगळ नुस्तचं टिपतोय
स्वत:चं बुबुळ करत क्लीक
आणि हे शहर त्या क्लीकचा आवाज ऐकत कागदात पहात राहतं
स्वत:चाच जळणारा फोटोग्राफ
ऑटोग्राफिक

## मनुष्य

माणसं चांगली की वाईट
मला माहीत नाही
मी सर्वत्र चोगला असण्याचा प्रयत्न करतोय
माझा प्रयत्नच सांगतो
की मी वाईट मनुष्य आहे
ज्याला चांगलं बनायचं आहे
इतरांचही असंच असेल

## चन्द्र

हा चंद्र
जो मी आता पाहतोय
सातवाहनांनीही पाहिला असेल
यादवांनीही ह्याला पाहून आपली संकष्टी सोडली असेल
ताराराणीनं ह्याला पहात
आपला घोडा फेकला असेल
आणि शाहू महाराजांना ह्याच्याच प्रकाशात दिसला असेल
बण्डाचा मार्ग
हा चन्द्र
जो मी आता पाहतोय
आरश्याप्रमाणे सारे चेहरे पचवून
सामोराच आहे
त्याला हेही माहीत नसेल
त्याच्यावर कुणी कवी ह्या क्षणी कविता लिहितोय
तो नेहमीसारखच एक नजर
ह्या शहरावर टाकेल
आणि तास संपला की मास्तरांसारख्या शांतपणे मला पचवून
शहरासमोरुन गायब होईल

## कोल्हापुरी दादा

माझ्या ह्या व्हायोलंट हातावर प्रेम कर
ज्यांनी केलेत दोन मर्डर
सात हाफ मर्डर
पाटाकडील तालमीशी केलेल्या मारामारीतून
वाहिलेलं हे रक्त
कूकू म्हणून लाव
आणि शिवाजी पेठेत मी यदाकदाचित मारलो गेलोच
तर आपल्या गल्लीवाल्या सावंतकडून पांढरी साडी घे
इतर दुकानात गेलीस
तर मेल्यानंतरही सफाचोट करीन

## कोल्हापूर : कार्पोव्ह चेस क्लब

सगळीकडं बुध्दिबळच दिसतय आजकाल
झाडानांही पानं येत नाहीत प्यादी येतात
आणि त्यांच्या मुळांशी एखादा कॅसलिंग झालेला राजा असेल
असं वाटत
काशीनाथच्या धूर्त डोळ्यात एक घोडा सतत अडीच घर नाचताना दिसतो
तर मिलिंद गुर्जर हत्तीसारखा दुडक्या चालीनं
आख्खं शहर काबीज करत सुटलाय की काय अशी शंका येते
राजाला तर उंटान पछाडलाय असं वाटतं
आणि त्याच्या चालीतला तिरकसपणा वाढतोय
असंही वाटत
श्रीनिवास तर पहिल्याच मूवमधल्या प्याद्यासारखा
नोकरीच्या सिसिलीयन बचावात भांबावलेला
आणि राजा कुमठेकर आयुष्याची चौसष्ठच्या चौसष्ठ घरं रिकामी बघून हसत
हसत जोक मारत
डोक्याला हात लावून बसलेला दिसतोय
आपण सगळेच हळूहळू निष्णात होत चाललोय चेस खेळण्यात
आणि एकमेकाला चेस करण्यात
असं वाटतंय
आणि असंही वाटतय की आपल्या सगळ्याचीच डोकी रिकामी आहे
म्हणून Empty MindsDevils Workshop च्या तालावर
आपण हा सैतानाचा वर्कशॉप चालवतोय
आपणाला माहित नाही ही बुध्दीबळची चौसष्ठ घरं
आपणाला कुठे घेऊन जाणार आहेत
आणि तरीही आपण सगळ्या शहराला बुध्दीबळाविषयी मार्गदर्शन करतोय
आपण समजतोय की आपण ह्या शहराचे वजीर आहोत
आणि शहरातले सगळे राजे
आपआपल्या चेक करत चेक देत
आपणावर पध्दतशीर चेक ठेवतायत

## एकतीस डिसेंबर

पुन्हा एकदा उगवणार नव्या वर्षाचं मूळ डोक्यात बहुधा
पुन्हा एकदा कापावे लागेल डोक्यावरचं हे जुनं वर्ष
जे थेट वाढत वाढत माझ्या पायापर्यंत पोहचलय
काळाचं कटिंग सलून जोरात आवाज करतय आज
कयामतीचा निवाडा आणि तो साक्षात अल्ला आजच्या दिवशी
खरतर ह्याही वर्षी खूप पाऊस कोसळले केसात
ह्याही वर्षी खूपदा सर्दी झाली
खूप उन्हाळे आदळले केसाच्या काळ्याभोर रंगात
ह्याही वर्षी अंगावर घामोळे उगवले
शेवटी जटा झाल्या
आणि मी देवीसारखा कोल्हापूरभर
दु:खी चेहऱ्यानं फिरलो
पायापर्यंत वाढत जाणाऱ्या जटा
अंगभर लोकांनी बांधलेला भंडारा
आयुष्याचं चौंडकं ह्याही वर्षी जोरात वाजलं
आणि ह्याही वर्षी मधूनमधून कवितेच्या देवीचा संचार झाला
आता ह्या एकतीस डिसेंबरला
मी पुन्हा बसलोय काळाच्या कटींग सलूनमध्ये
जटानिर्मूलनासाठी
आणि एक जानेवारी माझ्या डोक्यातून जट उगवण्याची वाट पहात
टाळूत दबा धरुन बसून आहे

## शेवटी

मूर्खतेने भरलेली विद्वता काशीहून आली
दिल्लीला ना दिल ना दिमाग
तिथून वासना आली वसने आली
कलकत्याहून आली वैध्दिक कलकल आणि सौंदर्याचा अडकिता
मुंबईहून पटापट कमर्शिअल मुके घेणारी बाई आली
मद्रासहून आजली मदाची रास आणि मशाचा डास
आणि सरतेशेवटी आली पुण्याहून शेवटची पुण्यवान
जी सगळी आनबानाशान
उणे करुन नाहीशी झालीट

## हायकू

१
तुझे सुनाऊ क्या
कोल्हापुरी हायकू
कायकू?
२
प्रेम
गावणे
मावणे

गमावणे
३
मुतारी
प्रत्येकजण वाजवतोय
एकतारी

## कलकल

ती सतत चाललीये
कूतूहल आणि कोलाहल
ह्यांच्यामध्ये चटका देत
तिचे पाय बदलतायत
सतत माझ्या डोळ्यात आकार
आणि ती तिची निराकार जीभ
लपवतीये माझ्या जीभेत
ती वाढवतीये
एखाद्या चेटकिणीसारखी माझ्या जीवाची काहिली
आणि करतीये माझ्या पेंशीत
तिच्या खालीपिली आवाजाचा गलका
अंगभर माझ्या त्वचेचे काढत छिलके
ती वाजवतीये कम्युनिकेशनचा इदरकल्याणी बेण्डबाजा
आणि मी आता तिला टॅप करायचा प्रयत्न करतोय
तर ती माझ्या टपोरी आयुष्याचा टप टपाटप वाजवत
निसटून चाललीये माझ्या त्वचेवरुन डासासारखी
तिच्यामुळेच होतो आहे माझ्या आयुष्याचा पचका वडा
आणि तो पचवताना पडलेले माझे दात
चुरुचुरु पचवत
ती निवांत ढेकर देतीये
माझ्या जीभेत

## ॲग्रीकल्चरल नॉनॲग्रीकल्चरल करताना

रात्र वळीचा आहे
आणि मी वामनपावलांचा अंदाज घेत दिव्यात उभा
माझं पीक लुगडं नेसून उभं आहे लक्ष्मीच्या स्वागताला
आणि जमीन तिच्या पावलात समृध्दीचा एनसायक्लोपिडिआ वाचतीये
उद्यमनगरातील थंडी थडकतीये थेट माझ्या शेतावर
आणि मी सावधपणाच्या उकडत्या शर्टात
माझ्या जमिनीखालच्या पातळासकट जमिनीवर उभाय
वामन कुटूनही येऊन
माझा बळी घेऊ शकतो
आकाश लवथवत ओथबूंन आलय काळ्या पावलांनी
आणि वामन
शीळ घालत माझ्या जमिनीकडं येतोय
वामानाला शेती करता येत नाही
म्हणून तो नमनाला
फॅक्टरीतून आणलेलं घडाभर तेल घालतोय
दिवा नाव्यात घेण्याची
ही खास नॉनॲग्रीकल्चरल रीत
वामन मागतोय जमीनीचं दान
आणि मी जीभेला मारुन गाठ
नकारात ठाम आणि ताठ
प्रथम नॉनॲग्रीकल्चरल लॅण्ड
मग बिल्डींग
मग फ्लॅट
वामन मला जिंकू पाहतोय
तीन कॅलक्युलेटीव पावलं टाकत
आणि मी दिव्यात उभा राहून
माझ्या पावलांना नकार शिकवतोय
माझी पावलं करतायत दिवाळी साजरी
आणि वामन
त्याच्या पावलांना नव्याने धार काढण्यासाठी
उद्यमनगरात चाललाय

## कारमधून कोल्हापूरबाहेर भटकताना

जितकी माणसे त्याहून आधीक झाडे हवेलाही श्वास घ्यायला मनसोक्त जागा
ढगांचे घोडे ढाकळे आधीक मोकळी आभाळाची पागा
ऊस दोन्ही बाजूस उभा उन्ह पीत पाणी पीत
त्याला आख्खी जमीन पिण्याची तहान लागलेली
मधूनच हातभट्टीची पेटी नाकात श्वास गुदमरवणारी
दारात शेतकरी शेतमजूर आयुष्यात वाकून बसलेले
डोळे विझून गेलेले पण आयुष्य पाहण्याची उमेद अद्यापही ज्वालाग्रही
जमिनीच्या आग्रही आरश्यात स्वत:लाच वाकून पहात
बांगड्या वाजवत कष्ट करणारे असंख्य हात निग्रही
ह्यांना जमिनीला कुणी बांधून ठेवले कधीच कळणार नाही
हे जमिन सोडून शहरात कधी येतील की येणारच नाहीत कधीच कळणार नाही
कारमधल्या बोलघेवड्या जगात सगळे घेवडे फक्त भाषेतच पिकलेले
तावदान डोळ्यांनी नांगरत पापणीचे झुकलेले पान असंतुष्टपणात टिकलेले
ओठ लाह्यासारखे फुटतायत
कार आणि शेत यांच्या दरम्यान आस्थेचे अदृश्य पूल
बांधले जाण्याआधीच वेगामुळे तुटतायत
एक मग्रूर पेट्रोली आग
रस्त्यावरुन धावतीये
पळसाला असलेल्या तीन पानासारख्या अधूनमधून क्रिकेटच्या तीन स्टम्पस
पोरांचा बॉलींग करतानाचा जमाव
चेंडू बालपण सेलिब्रट करत हवा तसा उंडारतोय
खळकन कारची फुटलेली काच
आमच्या डोळ्यात काचा घुसलेल्या नाहीत
पण चेंडू आरपार घुसलाय
कार धावतीये
आणि पोरं चेंडूसाठी आकांताने मागे
आरश्यात पोरं मागं पडतायत
आणि हळूहळू शेतासकट नाहीशी होतायत
कार पळतीये
आणि आम्ही पळून चाललोय
चेण्डू घेऊन

## कवी

## कोल्हापूरी : फर्मान

उद्देश : करवीर इलाख्यातील आमच्या सर्व प्रजाजनांना लिहिता-
वाचता येऊन आपली स्थिती ओळखून त्यांनी समर्थ व्हावे म्हणून
खाली दिल्याप्रमाणे नियम करण्यात येत आहेत
सर्व आईबापांनी आपली शिक्षणयोग्य वयाची मुले शाळेस
पाठवली पाहिजेत शिक्षणास योग्य वयाच्या मुलांची यादी
मामलेदाराने पाटील कुलकर्णी, शाळा खात्यातील नोकर वा त्या
त्या ठिकाणच्या सभ्य गृहस्थांच्या मदतीने तयार करावी.
मुलांची यादी प्रसिध्द झाल्यापासून तीस दिवसाचे आत .

अथवा जर अपील केले असेल आणि अपिलात माफी मिळाली
नसेल तर अपिलाचे निकालाची समज मिळाल्यापासून मुले शाळेत
पाठवली पाहिजेत तीस दिवसाच्या आत वा सत्वर
मुलांना शाळेत न पाठवल्यास मामलेदाराने पालकांस समन्स
काढावे आणि त्यांचे म्हणणे ऐकून घ्यावे
ते म्हणणे संयुक्तिक न दिसल्यास प्रत्येक मुलाबद्दल प्रत्येक
महिन्यास शाळेत जाईपर्यंत एक रूपया दण्ड करावे
तीस दिवसाचे आत दंड न भरल्यास लँड रेव्हेन्यूच्या नियमाप्रमाणे
जंगम जिन्दगी जप्त करून दंडाचा वसूल करावा
ता.क.
कळविण्यात येते की छत्रपति शाहू महाराजांचे निधन झाल्याने
ह्यापुढे हा आदेश संस्थानातील सर्व कवींनी कविता म्हणून त्यांच्या
काव्यसंग्रहात समाविष्ट करावा आणि सर्व निरक्षर मंडळीपुढे तो
साक्षर होईपर्यंत कविता म्हणून अधून मधून वाचावा.
**उद्देश :** त्यामुळे कवींना ते आणि त्यांची कविता नेमके कुठे आहेत
ह्याची जाण येईल
आणि त्यांचे भान जाणार नाही
कळावे....

## मराठी कवी

एक कवी वाचला
की कळायला हवं एक संपूर्ण शहर
किंवा एक संपूर्ण गाव
पण मराठी कवी राहतायत
एका अशा नंदनवनात
जिथे कवितेचा परमेश्वर त्यांना पाठवतोय
कवितेचे ॲपल खाण्यासाठी
बायकोबरोबर
आणि मराठी कवी साप आपल्या बायकोचे कपडे उतरवेल
ह्या भयाने ॲपल खाण्याऐवजी
सांभाळताहेत
आपले आणि आपल्या बायकोचे कपडे
भाषाभर

## तुकारामास

जे अभंग झालेत
त्यांनीच लिहावेत तुझ्यावर अभंग
मी आहे कवी
गळ्यात मनसोक्त नाचणारा
ठायी ठायी तृष्णांनी
उडवेलत माझ्या ठिकऱ्या ठिकऱ्या
आणि मी
त्यांच्या आवाजांच्याच वाजवत टिपऱ्या
ह्या जमिनीवर
अद्याप दांडीया खेळतोय

## समर्थ रामदासांसाठी मनाचा श्लोक

थोडंसं वेड्यासारखं बरळावं
थोडंसं वेड्यासारखं चालावं
थोडंसं दिशाहीन असावं डोळ्यात
थोडासा वाजू द्यावा पाचोळा पायात
थोडंसं माणूस असावं
शहाणपणाच्या पंचवार्षिक योजनेत

## पहिला क्षण

रात्रभर येत राहिला पावसाचा आवाज
पण धारा कोसळल्या नाहीत
शेवटी दिवसा बाहेर पडलो
हा काय चमत्कार आहे पहायला
तर गल्लीत पावसाचंच म्युझीक
ते गुणगुणत दिवसभर शहर हिंडलो
पण धारा कोसळल्या नाहीत
रात्री घरी परतलो तर
घरभर पावसाचा फक्त आवाज भरून राहिलेला
रात्रभर स्वप्नात पाऊस ढुश्या मारत राहिला
पण मी उठलो नाही
पहाटे जागा झालो
तर संपूर्ण शहर पाण्यात बुडालेलं
आणि पाऊस दारात
कविता गुणगुणत उभा
मी त्याला त्या दुबळ्या क्षणी आत घेऊन
फक्त 'बस' म्हणालो
आणि मग कायमचा कवी झालो

## कविता : कोल्हापुरी

मारामारी म्हणजे शस्त्राच्या पायापाशी बसून
जगायचं कसं हे शिकणं
खरतरं बुध्दही ज्याच्याशी लढला तो मार होता
आणि त्यानं जी केली तीही मारामारीच होती
पण कोल्हापूरात मारामारी म्हणजे आय झवणं
आय म्हणजे कॉंग्रेस आय किंवा इंग्लीश आय मधला आय
किंवा जन्मदात्री आई
सगळे मारामारी करणारे हे आयला एकतर सामील
किंवा आयला झवायला सामील
त्यामुळेच कोल्हापूरात प्रेमानंही एकमेकाला म्हणतात
रांडेच्या आणि उस्फूर्त उद्गारतात. "च्यायला!"
तुम्ही कोल्हापूरात फुटबॉलमध्येही प्रतिस्पर्ध्यांची आय झवता
आणि पाऊसही तुमची आय झवतो
एकंदरच हे शहर असं आय झवाडं
इथे कविता लिहिणारा उंडगीचा असू शकतो
आणि कविता वाचणारा फोदरीचा
तर अशा ह्या शहरात तुम्ही कविता काय लिहिणार?
म्हणून मी इथे कविता लिहित नाही
स्वत:शी मारामारी करत भाषेची आय झवत असतो

## आई

त्वचा खायाला घालून पोट भरणारी एक बाई
आमच्या शेजारी राहायची
तिला वाटायचं मी अद्याप बाळच आहे
आणि ती मला पॉपीन्सची एक गोळी खायाला घालून
'आई'
म्हणायला लावायची
मी सगळं कळून सवरूनही
माझ्या आईनं मला सांगितल म्हणून

तिला 'आई' म्हणायचो
आणि ती नवऱ्याने वांझपाणापोटी टाकून दिलेले तिचे हात
माझ्या चेहऱ्यावरून अतोनात प्रेमानं फिरवायची
आजही कविता लिहिताना
माझ्या हातामागे जाणवतो तिचाच हात
आणि मी कविता लिहताना
तिलाच लिहित जातो

## ए

ए काय वाचतोयस
कविता ?
काय कामं नाहीयेत ?
फुकट वेळ मिळतोय म्हणून काहीही करायचं ?
सोड ना
पुस्तक मिट
पुन्हा डोळ्यांची उघडमिट
ती पापणी जरा गुंडाळ
हे गुऱ्हाळ नाही ऊस खाल्लायस ?
माज्याकडं ये मी खायाला घालतो मिसळीबरोबर
कविता
वाच की गीता गीता साने नव्हे ती पोरगी
हा ग्रंथ रवंथाला बरा
अजून टीव्ही आलेला नाही आपल्याकडं म्हणून बरं
तिकडं मुंबईत बोंबाबोंब
कविता वाचतय कोण?
की कवी आहेस?
मग बोलणंच खुंटल.

## उदाहरणार्थ मृत्यू वगैरे (सादर करताना)

पापालाल शेखनी चंढवला माझ्यावर नचिकेताच्या भूमिकेसाठी वीग
आणि मी मीग विमानाच्या वेगाने चिरंजीव झालो
मृत्यूशी बोलणे महाकठीण
एकतर तुम्हाला त्यासाठी मरावं लागतं
वर मेल्यानंतर पुन्हा बोलण्यासाठी
जिभेत जिवंत असावं लागतं
माझी जीभ मी मेल्यानंतरही जिवंत राहिली
कदाचित कवी असल्याने असेल
तर जयसिंग नेमका प्रकाशयोजनेत प्रकाश चुकला
आणि प्रेक्षक अंधारात माझी जीभच ऐकत राहिले
काही वेळाने तर मृत्यूची बायकोच
घरी लवकर जावे लागते हे सांगून भूमिकेतून पळून गेली
आणि साक्षात मृत्यूदेव गडबडला स्वत:च्या भूमिकेत
तरी बरं राजकुमार आत लपून प्रॉम्प्टींग करत होता
पण तोही कुणाला दिसत नव्हता
कदाचित तोही कवी असल्याने असेल
मृत्यूदेवाने प्राम्प्टींग ऐकत रेटत न्हेली स्वत:ची भूमिका
तर ऐनवेळी ऑर्फियसचं म्युझिक टेपमधून वाजेना
लोकांनाही ही शांतता काव्यात्मक वाटली
कदाचित एकसंबेकरही कवी असल्यामुळे असेल
उदाहरणार्थ मृत्यूमधून सरकत राहिलेलो आम्ही तिघेजण
आपटत राहीलो एकमेकावर रोलमधून
तर मृत्यूला साक्षात अभिनयासाठी टाळ्या मिळाल्या
कदाचित बण्ड्या ही कवी असल्यामूळे असेल

एकांकिका अंधारातच संपली तेव्हा
प्रेक्षकही अंधारातून परतू लागले
आणि एकजण म्हणाला
कवी कुठेही कलमडले तरी बरोबर पायावरच पडतात
त्यानंतर कित्येक दिवस कोल्हापूरकरांना अंधारात
कवी कुठले आणि मांजर कुठले
ते कळत नव्हतं

## कवी

कवी वाचून दाखवतायत कविता स्वत:च्या
दूसऱ्या कवीलाच
कवी खुश किंवा नाखुश होतायत एकमेकावर
कवी स्वत:च करतायत एकमेकाची समीक्षा
कवी एकमेकाला पाण्यात पाहतायत
कवी हळहळतायत एकमेकात अल्पसंख्य झाल्याबद्दल
कवी नाराज होतायत कवितेचा प्रभाव संपल्याबद्दल
कवीनां खरंतर समजत नाहीये
त्यांच्या कविताचं काय करायचं ते
त्या त्यांना एकाचवेळी आयुष्याची सर्वात मोठी अडगळ
आणि सर्वात मोठी उपलब्धी वाटतात
कवी कविता लिहतायत
एका भरभक्कम भिंतीवर
त्यांना आशा वाटतीये की
कधीतरी कवितेमूळे ही भिंत जमीनदोस्त होईल
कवी त्यांच्या दूरदृष्टीनं भिंतीतून आरपार पाहतायत
आणि कविंचं डोकं भिंतीवर वारंवार आदळतय.

## आता

पुरूषांनी ह्या बांधलेल्या इमारती कोसळू द्या
स्त्रीयांनी उभ्या केलेल्या झाडांना उन्मळू द्या
आता हिजड्यांनाच लिहू द्या कविता
कदाचित तेच चांगलं काही लिहितील
त्यांच्याच दोन जिभांना चाटू द्या उभयलिंगी रक्त आणि मीठ
त्यांच्याच चार डोळ्यानां दिसतील चार दिशा नीट
त्यांचेच चार पाय आयुष्याचं टेबल नीट करतील फीट
त्यांचेच चार हात लढतील हे युध्द धीट
आता शिखंड्यांनाच कापू द्या हा ह्या युगाचा वयोवृध्द भीष्म
आता वयोवृध्द दाढ्या आणि अहंकारी स्तन
दोघानांही कुरूक्षेत्रावर जळू द्या
शब्दानां सेक्सपेक्षा आधिक वेगाने धावू द्या
आणि कवितेला गणपतीच्या पुढे पळू द्या
आता हिजड्यानांच लिहू द्या कविता

## मी

मी तुमच्या प्रेमाचा ताजमहाल
माझ्या कवितेत का बांधू?
माझे हात प्रथम प्रेम करण्यासाठी आहेत
मग ताजमहाल बांधण्यासाठी
मी नकार दिला तरी
तुम्ही माझे हात छाटणारच
तुमचे हात प्रथम हात छाटण्यासाठी आहेत
मग ताजमहाल बांधून घेण्यासाठी
म्हणूनच तुम्हाला साधा ताजमहाल बांधता येत नाही

तुम्ही हुकूम द्या
मी हात छाटले जाईपर्यंत प्रेमच करेन म्हणतो

### प्रियास

जितक्या सहजपणे हा कुंभार सांगतोय मुलाला
मातीची मडकी वापरणार कोण पोरा
जमाना स्टेनलेस स्टीलचा आला किंवा ॲल्युमिनीयमचा
तितक्या सहजपणे मी सांगतोय ते एक

जमाना टिव्हीचा आणि चित्रपटाचा येतोय
तेव्हा कवितेच्या फंदात पडू नकोस नवी कला शोध
कवितेपेक्षा अभिनय शिकलीस तर चार पैसे पदरात पडतील
आणि लाईमलाईटही
कविता कुणालाही गरजेची वाटत नाहीये
तेव्हा फारातफार फिल्म किंवा आल्बमसाठी गाणी कवितालेखनाचा
अभिनय करत लिही
किंवा सिरियल्सची टायटल सॉंग्ज
कुणालाच गरज नाहीये समुद्रात खोलवर बुडण्याची
जो तो स्विमींग टँकवर खूष आहे
लोक अभिनय करतायत
आणि अभिनेत्यांचीच पूजा करतायत
शरीरातून जन्मून शरीरावर रेंगाळणे
त्वचेतून त्वचेला त्वचा भिडवणे
ही एक त्वचाशाही अवतरतीये सर्वत्र
तेव्हा मेकअप शिक
अभिनय शिक
मिडीया म्हणजे भडवा
ॲक्टींग नामक रांडेने ठेवलेला
हे उमजून घे
त्वचेला फेअर ॲन्ड लवली लाव
त्वचेवर फेशीअल कर
सापासारख्या नव्या नव्या त्वचा धारण कर
जुन्या टाकायला शिक
ही कविता ईश्वरासारखी मुली
इनविजिबल
तिच्या नादी लागू नकोस
त्वचेची मिरवणूक काढत ती वाजत गाजत न्हे
ह्या त्वचोत्सवात
मात्र ती विसर्जनावेळी फक्त पाण्यावरच तरंगत राहिला
तर तिला दोष नको देऊ
हलक्या चीजा पाण्यावर तरंगतात
हा त्वचेचा दोष नाही
तो पाण्याचा गुण आहे

### दयाघना

स्वत:लाच प्रमाण मानून जगायचं तर
सर्वत्रच सदाकाळ मिळलेला धोखा
आणि अविश्वास
ही दुनिया जेव्हा आपण आपल्या ॲंगलमधून पाहिली
तेव्हा तलवारीसारखी तळपतानाच पाहिली
हे जग नेहमीच खोटं बोललं आपल्याशी
हजार जीभांनी
मनातल्या मनात व्यभिचार आणि तोण्डदेखलं ब्रम्हचर्य
तोण्डी लावायला कायम कारल्याची भाजी
आता ह्या संताचं करावं तरी काय
अवघाची गोड असलेला ऊस
तर रेंगाळला नाही कधी आपल्या पावलात
आपली झोप कधीच साखर झोप नव्हती
मग आता ह्या शहरात
ह्या रस्त्यावरून
तलवार घेऊन हिंडण्याऐवजी
आपण असे कविता घेऊन काय हिंडतोय?
ज्या माणसांची मुंडकी कापून
त्यांच्या दारात टागांयला हवी
त्यांना का सागंतोय आपण
न पाहिलेल्या सत्याचे धडे
ही एक अजीब गुंतागत आहे
जिथे मुतायला हवे तिथे आपण करतो आहोत
सुगंध उमलण्याच्या प्रार्थना
आणि हे जग आपल्या नमाजाला
आपली कमजोरी समजून
आपल्या हातावर फळाफळा मुततय
हे दयाघना
माझ्या आत कुठे असलासच तर कर मोकळा
निदान एकतरी तुझा श्वास
निदान मरताना माझी आत्महत्या माझ्या फुफ्फुसात सुगंधित होऊ दे.

## इतिहास

### शाहू महाराज

ह्या शहरात महाराज सर्वत्र होते

मी ज्या शाळेत शिकलो
तिथे होते त्यांचे डोळे
जे वैदिक पापणीच्या विरोधात
वीज विणत होते
मी जिथे काम केले
तिथे होते त्यांचेच हात
जे परावलंबी तळांना चिकटवत होते
स्वावलंबनांची देखणी बोटे
मी ज्या दवाखान्यात गेलो
तिथे होती महाराजांनीच पोहचवलेली औषधे
जी बहात्तर रोगावर करत होती शहात्तर हजार इलाज
मी ज्या तालमीत बैठक मारली
तिथे महाराजांची मांडीच शिकवत होती कोल्हापूरी स्पिरीट
ठोकत स्वाभिमानाची कुस्ती
आणि लाल मातीची मस्ती
माझ्या जन्मदाखल्यावर पणजोबा म्हणून होते
महाराजांचेच नाव
आणि आईने माझ्या जन्माचे कारण
महाराजांचे बोट पकडून पुढे जाण्यासाठी
हेच दिले होते
माझ्या पायातील चपलात वाजत होती
महाराजांच्या चालीची भक्कम वहिवाट

आणि माझ्या पाठीच्या कण्याची वीण वीणत होती
महाराजांच्या तल्लख मेंदूतील सुई
सरतेशेवटी मी जेव्हा कवी झालो
तेव्हा कागदात थरथरत राहिला महाराजांचाच आवाज
आणि कागदात कवितेचा स्फोट झाला तेव्हा
महाराजच खळखळून हसले माझ्या काळजात

## कोल्हापूरी : इतिहास

॥१॥
भूतकाळाला निद्रानाश झालाय
म्हणून तो स्वतः झोपत नाही
आणि मलाही झोपू देत नाहीये
भूतकाळाला कळत नाहीये
तो माझा बाप आहे
की मी त्याचा बाप आहे
आणि मी
ज्याला वर्तमानाची दुर्गंधी असह्य झालेली आहे
भूतकाळातल्या मुताच्या टाळून
भूतकाळातल्या बागा आधिकच सुगंधित करून मांडतोय
माझा जन्मच एका अशा संस्थानात झालाय
जिथे सांगण्यासारखा फक्त भूतकाळच आहे

॥२॥
ह्या शहरात प्रत्येक माणूस
एखाद्या इतिहासकारासारखा दिसतो
पांढरी दाढी आणि काळ्या मिश्या
किंवा काळी दाढी आणि पांढऱ्या मिश्या
हे एक ब्लॅक अँड व्हाईट शहर आहे
जे आजही भालजी पेंढारकरांच्या स्टुडिओतून
तोफा उडवतं

॥३॥
जरगनगर, विद्यापीठ परीसर, कदमवाडी
एकीकडे होणारा शहराचा अफाट विस्तार
आणि दूसरीकडे शाहू महाराजांचे घोडे कुठे ठेवायचे
हा मूलभूत प्रश्न
एकीकडे अत्तरांचे थवेच्या थवे उडत चाललेले
आणि दुसरीकडे नुकत्याच सुरू झालेल्या गुलाबांच्या बागा
इतिहास एखाद्या फॅन्टसीसारखा प्रत्येकाला सिड्यूस करतोय
आणि फॅन्टसी नुक्तीच डिस्ने लँड बघून आल्यासारखी
लॅन्ड होतीये

॥४॥
मी इतिहासाचा विद्यार्थी असूनही
मला कधीच कळत नाही
इतिहास हे स्वातंत्र्य आहे की गुलामी
मला इतिहास हा नेहमीच
असंख्य स्लाईस असलेल्या पावासारखा वाटतो
जो मी रोज भाऊंनी दिलेल्या चहाच्या पेल्यात
बुडवून खातो

॥५॥
घराण्यांची असंख्य कागदपत्रां समोर
ह्या बखरी आहेत की वखारी
हे जाहीरनामे आहेत की माहीरनामे
हे दस्तावेज आहेत की दांस्तां नसलेले ऐेज
एक होळी रचल्यासारखा प्रचंड कागदाचा ढिगारा
आणि
माझ्या खिशयात बाहेर यायला अनावर झालेली माचीस
सगळच पेटवून टाकावसं वाटतय
ह्या सगळ्या कागदातून चालत जाऊन काय मिळणाराय?
कुठल्या लाड्या लबाड्या आपणाला कळणारायेत?
खून करणारे कधी आपल्या खूनाचे पुरावे लेखी सोडतात?
आणि ज्यांचे खून झाले ते तर ह्या देशात कायमच निरक्षर
इतिहास ह्या देशात
नेहमीच एका अवघड वळणावर उभा असतो
आणि इतिहासकारही

॥६॥
मी इतिहासातून चालत जातोय
की मी वर्तमानातून पळून जातोय
मला काहीच कळत नाहीये
मी जो वर्तमानात वर्तमानाविषयी
कधीच धैर्य एकवटून संपूर्ण खरं बोलू शकला नाही
ऐतिहासिक सत्य शोधतोय

## जे.पी. नाईक

मी बसलोय शहराच्या त्या बाकड्यावर
ज्या बाकड्यावर बसून तुम्ही तुमचे डोळे टाईप केले
आणि शहरभर पाठवले
तुमचे डोळे जसे काल होते तसे आज आहेत
ते पाहतायत तुम्हीच घडवलेलं हे शहर
जे स्वत:चे खांदे उडवत तुमच्या डोळ्यानां ओळखही न दाखवता
पुढं चाललंय
तुमची जीभ एखाद्या लाकडासारखी जळतीये
आणि शब्दांचे निखारे अजूनही तुमच्या भाषेचा कोळसा
पुरता विझलेला नाही ह्याची साक्ष देतायत
ते दिवस तुमच्या अर्ध्या चड्डीचे होते
ज्या दिवसात सूर्य एखाद्या ओपनरसारखा
तुमच्यासाठी प्रकाश खुला करत होता
आणि रात्र तुमच्या काळजात शहराच्या विकासाचे मास्टरप्लान
विकसीत करत
तुमच्या पाठीवरून चन्द्र फिरवत होती
प्रकाशाची सवय नसलेले लोक
एखाद्या आंधळ्या हत्तीसारखे तुमच्यावर चालून आले
तेव्हाही तुम्ही बुध्दाप्रमाणे हात उचलत
सगळे गरम रक्त शांत केले
तुमच्या हातातल्या रेडब्लड सेल
आजही आम्हाला शिक्षण डोनेट करतायत
आणि आजही आम्ही कमनशीब लोक
पुरेश्या बाटल्या त्यांना पुरवत नाही आहोत
तुमचा अर्ध्या बाह्यांचा सदरा
ज्याने तुमच्या प्रज्ञेचे सदर
दिनरात चालवले
आजही आमच्या कपड्याचां बॅकबोन सांभाळतोय
ज्या शाळांत तुम्ही हिऱ्यांची शेती केली
त्या शाळा आज पुन्हा मुलांना गुराप्रमाणेच वळतायत
आणि ज्या शहराची तुम्ही स्वप्नात एक अद्भूत सिटिझनशिप
पाहिली

ते शहर आजही गुण्डागर्दीतच
धाडसाची आणि साहसाची ग्राफीटी लिहितीये
तुमच्या नावाची एकही हेडलाईन
ह्या शहराच्या पेपरमध्ये दिसत नाही आजकाल
शिक्षण ही ग्लॅमर इंडस्ट्री नाही
हा तिचा मोठा गुन्हा समजणारे वार्ताहर
तुमचं वैचारिक अपहरण
स्वयंवरासारखं मिटक्या मारत पाहतायत
आणि तुमच्या नावचं उरलेलं एखादं दूसर बॅनरही
मौनी विद्यापीठ बनत चाललय
आता तुमच्या नावाचे ब्रीज कुणी का बांधावे कुठे बांधावे
तुमच्या नावाचे उत्सव का व्हावेत कुठे व्हावेत
शिक्षण हा जमिनीत गाडला जाणारा पाया आहे नाईक
आणि हे शहर फक्त बिल्टअप एरीयाचा हिशेब मांडण्याइतपत
आता पुढं निघून गेलय.

## रेंदाळकर

रेंदाळकर अजूनही वाट चालतायत
आणि गावकऱ्यानां आजही माहित नाही
रेंदाळकर अजून चालतायत ते
त्यांच्या कवितेचा आवाज आदळतो माळावरून कधी कधी
पण लोक त्याला भूताची बडबड समजतात
रेंदाळकरांच्या पावलांचा झालेला नाही कधी लीलाव
किंवा ती उभीही राहिली नाही कधी इलेक्शनला
त्यामुळे ग्रामपंचायतीत त्यांच्या पावलांचा मुद्दा
कुणी चर्चेला घेत नाही
ते ज्या माळावरून चालले त्याचा एरीया मात्र अंदाजे मोजून
गावकऱ्यांनी लिहून ठेवलाय नोंदबुकात
पण ज्या माळाचा एरीया त्यांनी नोंदवलाय तो रेंदाळकराचा आहे
हे त्यांना माहीत नाही
रेंदाळच्या वक्तृत्व स्पर्धेत मी रेंदाळकराच्या माळावरून
व्याख्यान दिलं तेव्हा
रेंदाळकर माळावर हजर नव्हते
मात्र त्यांची टोपी सर्वत्र वावरतीये
असा मला भास होत होता
रेंदाळकरांनी कधी बालकवीसारखा पाण्यात औदुंबर सोडला नाही
किंवा केशवसुतासारखा सुतावरून स्वर्गही गाठला नाही
ते आपले माळावरूनच चालत राहिले
आणि वाट संपेना म्हणून शेवटी वाटेत दिसनासे झाले
रेंदाळकर आजही कुणालाच दिसत नाहीयेत
मात्र त्यांच्या चालण्याचा आवाज
सर्वत्र भरून आहे.

## पन्हाळा १

हा पन्हाळा वाघनख्यासारखा दवा धरून
कधी बाहेर येईल पोट फाडून
सांगता येत नाही
त्याच्या तोफेचा कधीतरी होणारा अनपेक्षित आवाज
आणि इतिहास चालत गेल्याचा आभास
काळजात
हा पन्हाळा
जो झोपू देत नाही
माझ्या डोळ्यांनी पाहतोय स्वत:लाच
जिथे घोडे पोहचत नव्हतो
तिथे कार्स पोहतायत
जिथे गनिम पोहचत नव्हता
तिथे लोक भेल खातायत
एक पहाडासारखा माणूस
मेकॅनिक झालाय
आणि काळाची बन्द पडलेली एक गाडी
कधीपासून त्याच्यापुढे नादुरूस्त होऊन पडलीये

## पन्हाळा २

पाऊस पडतोय काळाच्या ढगातून अवचित नसताना पावसाळा
आपल्याला माहीत आहे तो आहे कविता वाचता न येणारी
पाणी अंगावरून वाहतय बहुथडी रेनकोट छत्रीचा अनपेक्षित
अभाव काळा
जाणवलेला प्रथमच त्वचेतून नदीची ओल खोल उगवणारी
हीच वेळ काळजातला स्वर्ग आणि नरक एकत्र पाहण्याची
जोखण्याची
ह्या पावसाचाही बर्फ होईल इतिहासात काळजाच्या तेव्हा कळेलच
सत्य वाकत वाकत
तोवर अद्भूताचा वाहतोय वारा ज्यात फडफडतायत तुझ्या
काळ्याभोर पापण्या
तुझ्या माझ्यातून पाणी चाललय धारेची काठी टेकत टेकत
आजूबाजूच्या झाडातून वाजवतायत फांद्या आनंदाचा झांजा
खेळवतायत पोरं
आनंदाची लेझिम ही रिमझीम उडवतीये डोळ्यातील दु:खाची झोप
तरी काही खुळे अंगाचे खुळखुळे चोरून घेत उभे झाडाखाली
काही बुरूज गारद पाहून उगवलेली ही पावसाची अनपेक्षित तोफ
सगळे अवयव पाऊसखिंडीत गाठले गेलेले लावू जीवाची चल
आपणही बाजी
चल आपणही काढू प्रेमाची भवानी तलवार बघ तिची धार झालीये
अनपेक्षित ताजी

## शिवाजी

शिवाजीनं जिथून उडी मारली तिथून
शिवाजीला पहायचं म्हणून मी सकाळी उठलो
तेव्हा मला खात्री होती मी चिरंजीव आहे म्हणून
झोपेच्या रॅपरमधून मी देह सोडवला
आणि सदेह मरणात बुडालेल्या गवतावरून चालायला सुरूवात
केली
माझ्या पायाला तानाजी मालूसरे चिकटलेला
तर हात बाजीप्रभूने गच्च पछाडलेले
किल्ल्यामागून किल्ले पार करत माझे डोळे
निघाले जेव्हा टापा टाकत झोपा उडवत
तेव्हा माझ्या गुडघ्यात महाराजांना झालेली दुखी होती
आणि मी सुर्याला फुटबॉलसारखा खेळवत
शिवाजी तरूण मंडळाचा मॅच ड्रेस घालून
मैदानात उतरलो
शिवाजीनं जिथून मारली उडी तिथे
मी पोहचलो फुटबॉल खेळवत तेव्हा
शिवाजीच फुलबॅक म्हणून सामोरा आला
शिवाजी उडी मारण्यापूर्वी इतका भरभक्कम फुलबॅक होता
हे बघून मी थरारलो

भानावर आलो तेव्हा
माझ्या पायातील फुटबॉल शिवाजीच्या पायात खेळत होता
मी प्रयत्न केले दिवसभर
पण मला शिवाजीच्या पायातील फुटबॉल काढता आला नाही
आणि इतिहासावर गोल चढवण्याचं माझं स्वप्न अपुरंच राहिलं
शिट्टी वाजली तेव्हा
शिवाजीनं मारली एक दमदार कीक
आणि जाऊ लागला खाली तिथून
जिथून शिवाजीनं उडी मारली होती
मी माझ्या आयुष्यात पाहिलेली ती बेस्ट कीक होती
आणि ज्यानं कीक मारली तो
कीक मारल्यानंतर गायब झाला होता तिथून
जिथून फुटबॉलनं उडी मारली होती

## बोटं

गलत जगहपे हमेशा सही रहा.
जैसे बेहता हुआ हवाका झोका.
स्वत:ला देत धोखा.
हलवतो दाण्डा गुल असलेली घण्टा.
तसा हलत राहिलो काळजात ज्याचा गायब ठोका.
आणि निसटलो आयुष्यातून कवितेची बोट सोडून.
शाहिस्तेखानासारखा भाषेच्या लाल महालात.
शिवाजी त्या माझ्या बोटांचं इतिहासात काय लोणचं घालणाराय?

## शेवटची वार्ता आली

शेवटची वार्ता आली
तेव्हा महाराजांचा खानदानी हत्ती चहा पिऊन
राजीनामा देत होता
शेवटची वार्ता आली
तेव्हा अंबाबाई नित्शेचे तत्वज्ञान वाचून
God Is Dead हे खरं
पण Goddess Is Dead हेही खरं का
ह्यावर रसेलशी चर्चा करत होती
शेवटची वार्ता आली
तेव्हा आबालाल रेहमान कोटितीर्थ पिऊन
कॅनव्हासवर झिंगत चालले होते
शेवटची वार्ता आली
तेव्हा कोल्हापूर महानगरपालिका
शाहू महाराजांच्या फेट्याचा एफ एस आय किती
ह्याची एनक्वायरी करत होती
शेवटची वार्ता आली
तेव्हा शहरातील सर्व माणसांचे कान कापून टाकण्यात येत होते

## शिवाजीच्या सरसेनापतीच्या वंशजास

शहाण्णव कुळी फॅण्टसीचा अगडबंब हत्ती तुझ्या घरात बसलेला रूतून अंबारी उडून गेली माहूत उतरून गेला तरी शिवाजीच्या सरसेनापतीचे वंशज असल्याचा माज उतरत नाही तुझ्या अंगावरून तू माझा मित्र जो नेहमीच माझ्याशी कुस्ती खेळताना माझ्याकडून गांड आपटून पडला तू जो नेहमीच क्रिकेटमध्ये मी ओपनींग करत असताना जळत राहिला माझ्या वाढत जाणाऱ्या धावावर फक्त एका मग्रुरीत की तू सेनापतींचा वंशज आहेस चालत राहिलास माझ्या डोळ्यात ह्या आशेने की मी कधीतरी कॅप्टनशीपची वस्त्रं उतरवून तुझ्या अंगावर घालीन ह्या क्वालिफिकेशनवर की तू शिवाजीच्या सरसेनापतीचा वंशज आहेस चालत राहिलास सोळाव्या शतकातील काल्पनिक तलवारी विसाव्या शतकाच्या म्यानात म्यान करत पाटाकडीलशी लढताना ना तुझे पाट वाहिले तटाकडीलशी लढताना ना तुला तुझा साधा तट लढवता आला तरीही तू मागत राहिलास माझ्या काळजाचा किल्ला ह्या गुणवत्तेवर की तू शिवाजीच्या सरसेनापतीचा वंशज आहेस आणि आम्ही जन्मजात चिखल आणि तू जन्मजात आमच्यातून उगवलेलं कमळ आहेस असं समजून तू उडवत राहिलास तुझ्या चपलेची धूळ माझ्या नाकात देणी तर कधीच चुकती केली नाहीत. तुझ्या खानदानाने साधे परटाचे पैसेही अदा केले नाहीत आणि त्या परटाने तुमची गांड धुतली नाही अशीही तक्रार करत राहिला केवळ ह्या क्वालिफिकेशनवर की तुम्ही शिवाजीच्या सरसेनापतीचे वंशज आहात तुम्ही जमिनी विकतानाही लोकांना जमिनीत बुडवले पाणीही मागू न देता तुम्ही मातीत जाळले लोकांचे गळे आणि नंतर कुंभाराला बोलवून त्या गळ्यांच्या राखेचे छानसे मडकेही बनवले आणि ठेवले त्याला शिवकालीन ॲन्टीक पीस म्हणून केवळ ह्या क्वालिफिकेशनवर की तुमच्या पूर्वजाने अफाट पराक्रम गाजवून गनिमांची डोकी मडक्यासारखी फोडली होती तुम्ही कापत राहिला फसवत राहिला जाळत राहिला आणि अपेक्षा करत राहिला की लोकांनी त्यांचे कान तुमच्या जीभेत त्यांचे श्वास तुमच्या नाकात त्यांचे डोळे तुमच्या मेंदूत गहाण ठेवावे आणि तुम्ही ही रयत तुमचे पाय चेपवून घेत घेत सांभाळावी ह्या लोकशाहीत जेणेकरून ही लोकशाही शहाण्णव कुळी होईल आणि तुमच्या मारूती शिवाजीच्या घोड्याइतक्याच पूजनीय होतील आणि तुम्ही मारूतीच्या शेपटीसारखे ह्या शहरात वाढत जाल आणि ही सिटी शिट्टीसारखी हवी तेव्हा वाजवाल हवी तेव्हा जाळाल हवी तिथे पाळाल ह्या क्वालिफिकेशनवर की तुम्ही शिवाजीच्या सरसेनापतीचे वंशज आहात तुम्ही पसराल ह्या शहराच्या भाषेत आणि हे शहर फक्त तुमचा पोवाडा गाईल पण असे झाले नाही कारण की ह्या शहराची भाषा जेव्हा आपण कुस्ती खेळत होतो तेव्हा तुमच्या खानदानी टांगाइतकीच माझ्या शड्डूतही वाहत होती कारण की ह्या शहराची भाषा तुमच्या जनेटीक्सइतकीच माझ्या बॅटीत तळपत होती आता मला कळतय की मी पहिला शड्डू ठोकला तेव्हाही कवी होतो मी पहिली सेन्चुरी मारली तेव्हाही कवी होतो आणि तुम्ही जेव्हा शहाण्णव कुळी फॅन्टसीचा हत्ती घरात रूतवून बसला होता तेव्हा मी कवितेची हत्तीण माझ्या घरात भाषेच्या सुईतून आरपार करायला शिकत होतो
आता तुम्ही शिवाजीला शोधत ह्या शहरात मारूती घेऊन हिंडताय आणि मी शिवाजीच्या भाषेच्या घोड्यावर शिवाजीच्या मागे बसून हे आख्खं शहर कवितेतून हाकतोय.

## prophesies

१) कवितेच्या जन्मातून समीक्षेचं गर्भाशय हालेल तेव्हा भाषेच्या लिव्हरमधून कावीळ वाहील आणि वाचणाऱ्याला
जग आख्ख दिसेल पिवळं तर काळं निळं पडलेलं बुबळ गायील
श्रीकृष्णाचं ट्रॅडीशनल साँग आणि बुबळाच्या आसपासंच दही
विकत पापणीची गवळण पापीण होत मेलेल्या परमेश्वराची जिवंत
नजर जोखेल
२) वाचणारे थर्ड क्लास आहेत म्हणून रेल्वेचा फस्ट क्लास रद्द करावा अशी मागणी पुस्तके करतील आणि कागदावर चालणारे सरकार झाडांची झडती तोड काढून पानांची मोड देईल आणि पर्यावरणाचा बन्दा रूपया वितळेल उत्तर ध्रूवावर तेव्हा ऑस्ट्रेलियातला पेंग्विन कंपनीसकट कोल्हापूरच्या उद्यमनगरात काळा पडेल
३) महाव्दार रोडवरच्या एका दुकानात लटकलेल्या चोळीतून दोन मांसल स्तन उगवतील फॅशन म्हणून त्वचा विस्तवासारखी चमकवत नेलपॉलिश लावत बसेल एफ बी आयच्या बोटांना जेम्स बाँडचा रॉजर मूर मूड बदलून इंडियाची सिटीझनशिप घेईल तेव्हा त्याचा डावा डोळा भांडवलशाहीचा उजवा डोळा उघडेल आणि एक नागडी बाई आख्ख्या पृथ्वीला गिळेल

४) रोलाँ पेनरोझच्या पेन्टीगमधील व्हॅलेन्टाईन अंबरनाथाच्या मंदिरात श्रीमती पार्वती कांबळेला प्रपोज करेल निळा वेष घालून रिपब्लीकन पार्टीच्या चिंध्या गोळा करत तेव्हा जापानमधला झेन करणारा बुध्द हायकूची काठी अॅटलान्टीक समुद्राच्या अॅन्टीक शिल्पाच्या डोक्यात घालेल आणि त्यांच शहाणपण जागं करेल

५) राजाभाऊची भेल खात खात आल्बर्ट आईन्स्टाईनसारखा दिसणारा गृहस्थ गांधी टोपी घालून तिसऱ्या महायुध्दाचे तुणतुणे वाजवत जोगत्यासारखा सौंदत्तीत हिंडेल तेव्हा त्याच्या डाव्या हाताच्या हजार बोटांनी तयार केलेला अणुबाँब उजव्या हातात फुटेल आणि जोगत्याच्या डोक्यावरील जगात स्थापन देवीच्या टाकीवरून चौथे महायुध्द सुरू होईल

### ६) जो हे वाचतोय

तो एक दिवस
त्याने कितीही वाचले तरी
म
रे
ल
वाचन त्याला
वाचवू शकणार नाही

# राजा तिळवे

## मी राजा तिळवे

मी राजा तिळवे मूळं नाहीत फक्त स्वत:च्या फांद्याच वाजवतोय ह्या रस्त्यावर चालत जाताना माझ्या फुलात माझा असह्य मळ जो कालांतराने सुगंधित होईल मी धुतो आकाशाचं निळं बनीयन धरतीची हिरवी चड्डी ढगांना वापरतो बकेटसारखं फेक फेक पाणी फेकतो ह्या फेक रस्त्यावर मी वेलीत तरंगतो आणि सापात पापाचं वांगं भरीत राहतो गुलाबात दाबतो माझ्या ओठाचा आब आणि काट्यात रूबाव मारत काळाला टाच मारतो मी मृत्यूसारखा ह्या शहरातल्या प्रत्येक माणसातून चालत जातो माझ्या भविष्यवाणीत नाणी वाजवतो गाणी वाजवतो आणि रंकाळाकाठच्या न्हाणीत ज्योतिषशास्त्राची विज्ञानाने धुलाई करतो मी भुतानां अद्भूत वाटतो मी भविष्यांना त्यांचं आयुष्य वाटतो मी वर्तमानाला महावीर वाटतो मी युध्दाला बुध्द आणि शांतिला क्रांती वाटतो मी नाहिसा होतो लोकांच्या डोळ्यादेखत आणि त्याच्या पाठीवर थाप मारून श्वासाला टच करतो मी पाणी पिणाऱ्याच्या ग्लासात बर्फ होतो मी पावसात भिजणाऱ्यांच्या कपड्यात नागडा होतो मी कार्समध्ये पेट्रोल सारखा जळतो आणि ब्रेनमध्ये ड्रेन करून विचाराचं ड्रिलिंग मशीन डील करतो फील करतो बायकांच्या बेंबीत सेक्सची तंबी मी अभिनेत्यांपुढे कुत्र्यांची नक्कल करतो आणि दिग्दर्शकांपुढे घोड्यांची मी पोपटपंची करतो कोकिळेच्या आवाजात आणि वसंतात कावळ्यासारखा कावकाव करतो मी मुलींचे वक्ष तुटेपर्यंत ताणतो आणि त्यांच्या मांड्या जाड आणि लांड्या कांड्या समजून वाजवतो मी गाजवतो माझं प्रत्येक अफेअर आणि फेअर अॅन्ड लवलीच्या अॅडमध्ये मॅड होतो मी शिकागोत जाऊन जॅझ खेळतो न्यूयॉर्कमध्ये रॉक मुंबईत जाऊन दांडीया आणि कोल्हापूरात अंबाबाईपुढे आयुष्याचा गोंधळ घालतो

मी आयुष्याचं ओरीजीन शोधतो सेक्सचे तोते गोते खातात तेव्हा प्रेमात कंटाळतो स्वत:च्या जीभेने स्वत:च्या मरणाची चव घेत स्वत:चे अमर्त्यपण स्वत:त शिजवतो
मी राजा तिळवे
ह्या येडझव्या मराठी भाषेत
अमृताची देशी दारू पित
ज्ञानेश्वरांच्या मांडीवर बसून
परमेश्वराशी थेट गप्पा मारतो

## कास्टींग

माणसंच माणसानां साच्यात बसवायला टपलेली
कास्टींग इंडस्ट्री पूर्ण भरात
प्रत्येक घरात उद्यमनगर गजबजून गेलंय
भिंतीसुध्दा ऑपरेट होतायत मशिनसारख्या
हिंदूच्या घरी जन्मलो म्हणून हिंदू
वैश्यांच्या घरी जन्मलो म्हणून वैश्य
ब्राम्हणाचा घरी जन्मलो म्हणून उच्च
गुरवाच्या घरी जन्मलो म्हणून ओबीसी
इंडीयात जन्मलो म्हणून इंडीयन
मराठीत जन्मलो म्हणून मराठी
आई काळी म्हणून काळा
एकेक ओळख आधीच फिक्स डिपॉझीटमध्ये तुझ्या नावाने टाकलेली
सगळ कसं आधीच आखून ठेवलेल्या चक्रव्यूहागत
प्रत्येक योध्दा आपापल्या मशीनरीत फिल्डींग लावून बसलेला
तेच जनेटीक लोखंड तेच क्रोमोझोम्सच तांबं
मेटलसुध्दा आधीच फिक्स
श्रीधरा,
जन्माआधीच ओतला गेलायस साच्यात
आता बाहेर पडायचं असेल
तर एकेका ओळखीची हत्या कर
गमव मेटलमध्ये स्थिर असण्याचा एकेक फायदा
सहन कर मेंटल असण्याचा उष्ण आरोप
पत्कर सेंटीमेंटल होण्याचा गरम धोका
लहरी हो
अनप्रेडिक्टेबल हो
हवाहवाई हो
कॉन्ट्रॅडीक्ट कर
आणि वाहत जा अॅसिडीक पाण्यासारखा
ह्या कास्टींग इंडस्ट्रीची धुलाई करत

## डास

ह्या शहरातले डास मरता मरत नाही
कासवछाप लावा
किंवा मच्छरदाणी
ही डास गुणगुणत येण्याची आणिबाणी
संपता संपत नाही
तरीही बन्द करत नाही मी
माझ्या घराची एकुलती एक खिडकी
केवळ एका डासानं
अडवून ठेवलय
खिडकीतून मला दिसणारं नक्षत्रांनी भरलेलं आभाळ
हा विचारच
डासापेक्षा माझं आधीक रक्त शोषतो

## थम्स अप

पुन्हा एकदा लालच गिळंकृत करतीये बॉडीचं वीजडम
पुन्हा एकदा खालसा होतंय माझं सेन्सॉरशिपचं किंगडम

पुन्हा एकदा प्यायला बसलोय मी तोच रिफ्रेशींग कोला
जो मी प्यायला नकोय
माझी सारी फिंगर्स अप होतायत ह्या थम्सअपमध्ये
पुन्हा एकदा जीभ अपडाऊन करतीये आसक्तीत
ही चवीची वाट सर्दीकडे जाते
हे माहित असूनही मी बसलोय कोलाड्या होऊन
लोक दारू पितायत मी कोला
हा चकन्याचा चिकना नाद चीक काढतोय नेहमीप्रमाणं
हे शेंगदाणे मिक्स होतायत कोल्यात
एक डेडली कॉम्बीनेशन कोंब करतायत टेस्टसेलस

आता पहाट होईल तेव्हा होईल
ही रात्र मला रिफ्रेश करत शेवटी सर्दीत पोहचवणार आहे

## शेवटी

शेवटी पाण्याने गुडघे टेकले माझ्यासमोर
म्हणून मी माजलो
इतका की शेवटी
पाण्यावरून चालत जाताना
पाण्याने मला सपशेल बुडवले

## परमेश्वर

कुठलीही प्रार्थना न करताही
जर यदाकदाचित परमेश्वर माझ्या घरी येईल
तर मी त्याला निक्षून सांगेन
माझा तुझ्यावर विश्वास नाही
तरीही तो घरीच बसूनच राहिला तर
मी विचारेन
चहा की कॉफी
आणि स्वंयपाकघरात जाण्यापूर्वी त्याच्या हातात देईन
समग्र जैन दर्शन
किंवा संपूर्ण नित्शे
किंवा बरट्रॉन्ड रसेलचं व्हाय आयम नॉट अ ख्रिश्चन
तो नाष्टा करूनही नष्ट नाही झाला
तर मी त्याला समजावेन
तो नसणे किती आवश्यक झालय ते
तरीही तो जेवणासाठी थांबला
तर मी त्याला दत्त कॅफेत न्हेऊन मिसळ खायला घालेन
कदाचित त्या झणझणीत चवीनं
त्याचं डोकं ताळ्यावर येईल
तरीही तो ताळ्यावर आला नाही
तर मी विचारेन त्याला
त्याचं जिवंत असण्याचं रहस्य
आणि तो जे बोलेल ते सगळं टेप करून घेईन
मला भय फक्त एकच आहे
तो मूकबधीर भाषाशून्य निघेल
किंवा तोण्डात जीभच नसलेला

## पान

शरीराचं पान हवं
पण त्यात जबाबदारीचा काथ नको
अशा माणसानं पानपट्टीवर जावंच कशाला?
गेली कित्येक वर्ष
मी माझं पान
स्वहस्ते
घरीच लावतोय

## मृत्यू

माझी जीभ इंग्लीश मिडीयममध्ये शिकतीये
तिच्या आसपास मराठी दात आहेत
मात्र फाडफाड इंग्लीश बोलायला
ते मदतच करतील
ह्याची तिला खात्री आहे
त्यामूळेच की काय
ती स्वत:ला वाटेल तेव्हा उचलून
टाळ्याला लावत
स्वातंत्र्याचं भजन गातीये
बहुधा तिच्या स्वातंत्र्याचा मृत्यू जवळ आलाय

## आईच्या गोष्टी

आईच्या गोष्टी
नेहमीच पाण्याने भारावलेल्या
हवेने थरारणाऱ्या
एकदा मी म्हणालो
स्टॉप इट
इटज टू मच सेन्टीमेन्टल
आणि फूलीश
तर ती तिचीच चूक असल्यासारखी
गप्प गप्प झाली
आता मी प्रत्येक गोष्टीत तिला शोधतोय
तर आसपास ना पाण्याचा भार
ना हवेचा थरार
फक्त तिच्या मौनाची एक संततधार
माझ्या काळजाच्या दगडावर

## लग्न

मावशीच्या लग्नात आम्हीच नाचलो
आम्हीच गायलो
फारातफार गोंधळ आणि अंताक्षरी
थोरल्या बहिणीच्या वेळी
लग्नाला पितळी वाद्यांचा गोल्डन टच देत
बॅण्ड मीडाससारखा चालत गेला
जोशी मंगल कार्यालयातून
सेक्सोफोन मधून वाजला समाजमान्य आख्खा सेक्स
आणि लग्न अगदी
तंतोतंत शुभमंगल झालं
भटजीच्या पारम्परिक जीभेत
धाकट्या बहिणीच्या वेळी उगवले
मंगलाक्षता लिहिणारे प्रोफेशनल्स
आणि भटजीची पारंपारीक जीभ कापून
त्यांनी वाजवली स्वत:ची रेकॉर्डेड एक्सपर्ट टंग
यंग
मित्राच्या लग्नाला बॅण्डमध्ये
फक्त वादक नाही वाजले
गायकही माजले स्वत:च्या गळ्यात

आणि लग्न वाद्याऐवजी
गळ्यातून गळा काढून काढून
भर रस्त्यातून
वाजत गाजत आणि गात गेलं
आता ह्या माझ्या लग्नात मी उभाय
तर आसपास सर्वत्र नाचतायत
डान्सर्स
आम्ही सप्तपदीची मनोमन केलेली रिहर्सल उजळत
एखाद्या अभिनेत्यासारखे
फूटवर्क करतोय
स्टेप बाय स्टेप
अग्नीभोवती
व्हिडीओ शूटींगच्या साक्षीने
आणि लोक आमची ॲक्टींग कधी संपतीये
ह्याची वाट पहात मंगलाक्षता पेलत आणि झेलत
खूर्चीतल्या खूर्चीत
लवकरच सगळा लाइव शो संपेल कोल्ड ब्लडेड
आईसक्रीम खाऊन आतल्या आत
आणि आम्ही प्रवेश केलेला असेल
बघीतलेल्या ब्ल्यू फिल्मस आठवत
सुहागरात्रीच्या निळ्या डोंगरात

## आत्मोपदेश

जे मिळतं तेच परत करतो आपण
ह्याचं भान बाळग
तुझ्या हातात खिळे ठोकले लोकांनी
म्हणूनच अंगभर उगवलेत सुरे
ते जगावर उगारले जातायत तुझ्याकडून
तुझ्याही नकळत
तुझ्या गांडीत मिरच्या कोंबल्या हरामजाद्यांनी
म्हणून झालीये तुझी जीभ तिखट
जी अष्टौप्रहर हे माणूसपण कापण्याचा कट करतीये
तुझ्या प्रत्येक श्वासात वादळं टोचली इथल्या हवेनं
म्हणून तुझी फुप्फुसं अशी विषारी वायु ओकण्यास सुसज्ज
जे मिळालंय तेच परत करणारा राक्षस
तुझ्यातच बसलाय राजा
पण कुठुनतरी सुरवात हवी फुलांची
ह्या जळत जाणाऱ्या बागा कुणीतरी थांबवयाला हव्यात
थांव राजा
मुडाच्या अस्खलीत भाषेत बोलणारी ही देहलिपी
थांबव
एक पाऊल ह्या राक्षसातून बाहेर टाक
बाहेर तुझ्यासाठीच थांबलाय
पद्मासन घालून बुध्द
जे थुंकलेत त्यांना वाहून जाऊ दे ह्या करूणेच्या नदीत
तू तुझा चेहरा धुऊन
ह्या पाण्यात
स्वच्छ उमल

## बलून

चढायला शिड्या सापडत नाहीत म्हणून बलून घेऊन तरंगतोय ह्या शहरावर खालून कुत्री भुंकतायत गायी हंबरतायत मांजरं क्रिकेट खेळतायत तारूण्य मेलेल्या जनावरासारखं सर्वत्र पडलय आणि त्याची दुर्गंधी बलूनपर्यंत मी सायरस ढगात पाहचलो तरी अपयशाचा हा व्हायरस माझी पाठ सोडत नाहीये एक क्रेझी इंद्रधनुष्य स्वत:ची क्रीझ सोडून पृथ्वीभर पसरू इच्छितय पण त्याला पावसाळी गोलंदाजानी जखडून ठेवलंय
माझे डोळे सर्वच दाखवतायत चायनातलं घड्याळ भारतातला योग जापानमधला ट्रान्झिस्टर मला कॉफी पिण्याची येतीये तलफ पण बलून झालं की काहीच पिता येत नाही माझा गळा कोरडा झालाय आणि ऱ्हदयनाथ मंगेशकरांचा येरे घना येरे घना तला घन रूणझुण रूणझुण रे भ्रमरा म्हणत माझ्या कानात ओले घण घालतोय.
माझे पाय प्रथमच मृत्यू पावलेत आणि मी बलून होऊन भुतासारखा भटकतोय हिमालयावर माझं डोकं आपटतय निसटतय एक हातरूमाल येतोय नॅशनल जिऑग्राफीचा ताजा ताजा अंक घेऊन बलून झाल्यावर काहीच नीट वाचता येत नाही माझी त्वचा पसरत चाललीये आणि तिच्याखाली एक नग्न मुलगी तिचे कपडे शोधतीये आणि मला पाहतीये
युध्द; बॉम्बस्फोट, स्मगलिंग, हत्यारं, बलात्कार, जाळपोळ, लूटालूट सगळं कसं साफ दिसतंय त्यांचा ज्वर माझ्या नाकातोंडात घुसतोय म्हातारे खोकतायत आणि त्यांच्या खोकल्याचा आवाज माझ्या तारूण्यात घुमतोय मी पळून चाललोय बलून होऊन आणि दुरून पृथ्वी दिसतीये माझ्याइतकीच तरूण आणि माझ्याइतकीच प्रश्नचिन्हासारखी !

# कुटुंब

## चरित्र

डॉ.जोशी ह्यांचा दवाखाना :
मला भूतकाळ नाही
मी सुखी आहे
चरित्राशिवाय
स्तन:
मला भूक लागलीये
मी पितोय
नॉनव्हेज स्तनातून व्हेज दूध
मला कळत नाहीये
चारित्रात डोकावणारा
व्हेज नॉनव्हेज फरक
पाळणा:
मी घेतोय
श्वास
मला अदमास येतोय
मी जिवंत असण्याचा
कपडे :
आई लपवतीये
मला बेबी कपड्यात
आणि खूप खोल
खूप आत
स्वत:ला लपवायला शिकतोय
माझं चरित्र खोटं बोलायला शिकतय
माळी गल्ली पाटलाचं घर:
भिंती छापल्या जातायत माझ्यात
आणि मी ओळखायला शिकतोय
दरवाजे आणि खिडक्या
स्वत:च्या चरित्रातून पळून जाण्यासाठी
वत्सलादेवी देसाई विद्या मंदीर :
मला आठवतय

घर
आई
भाऊ
मी काळ आठवायला शिकतोय
चरित्र आठवायला शिकतोय
प्रायव्हेट हायस्कूल :
काळ पुस्तकातून उतरतोय
थेट माझ्यात
मी शिकतोय काळाशी लढा आणि तह करायला
मी काळाला मिश्या काढायला शिकतोय
आणि चरित्र
जे माझं टेक्स्ट आहे
प्रत्येकवेळी म्हणतय
नेक्स्ट
न्यू कॉलेज :
मी ∞ काढून त्याला अनंत म्हणतोय
आणि परीक्षानळीत बसून
माझ्या चारित्रात पसरलेला
आईन्स्टाईच्या मेंदूचा बिल्टअप एरिया मोजतोय
कोल्हापूर :
मी काळाला मागं पाहतोय
पुढं पाहतोय
आणि काळ
माझ्या चारित्र्याच्या मानगूटीवर बसून
आयुष्याच्या तीनपानी जुगारात
कधी भूत कधी वर्तमान कधी भविष्य
टाकत
माझी उतारी करतोय
भर रहदारीत

## घर

तो माणूस जो तिथं वसलाय शांत
माझा बाप आहे
माझी वहीण शांततेसारखी घरात वावरतीये
आई गवारी निवडतीये
सगळी भाषा आवरून
मौनात
पत्र्यावर पडतोय पाऊस
आणि त्याचा तडतड होणारा आवाज
तयारी करतोय
एका विलक्षण किंकाळीची
जी माझ्यातून निघणाराय

## आई

ती एखाद्या अफाट वृक्षासारखी एकटी उभी
ह्या आयुष्याच्या माळरानावर
मी कधीपासून तिच्याभोवती तिच्या पदरात तिच्या डोळ्यात
तिचं बोट धरून फिरतोय
शरीर कुठं कुठं फाटलेलं कुठं कुठं स्वत:च शिवलेलं
तिच्याखाली बसून मी घेतोय आयुष्याचा श्वास
आणि ती वादळात आणि शांततेत एकटी उभी ह्या माळरानावर
गुंठ्यामागून गुंठे वावरामागून वावरं वावरतायत आसपास रिकामी
आणि ती एकटीच
तिची पानं गळतायत माझ्या अंगावर
कधी हिरवी कधी मातकट तर कधी भगवट लाल
ती ऋतुप्रमाणे बदलते शरीराचे रस्ते हमरस्ते
आणि तरीही जमिनीत मूळं आत खोवून ठाम
सूर्य दिवस जाळतो चन्द्र रात्र उजळतो तिच्या नाकेरी शेंड्यावर
तिनं मृत्यू गाठोड्यात बांधून ते गाठोडं ठेवून दिलय आपल्या
अंगाखांद्यात
जणू त्या दशम्या अफाट भूक लागल्यावरच ती खाणारय
काळ सरकतोय तिच्या खांद्यावरुन आणि ती
फूलांची घड्याळं पहात मला सांगते तिचं टाईमटेबल
मी उंडारतोय जन्मल्यापासून तिच्याचभोवती कधी पक्ष्यासारखा
तिच्या खांद्यावर फांद्यावर तर कधी किड्यासारखा तिच्या मुळाशी
अधुनमधून पेशींची वारूळंही जगदंब विणून ठेवलेत तिच्या
पायथ्यापाशी
ह्या अफाट आकाशात मी कितीही भरकटलो तरी माझे डोळे
तिच्यावर नजर ठेवून
आणि अफाट जमिनीवर तिला सोडून कुठेही गेलो तरी तिची लेसर
मुळे माझ्या पायात जमिनीखालून

## बाप

तू चित्रकार होतास
हे मी ऐकून आहे
तुझ्या हातात मी कधीच पाहीलेला नाही ब्रश
किंवा तुझ्यापुढे कॅनव्हास
तुझ्या आसपासचे रंग कधी उडून गेले
मला माहीत नाही
तुला मी फक्त दुकानात गिऱ्हाईक देताना पाहिलय
आणि पूडी बांधणाऱ्या हातांनीच
तू चित्रं रंगवली असशील अशी स्वत:ची समजूत घातलीये
तू काय रंगवलस मला माहीत नाही
पण सरड्याप्रमाणे तुझे रंग कधीच बदलले नाहीत हे मला माहीत
आहे
तू काय आकारलस हेही मला माहीत नाही
पण तू काहीच कुणाच ओरबाडलं नाहीस हे मला माहीत आहे
तुझे हात आता चाललेत थकत
काळपटत चाललीये तुझी त्वचा
पण माझ्या चित्रकार असलेल्या बापा,
आजही मी जेव्हा आंधळा होतो वाकताना काळोखात
तेव्हा तुझ्या हातावरुन तू चित्रकार होतास म्हणून उडालेली अफवा
मला फुलपाखरासारखी तोलून धरते.

## जतीनसाठी

तुझे झाडांचे दिवस संपतील
लाकडांचे सुरु होतील
तेव्हा कदाचित् शेतकऱ्यांपेक्षा महत्वाचा वाटू लागले तुला सुतार
शेतमजूरपेक्षा कामगार
आणि नोटांचा करकर आवाज
गरगरताना ऐकू येईल
तुला प्रत्येक माणसाच्या शब्दात
तुला पडतील प्रश्न
लोकांचे चेहरे
जे बालपणी होते सूर्यासारखे गोल

का केले काळाने घड्याळासारखे लांबोडे
त्वचा ओढून ओढून
नाकात कुठला श्वास तास काटा
कुठला मिनीट
सूर्य सगळ्यांनाच वाढतो प्रकाश नीट
तर का कमीआधीक उजेड
प्रत्येकाच्या डोळ्यात
माती आणि सिमेंट ह्याच्यात काय श्रेष्ठ
काय कनिष्ठ
तुला प्रश्न पडेल
मामा इतक्या कविता लिहीतो
तरी इतका गरीब कसा
ह्या आयुष्याच्या शर्यतीत
मेंदू आणि काळजापैकी
कोण कासव कोण ससा?
कविता लिहिणारा हा मामा
तुला देणार नाही काहीच उत्तर कदाचित
कदाचित ना तुझी आई
कदाचित ना तुझे पपा
आमच्यासारखे मौन कमवायला
तुला जाऊ द्यावा लागेल आयुष्याचा काही काळ
तोवर कदाचित आमचे मौनच सांगत राहील की
सर्व प्रश्नांची उत्तरे कधीच देऊ शकत नाही काळ
आणि नाळ
सर्व प्रश्नांशी जुळतेच असं नाही

# निरोप

## फ्रस्टेशन

माझी गाडी फ्रस्टेशनवर थांबलीये
मला कळतय इथून सुटायला हवं
पण गाडी अशी थांबलीये की
जणू तिला निघायचंच नाहीये
लोक येतायत गाडी पाहतायत
त्यांच्या दृष्टीने सर्व नॉर्मल आहे
मी बोलताना असा बोलतोय
जणू माझी जीभ हेवनमध्ये आहे
आणि नरक बिरक काय म्हणतात तो मला ठाऊक नाही
माझ्या बोगीज बोगस काळोखाने भरुन गेल्यात
पण माझी इमेजच जोगीची असल्याने
लोकांना तो काळोखही माझ्या साधनेचा साईडइफेक्ट वाटतोय
ह्या स्टेशनवर मी थांबलोय तर
निश्चितच कुणाचं तरी दु:ख दुर करायच असणारं म्हणून थांबलो असणार
असा प्रत्येक माणसाचा कयास
मी स्वत:च फ्रस्टेशनवर थांबू शकतो
हे माझ्या इमेजच्या विरोधात आहे
मी ह्या स्टेशनवर थांबलोय
आणि डोक्यात तडा गेलेला ड्रायव्हर
स्वत:च्या हॅटचं सौंदर्य पहात
सिग्नल पडण्याची वाट पाहतोय

## आपण

स्वत:च्याच मेंदूत स्वत:ची निष्काळजी मान खुपसून बसलोय शहामृगासारखे
आपण
ह्या अस्वस्थ शरीराच्या अगम्य वाळवंटात झेलत ताण
चालत जावं असं वाटतंय
पण आपले पाय अपायकारक वाळूत रुतून बसलेले
गरम वादळे आसपास
ढगाचा नरम टिपूस नाही
गळ्यात चरम तहान
आणि तरीही पाण्याच्या शोधाची एनर्जी खलास
बेफिकीरपणाची लागवड आपणच केलेली पेशीत
स्वत:लाच वांझ करण्याचा धंदा आपणच शिकवला आपल्या रक्ताला
आपण फक्त इतरांचे ॲक्शन पट पाहिले
आणि स्वत:मात्र स्वप्नातच कृती फलद्रूप होताना पाहिल्या
आपण संपूर्ण बिघडून गेलेलो
टॅलेन्ट नासलं कॅलीबर नासलं क्रियेटिवीटी नासली
अंगाला नासलेल्या आंब्याचा वास आला
तरी आपण फळाचे राजे म्हणवत
उंडारत राहिलो उनाडक्या करत टवाळ्या करत
आपण मापं काढली बापाची मित्राची मैत्रिणीची
आणि प्रत्येकाला फिटींग शिकवत हरदम टाईमपासचं सेटींग करत गमगीन राहिले
आता आत्महत्येची वाट पहात बसलोय म्हणावं
तर मरणाचीही इच्छा ताठ नाही
आपण मग साला आहोत तरी काय?
बहुधा परमेश्वरच चघळतोय आपणाला च्युइंगमसारखा
आणि आपण कधीतरी आख्खे गिळले जाणार ह्या गॅरन्टीतच खुष

## आयुष्यानं

आयुष्यानं कधीच केलं नाही आपणाला माफ
एकेका गुन्ह्याला एकेक क्रूसीफीकेशन ठोकल काळजात
एकेका चूकीसाठी शरीरभर मोजली आपण अकौटंसी
थोडेसे सूर्याखाली ज्यादा बसलो
तर आख्खा चेहरा जाळला आयुष्याने
फूटबॉल खेळताना एक कीक चुकली
तर आख्खा पायच लंगडा करुन टाकला भर मैदानात
एका मारामारीत सगळ्या कॅलक्युलेशन करुनही
चुकून सापडलो एका फाटकात
तर आख्खा पाठीचा कणाच भस्मसात केला
आणि तो राजयोगात टिकवता टिकवता
मोक्षाचा दरवाजा चुकला आपला कायमचाच
विषय कधीच नीट निवडता आले नाहीत आपल्याला
आणि बेकारी ठोकली गेली आपल्या कपाळात कायमची
आपली जन्मतारीख देखील चुकीची पडली आपल्या सर्टिफिकेटवर
आणि वाढदिवसांचा मेळ कायमचा चुकला
एकेक हिशेब चुकत गेले वहीतले
म्हणून धंद्याकडे वळलो आपण
तर बापाचे दुकानच दिवाळखोरीत गेलेले
प्रत्येक ठिकाणी कोंडी आणि नसबंदी
आता ह्या भिंतीला टेकून हताश होऊन आपण बसलोय
तर ह्या घराचे छप्परही उडत चाललेले डोक्यावरुन

## बेकारी : १

साली ही नुस्ती फ्रस्टेशनच आहेत वळवळणारी
हा भेजा आहे की भजी तळणारा स्टॉल
साला नाकाला तर अशी भोंक पडलेत की
श्वासाची मालगाडी बुलेट ट्रेनसारखी चिरपार आत
पाय तर नुस्ते हवा उडवत देवानंद
एक गंजच चढत चाललाय
आयुष्याच्या मेटॅलीक मेन्टॅलीटीवर
आसपास वाजतोय भप्पी लहरीचा चोरुन आलेला डिस्को
आणि आपण आपल्या फियोस्कोला बॅकग्राऊंड म्युझीक देत
टेपा लावतोय
हे असं उंबऱ्यावर बसणं बरं नाही
ही अशी पत्र्यावर गांड शेकवणं बरं नाही
ही नुस्ती पुस्तकं उलटी करत ज्ञानाच्या उलट्या काढणं बरं नाही
ही नुस्ती ढगांची भिकारचोट सर्कस बघत डोळे आपटत
टाळ्या वाजवणं बरं नाही
काहीतरी करायला ही चान्स नाही ह्या येडझव्या बेकारीत
ना नोकरी ना धंदा
नुसता वांदा सोलत बसायचं काळाच केळ खात
आणि रोज आपणच टाकलेल्या सालीवरुन
गांड आपटत आपणच घसरायचं
ही अशी अंगाअंगातून उगवणारी खुन्नस
आणि ह्या भिताड्यावरुन ताडताड सरकणाऱ्या मुंग्यांची ताडमाड रांग
त्यांनाही कळतय साखर नेमकी कोठून आणायची ते

## बेकारी : २

त्रास त्रास त्रास त्रास हाय साला सगळं आयुष्य
करवदायचं आणि स्वत:च्या डोक्याच्या नारळ फोडून
स्वत:चाच काथ्या काढायचा
किंवा निस्तंच हिंडायच स्वत:तच फाफलत फर्लांगफर्लांगभर
हे थर्डक्लास मुतल्यासारखा डाटा भरायचा
आणि हगल्यासारख इंटरव्यू द्यायचा
वैताग हाय साला
ही घराची माणस वैताग आहेत
हे सगळे भिकारचोट दोस्त वैताग आहेत
हे घरटी घरटी राजकरण
आणि उंबऱ्याउंबऱ्यात मूळं नसलेला उंबर
कसली अध्यात्मिकता आणि कसलं आत्मज्ञान?
आख्खी पृथ्वीच जिथं बोडकी होतीयं
तिथं आपलं झाटूक केसासारख धुळीला मिळणं
कुणात फरक करणाराय?

## बेकारी : ३

माझ्या घरातील प्रत्येकजण
आत्महत्या करण्याच्या मूडमध्ये
आणि तरीही प्रत्येकजण
दूसऱ्याची जबाबदारी स्वत:च्या शिरावर मानून
ती टाळतोय
प्रत्येकाचेच डोळे कण्टाळून गेलेत आयुष्य बघून
प्रत्येकजण आयुष्याकडून झालाय साफ निराश
एक प्रचंड शाप सापासारखा वळवळतोय माझ्या हताश घरावर
जो कुणालाच लाभू देत नाही कसलंच सुख
प्रत्येकाची त्वचा पडत चाललीये काळीठिक्कर
प्रत्येकालाच मूळं शोषून शोषून झालीये मूळव्याध
चष्मा तर प्रत्येकाच्या डोळ्यावर करतोय नृत्य
आणि नाक घेतय नाईलाजानं परत करता येईल एवढाच श्वास
प्रत्येकजण गोंधळलाय ह्या तीव्र जगण्याच्या स्पर्धेत सरफेस फेस करुन
प्रत्येकालाच ह्या रॅटरेसमधून बाहेर पडायचंय मांजराच्या पावलानं
प्रत्येकाचं डोक ठणकतय आता ईश्वरावर आदळून आदळून
एक सर्वंकष कसर थेंबाथेंबान गळतीये आयड्रॉपसारखी प्रत्येकाच्या डोळ्यात
प्रत्येकजण आतून पूर्ण संपलाय
जे अध्यात्म चालत आलं वारसा म्हणून
ते काम करत नाहीये आरसा बनून
ज्यानं ते शिकवलं तो माझा आजोबा स्वत:च स्मृतीभ्रंशाने ग्रस्त होऊन शोधतोय
त्याच्या म्हातारपणात स्वत:ची आयडेयंटी
आणि जे ते शिकलेत
ते हेच आपलं अध्यात्मिक फ्युचर असेल काय
ह्या विचाराने ग्रस्त होऊन त्याच्यामागे हिंडताहेत
सांभाळत त्याची म्हातारपणाची आरामखुर्ची

## छाया....

ती जग सोडून गेली तेव्हा तिच्यामागे उरल्या होत्या कित्येक अफवा
ज्यांनी नेहमीच तीच्याभोवतीची हवा ट्रान्सलेट केली
पण ज्यांना कधीच तिचा श्वास भाषांतरीत करता आला नाही
ती जग सोडून गेली तेव्हा धावून आले कित्येक घेणेकरी
ज्यांनी तिचं शरीर गहाण ठेवून घेतल होतं
आणि तरीही जे ती व्याज म्हणून नेमकं काय देईल
ह्याची उत्सुकतेने वाट पाहत होते
ती जग सोडून गेली तेव्हा अंत्ययात्रेला तिचे कित्येक प्रियकर हजर होते
आणि प्रत्येकजण स्वत:ला एक्का दुसऱ्याला छक्का समजत होता
ती जग सोडून गेली तेव्हा तिच्या घरात
पत्र चिठ्ठ्या मृत्यूपत्र वगैरे काहीच मिळालं नाही
आदल्या दिवशीच तिनं तिच फर्निचर विकलं होत विकल होऊन
आणि मिळालेले सर्व पैसे एका अशा ट्रस्टला दिले होते
ज्याने तिला मेल्यानंतर व्यवस्थित जाळण्याचे कायदेशीर वचन दिले होते
ती जग सोडून गेली तेव्हा उत्तम जळाली
आणि सगळं जग तिला जाळून झाल्यानंतर
स्मशानातून हात हालवत स्वत:च्या घरी परतत होतं

## चित्रकारास एक उपदेश

ह्या छोट्या शहरात
जिथे पेन्टीगज कटी पतंगइतकीही महत्वाची वाटत नाहीत
तिथे हा स्टॉल लावला काय न लावला काय
मॉडर्न म्हटलं की ज्यांना उद्यमनगराऐवजी मुतारी आठवते
आणि ज्यांची दृष्टी शिवाजी आणि शाहू महाराजांच्या पलिकडे जात नाही
तिथे तुझे सररिॲलिझम काय
आणि ॲक्शन पेन्टीग काय
हे शहर अजून आबालाल रेहमानच्या हत्तीकडेही बघायला तयार नाही
तिथे ही तुझी रंगाची फोरव्हीलर होळी
काय कामाची?
इथे डोळे विझत तरी जातात किंवा झवत तरी
इथे लोकाना ब्रश म्हटले की दाढी आठवते
आणि कॅनव्हास म्हटले की रॉकेलच्या कॅनचा वास
जिथे मित्रा तुझे हात हातात घ्यायला

ह्या शहराला सवड नाही
तिथे तुझ्या मेंदूचा चेंदामेंदा इनस्टॉलेशनमध्ये मांडलास
म्हणून तो धोडाच बंदा रुपया ठरणाराय?
कवी काय आणि चित्रकार काय
आयुष्याची खाजवून खाजवून काढलेली खरुज
इथे कुणालाच नकोय
तेव्हा तूच वाजव
लॅण्डस्केपची आणि सेल्फपोर्ट्रेटची आणि पोर्ट्रेटसची प्राचीन चिल्लर नाणी
किंवा तुझी रुपायाची सररियॅलिस्टीक नोट खिशात टाकून मुकाट
मुंबई गाठ
हे शहर
कलावंताची पाठ पहायला सरावलेलं आहे
मित्रा त्याच्याकडे तोंड करून
कॅनव्हासवर तोण्डघशी आपटू नकोस
हे शहर
कलावंताच्या पडलेल्या दातांना भाव देण्याइतपत
अद्याप पुढारलेलं नाही

## निरोप

मला आता एक तलवारच आणून द्या
उडवूनच टाकतो ह्या शहराच मुंडक
तुकडे तुकडे करतो ह्या रस्त्याचे
ह्या तळ्याचे ह्या राजवाड्याचे
हे शहर आहे की ढोंग
सालं नुस्तचं बोंबलतं
आणि करत काहीच नाहीये
एक हत्तीच आहे जो नुस्ता पोसतोय स्वत:ला
आणि समोर घोडा आला
की सोंडेने फेकून देतोय
आपणही पोहचत नाही
इतरांना पोहचू देत नाही
एकमेकांचे पाय कापत एकमेकात चालतायत कधीपासून सर्व
आणि तरीही प्रत्येकाला स्पष्ट दिसतोय म्हणे ज्याचा त्याचा चन्द्र

श्रीधरा,
तू सूर्य आहेस
ह्यांच्या पोर्णिमेतून चालता हो

**(खंड पहिला १९८६-८७ समाप्त)**

# आत्मचरित्रातले काल्पनिक क्षण
## Toucble
### खंड : २
### (२०००-२००४)

- श्रीधर तिळवे

## सुपरबाझार

### १

कलियुगात
ईश्वर पृथ्वी निर्माण करत नाही
तो ती आपण निर्माण केली असं लिहून घेतो
कलियुगात
सैतान पुस्तक लिहित नाही
फक्त वाचलं जातं ते पुस्तक अंतिम आहे असं सांगतो
कलियुगात
स्वर्गाच्या कानात काही पुटपुटलं कि ते बहिरे होतात
नरकांच्या कानात काही सांगायला गेलं की ते कान कापून हातात देतात
कलियुगात
श्रध्दा काहीच करत नाही
ती फक्त तिलाही न कळलेलं काहीतरी फॅसिनेटींग आवाजात पुटपुटत जाते
कलियुगात
मरणापूर्वी प्रत्येकाला वेड लागतं
कोणी ते कवितेत साजर करतं कोणी खरेदीत
कलियुगात
माणसाचं मुद्दल
निसर्गाचं कर्ज अदा न करताच बिनबोभाट निघून जातं
कलियुगात
काही रोगानां पेशंट इतके आवडतात
की ते त्यांना स्वत:बरोबरच घेऊन थडग्यात जातात
कलियुगात
गोलमाल बनवणाऱ्यानेच पृथ्वी गोल बनवलीये
त्याला आपण काय करणार?

### २

कलियुगात
एके दिवशी तू उठलास
तर गिऱ्हाईक आलेच नाही
गतोरात सुपरमार्केट प्रसिध्द झाले होते
ते आले होते
त्याने पाहिले होते
आणि त्याने तुझे सगळे गिऱ्हाईक जिंकले होते
बघता बघता तुझी नऊ वारी लेडीज रुमाल झाली होती
आता मी जेव्हा जागा होऊन पाहतो
तर आख्खे जग
स्वप्नात सुपरमार्केट खरेदी करत असते

### ३

असं नाही की
सुपरमार्केट येणार हे आपणाला माहितच नव्हतं
परिवार डिपार्टमेंटल ते जनता बाजार
एकेक ढग हत्तीसारखा चालून येत
फ्रेश करत होता हे शहर
बीग बाजारविषयीचा पूर्वग्रह व आळस यांची धुलाई करत
पण जे ग्रॅण्ड नॅरेटीवसारखे आहे भव्य
ते एक दिवस मोडीत निघणार आहे
ह्या पोस्टमॉर्डन गैरसमजात मश्गूल राहिलो आपण
आता आख्खा राजवाडाच लीजवर देण्यात आलाय
बाजार मांडण्यासाठी
आणि त्यातील वस्तुगत पायांचे डायनॉसॉरस
गिळत सुटलेत आसपासचं प्रत्येक दुकान
शाहू महाराजांनी राजवाडे शाळा काढण्यासाठी दिले
हे महाराज जास्तीत जास्त ते महाविद्यालय काढण्यासाठी देतील
ह्या भ्रमात राहिलेले तुझे डोळे
पुन्हा पुन्हा भरुन येतायत आणि मला अस्वस्थ करतायत
हे पाणी जखमेचं आहे
की हे पाणी अपमानाचे आहे?
माझ्या बापा,
शेवटी राजेरजवाड्यांनाही जगायचे असते
आणि जगणे बाजारात काही विकूनच कमावता येते.

### ४

ही संस्कृती
ईश्वराशी संस्कृत
बाजाराशी इंग्लिश
बायकांशी हिन्दुस्तानी
आणि सामान्यांशी मराठीत बोलते
हिच्यात फक्त सरडेच ओरिजनल आहेत
आणि पांढरे हत्ती
आयात करण्याचे व्यसन हिला थ्रील देतं
ही नेहमीच दु:खात असते
म्हणून हिच्या अंगावरच्या साड्या
नेहमी दिवसा पांढऱ्या आणि रात्री काळ्या असतात
ही चालते
तेव्हा पायातली कोल्हापुरी चप्पल
हिला तोंडघशी पाडते
हिला सोडून
हे चिल्लर दुकान घेऊन
आपण कुठे जाणार आहोत आणि कुठवर?

५

माणसे देवावर बोलतात देवावर लिहितात देवासाठी भांडतात
पण देवासारखी होत नाहीत
आयुष्य हे असं कर्ज आहे
ज्याचं मुद्दल कधीच फिटत नाही
तू म्हणतोयस
"Super market is vulgar expxession of god"
असेल
पण मग आपलं दुकान काय आहे
"But size does matter Raja
It can change quality"
असेल असेही असेल
सुपरमार्केट ऑरगॅझमचा अनुभव देऊ शकत असेल
आणि आपले दुकान फक्त कीसचा
माझ्या बापा,
काळ ब्ल्यू फिल्मचा आलाय
आणि लोक कलेक्टीव सेक्सच्या दिशेने
स्वत:तून वस्तूतून निळा आवाज करत चाललेत

६)

"प्रश्न फक्त काळाचा आहे
आज ना उद्या सर्वच
शेवटी सुपरमार्केटमध्ये पोहचणार आहे तेव्हा मुकाट्यानं...."
गुंड येतायत
कानात धमकीचं शिसं ओतून निघून जातायत
तुझे कान धमकीत वितळत नाहीत
मात्र तुझी दोन काळजं एकमेकाची धुलाई करतायत
दुकान बन्द करावं की न करावं ह्या प्रश्नात
माझं रक्त अंपायरसारखं लाईव शो पाहतय
खरंतर तुला माझ्याशी धाडसाबद्दल बोलायचय
पण तुझ्या एकाही काळजाला ते जमत नाहीये
खोटं बोलायला तुम्ही उत्कृष्ट भाषापटू असावे लागता
आणि तू तर असा मनुष्य आहेस
जो नेहमी सत्य बोलतो
पण सत्य बोलतानाही ज्याची शैली बिनबुडाची असते
ईश्वर अजूनही माणसात शहाणपण पाठवण्याची मेथड शोधतोय
आणि डॉन आपण कुणासाठी काम करतोय ह्याचा विचार न
करताच
तुझ्यासारख्या संताना धमकावतोय
संध्याकाळ झाली की तू नोकरांना म्हणायचास
"जा जरा बायका पोरांना वेळ द्या
दुकान काय शाश्वत आहे"
आता तुझ्याच दुकानात कधीकाळी नोकर असलेला माणूस
चोवीस तास सुपरमार्केटची मॅनेजमेंट चालवतोय
आणि तू तुझ्या बायकापोरात आऊटडेटेड होऊन
दुकानाच्या चिंतेत पडलायस

७

काखेत आगीचे केस ठेवून
शांतपणे चालून येतय तुझ्यावर हे कपडेबाज युग
एक एक दुकान सुपरमार्केटला जाऊन मिळतय
तरी सुपरमार्केट बरचसं रिकामं आहे
त्यात काय ठेवणं बाकी आहे
कुणालाच माहीत नाही
सुपरमार्केटमध्ये प्रत्येक गोष्टीचा शेवट त्या गोष्टीबरोबर झोपण्यात
होतो
मग झोपल्यानंतर उगवतात
स्वप्ने किंवा मुले किंवा प्रचंड अपेक्षाभंग करणाऱ्या रात्री
मेलेल्या पंतप्रधानापेक्षा जिवंत सामान्य माणूस लाखमोलाचा
असतो
हे कधीच न कळलेला हा देश
त्याला तुझं जिवंत दुकान काय कळणार
तुझे शॉप कॅरी करण्याची ताकद
सुपरमार्केटनं मूठ मारलेल्या ह्या हवेत शिल्लक नाही
आणि तुझे दुकान तर
पंखहिन आहे

८

पाणी इतिहासाचं बांधकाम करत नाही
पाण्याचा अमर होण्यावर विश्वास नसतो
पाण्याचा खरा इंटरेस्ट धावण्यात असतो
राजवाडा आदर्श सुपरमार्केट होण्यासाठी पाण्यासारखा धावतोय
त्याच्या भिंतीतील इतिहासाचं काळं बर्फ
रंगीबिरंगी अर्थशास्त्रात रुपांतरीत होण्यासाठी
वस्तूवस्तूतून विस्तव घेऊन वाहतय
लोक येतायत
लोक जे प्रामाणिकपणा औषधापुरताच स्वभावात ठेवतात
आणि अवाढव्य रोगासारखा पण हमखास यश मिळवून देणारा
अप्रामाणिकपणा
त्या औषधाने वाचवतात
येतायत
लोक येतायत
आणि
"आपण सामान्य माणसे आहोत"
ह्या वाक्यातच
"आपण सामान्य ग्राहक आहोत"
हे अध्यान्हत होत चाललंय

९

प्रत्येक दारू एकदा तरी प्याविशी वाटते
प्रत्येक वस्तु एकदा तरी घ्याविशी वाटते
प्रथमच सुपरमार्केटमध्ये शिरलेले लोक
हा राजवाडा शेवटी बाजारातून पब्लिक झाला
वस्तूंच्या पाठलागाला प्रचंड जागा
आणि ऐसपैस वेळ
सर्वांनांच शिकार चढत चाललीय
आणि भक्ष्य शिकाऱ्यांवर खूष आहे

१०

पाण्यानं तुझ्या गालावर झिरपणीनं लिहिलेल्या सुरकुत्या
आता खोल जातायत
नाहीशी होत चाललीये
तुझ्या डोळ्यातील दृष्टी ताजी ठेवणारी ओल
तुझ्या श्वासाच्यां शेजारीच तयार होतायत नवे रस्ते बैठ्या
श्रीमंतांसाठी

जे थेट सुपरमार्केटला मिळणारायत
जाहीरातीच्या भाषेतील गोडवा अतिरेकी होत वजन वाढवतोय
तरी
लोकांना पटत नाही तुझी मिताहरी बोली
जन्म जो तुला त्रासदायक गुन्हा वाटत होता
त्यांना सुखदायक गुन्हा वाटतोय
आणि तो आधीक सुखदायक वाटावा म्हणून
लोक काळ्या पैश्याने पांढरी स्वच्छ खरेदी करतायत
आईने एकदा मला काही स्वर्ग दिले
नरकाविषयी तिची भये सांगितली
आणि पृथ्वीविषयी बोलता बोलता ती अचानक उदास झाली
ह्या सुपरमार्केटमध्ये मला तिच्या उदासीचा अर्थ कळतोय

## ११

सुपरमार्केटमधली कुठलीही वस्तू सुखदायकच होते
आपल्या घरी आली की
भले मग तिचा उपयोग काहीच नसो
काहीच न करण्यापेक्षा गुन्हा केला आणि पस्तावलो हे कधीही
चांगले
फिनीशिंग टच मिळालेले दोन हात
एक विकतोय एक खरेदी करतोय
आणि दोघेही काम करतायत एकमेकासाठी एका माणसात
माणूस जो हार्डकोअर माणूस होता होता हार्डवेअर माणूस झाला
सुपरमार्केट सर्वत्र ह्या नव्या माणसाचा स्फोट करतय
आणि त्या स्फोटात तुझ्या आसपासच्या किरकोळ दुकानातील
लोखंडी तराजू जळतायत

## १२

ज्याला संत व्यभिचार म्हणतात
तो सुपरमार्केटमध्ये खरेदीचे हवामान तयार करतोय
त्याची मशिनरीही आता रंग बनवायला लागलीये
कदाचित होळीही साजरी होईल
एकमेकावर मशीनमधून रंग उधळत काही वर्षांनी
एक स्वेच्छा सोडली तर ह्या मशिनरीत काय येणं बाकी आहे?
खरेदी ही तुझ्यात पार्टटाईम गोष्ट असेल
तर सुपरमार्केटात ती संपूर्ण अस्तित्व बनतीये
विंडोशॉपिंग म्हणजे वस्तूंच्यावर लाईन मारणे
लोकांना विंडोशॉपिंग करायचय
तर तुझ्या दुकानाला विंडोज नाही
खरेदी म्हणजे वस्तूंशी लग्न करणे
लोकांना वस्तुशी लग्न करायचय
तर तुझ्या दुकानात बँडबाजाच नाही
तू आहेस एक असा साखरपुडा
ज्यात तुझी प्रत्येक वस्तु
दरिद्री वधूसारखी लग्नाच्या तारखेची वाट पाहतीये

## १३

जे माझ्यातील सूर्यात उगवते ते पूर्व
जे माझ्यातील सूर्यात मावळते ते पश्चिम
नाहीतर निसर्गात
काय पूर्व काय पश्चीम
घर स्वत:च्या दोन हातांनी बांधण्याचे दिवस
तुझ्या बापासमोर संपले
आणि आता स्वत:चं दुकान स्वत:च्या हातांनी सजवण्याचे दिवस
तुझ्यासमोर संपत चाललेत
माझ्यासमोर कसले कसले दिवस संपणार आहेत
मला माहित नाही
अलिकडे माझ्यासमोर रोज तुकाराम सुपरमार्केटमध्ये येतो
आणि म्हणतो
बरे झाले देवा कुणबी केलो
सुपरमार्केट म्हणते
तुकारामा तुझे दिवस संपले अलिकडे दंभाने कोणीच मरत नाही
काही वर्षांनी नांगरही इथे भाड्याने वा विकत मिळेल आणि
जमीनही
मग हौशी शेती आणि हौशी नांगरट पर अवर

## १४

तुम्ही जितके आधीक शहाणे होत जाता
तितके तुमचे दु:ख वाढत जाते
तू अधिकाधिक शहाणा होतोयस
आणि तू अधिकाधिक दु:खी होतोयस ह्या जाणिवेने मी अस्वस्थ आहे
एकच घटना सर्वत्र घडवून आणण्याचा उपद्व्याप
तुझ्या जिव्हारी लागतोय
मृतांची स्तुति आणि जिवंताची निंदा करणारं हे शहर
आता कॉस्मॉपॉलिटीन बनत चाललय
ह्या शहरावर एकेकाळी मी लिहिलेल्या कविता
आता माझ्या मलाच ओळखू येत नाहीत
ही एक अशी सुरवात आहे जी संपतच नाहीये
घर व्यवस्थित लागण्याआधीच आलाय तुझ्या दारात
तुझ्या उपजिविकेचा पध्दतशीर मृत्यू
स्पर्धेचा कान तीक्ष्ण आणि नाक लांब करुन
आणि तू
काळाइतकाच म्हातारा दिसायला लागलायस
कुठलीच आशा न उरलेलं तुझ विधुर दु:ख
आता हताशतेत काळवंडत चाललंय
तुझ्या आसपास
सगळेच सद्‌गुण सुट्टीवर गेलेत
आणि दुर्गुण शाळा चालवतायत
"तू माझं काळीज कापून न्हे पण माझं दुकान नको घेऊस"
तू विनंती करतोयस
"पण तुझं काळीज कोण विकत घेणार?"
सुपरमार्केट हसत हसत विचारतय
तुला वाटतय
तुझ्या शरीरात असं काही आहे जे अमर्त्य आहे
म्हणूनच तुला मरायंच नाहीये
तुझा आत्माच तुला भित्रं करतोय
आणि तुझ हे भिणंच
तू आयुष्यभर कमावलेल्या सद्‌गुणांची परीक्षा घेतय
सद्‌गुणाला रस्ते नसतात पूल नसतात
एकतर तुमच्यात तो संपूर्ण असतो किंवा अजिबात नसतो
"राजा,
मी खरंच सद्‌गुणी आहे की भयापोटी मी सद्‌गुणी झालो?"
तू वारंवार मला विचारतोयस
आणि माझ्याकडे तुझ्या ह्या प्रश्नाचे उत्तर नाहीये
हे किती बरं आहे की

आपण सगळेच इस्पितळात आहोत
आणि आपल्यातील प्रत्येकजण एक दिवस मृत्यूने बरा होणार आहे

## १५

बाजार बोलायचा तेव्हा कविता फक्त बोलायची
बाजार लिहू लागला तेव्हा कविता लिहू लागली
बाजार छापू लागला तेव्हा कविता छापू लागली
आता बाजारच
अनेक प्रोग्राम्समधून सरपास होतं
एकाच सुपरमार्केटमध्ये अवतरतोय
माझी कविता
कुठल्या प्रोग्राम्समधून सरपास होतीये
आणि कुठल्या सुपरमार्केटमध्ये अवतरतीये
माझ्या अनेक कविता आताशा
सुपरमार्केटसारख्या टोलेजंग होत चालल्येत
आणि मी
माझा काळ मला स्पॉन्सर करतोय की काय
ह्या विचाराने भयग्रस्त आहे
माझ्या बापा
जर भाषाच सुपरमार्केट असेल
तर माझी कविता तुझ्या दुकानासारखी राहणे
कठीण दिसते आहे
हल्ली तू माझ्या कवितेविषयी वारवार कुरकुरतोयस
म्हणून सांगतोय
"माझे माणूसपण तुझ्या दुकानाइतकेच धोख्यात आहे"

## १६

खून करणाऱ्या लोकांचा शाळेतला सिलॅबस काय असतो
माणूसकी न शिकवणारी शाळा काय लायकीची असते?
सुपरमार्केट एखाद्या खुन्यासारखं चालून येतय
आणि त्याच्या कार्पोरेट डोळ्यांविषयी
बोलताही येत नाहीये
आणि मौन पाळताही येत नाहीये
ते चालून येतंय उग्र चेहऱ्यानं तुझ्या आसपासच्या प्रत्येक
फेरीवाल्यावर
आणि प्रत्येक फेरीवाला ते चालून येतय म्हणून
नाईलाजानं त्याला स्वत:ची जागा देतोय
शेतात ती दासाकडून भले पेरली जात असतील
पण पीक होताना
बीजबीयाणं स्वतंत्र होतात
आम्ही बीयाणं आहोत हा तुझा विश्वास कोलमडून पडतोय
वैश्यांविषयी कसलाच आदर नसलेले हे थर्डक्लास मराठी कल्चर
सगळीकडून काढता पाय घेतय
आणि सुपरमार्केटस ते निघताना
त्याला अत्यंत प्रेमानं प्रगतीची व शांतीची राखी बांधत
ओवाळणी म्हणून आख्खी जागा वसूल करतय
कुठलंच सरकार बाजारात सभ्यता तयार करु शकत नाहीये
कुठलाच धर्म संपत्तीला टेन कमान्डमेन्टस देत नाही
म्हणूनच तुझा लढा एकटा पडत चाललाय
आणि तू हारावास म्हणून
सगळ्यांनीच बुडवलेत
स्वच्छ मीनरल वॉटरमध्ये
आपापले देव

## १७

अर्थकारण कळत नसलेले कवी
ज्यांना मॉल आणि सुपरमार्केट ह्यांच्यातला फरक कळत नाही
सेलला लागलेत
आयुष्याला दुसरी आवृत्ती नसते
दुसऱ्या आवृत्तीत चूका सुधारण्याची वाट पाहणारे
सेलला लागलेत
ज्यांच्याजवळ
कनवींस करायला मेंदूत ताकद
मुद्दा गळ्यात उतरवायला तोण्डात जीभ
वा वाईटचं डोकं कापायला शब्दात तलवार नाही
सेलला लागलेत
तुला वाटतय की माझे कविमित्र तुझ्यासाठी सहानुभूती होतील
आणि कवी
तुझं दुकान काळं आहे की गोरं
हे ढुंकूनही न पाहता
सुपरमार्केटमध्ये लागलेल्या सेलमध्ये
त्यांच्या बायकांसाठी साड्या खरेदी करतायत

## १८

प्रथम माणसाचा विचार मारा
मग माणूस
जो मरत नाही त्याला विकत घ्या
मग इतिहास संपवा
कारण लोकांना वर्तमानात खरेदी करायची असते
लोक तुमच्या कृत्याचे स्पष्टीकरण मागतील
तेव्हा लोकांना पटवा
"बहुजन हिताय बहुजन सुखाय हा समाजाचा मुख्य कायदा आहे
आणि आम्ही जे केलय
ते ह्या कायद्याला धरून आहे"
लोक पटवले गेलेत
आणि ह्या युध्दात ते तुझ्याबरोबर नाहीत
युध्दात कायदे मूक होतात आणि शस्त्रे बोलतात
ह्या युध्दात मुख्य शस्त्र पैसाच आहे
मी जंगल हिरवे असतानाच मरेन
ह्या तुझ्या अट्टाहासाला आता ह्या युध्दात काय अर्थ उरलाय?
सगळं कसं पिवळं पडत चाललय
आणि लोक म्हणतायत, "सुवर्णयुग येतय"

## १९

लोक पूर्वी राजवाड्यांनी भारुन जात
आता सुपरमार्केटसनी भारावून जातायत
लोकांना नेहमीच उंच प्रचंड आणि भव्य आवडतं
हे किती सिम्बॉलिक आहे कि
ह्या शहरातलं सर्वात मोठं सुपरमार्केट राजवाड्यात आहे
हे जग
जिथे प्रेम आणि हत्या एकमेकावर टपून आहेत
दिवसेनदिवस जगणं अवघड बनवत चाललय
लोक सुपरमार्केटमध्ये येऊन सोपे होतायत
माणूस बागेत जन्मतोय
म्हणूनच त्याला जंगलाचं भय आहे
इथे त्याला खरेदी करताना गार्डनइतकंच सुरक्षित वाटतय

बाहेर चोरी करणारेच प्रथम चोर चोर म्हणून ओरडत जातायत
इथे आता खरेदी करणारा सभ्यच मानला जातोय
हा माहौलच असा
की इथे पशूही ग्राहकाळला जाईल
म्हणूनच आलेल्या प्रत्येकाचं सुपरमार्केट वर प्रेम आहे
इतकं की कोणीच सुपरमार्केटवर चांगल बोलत नाही
आणि चांगलं बोलणाऱ्याविषयी वाईट बोलतं
लोक आवडलेल्या वस्तू खरेदीच करतायत
कारण त्या सोडल्या की
सोडलेल्या टंच प्रेमीसारख्या झोपेत त्रास देतात
हे जग एकतर तुम्हाला संत बनवतं
किंवा तुम्ही हे जग आधीक पापी
मी संत बनतोय की हे जग आधीक पापी बनवतोय मला माहीत नाही
मला इतकंच माहीत आहे की मी वस्तु नाही
आणि तरीही ह्या सुपरमार्केटमध्ये मी आलो
की लोक मला माझी किंमत विचारतात
माझ्या बापा
जिथे माणूसच सेलला लागला आहे
तिथे तू तुझे दुकान कसे वाचवणार
आणि किती काळ

## २०

असं नाही की
लोकांना बालपणातल्या त्यांच्या गोष्टी खरेदी करायच्या नाहीत
त्यांना त्या आठवतात
पण ह्या सुपरबाजारात आता त्या अवेलेबल नाहीत
काळ जुन्या वस्तूत थांबत नाहीये
तो नव्या नव्या वस्तू बनवत सर्वांच्या समोर उभा ठाकतोय
कुणाचचं आयुष्य आता राहिलं नाही उधार
ज्याला त्याला मिळते आहे ज्याची त्याची रोकड
कुणी ती उधळतय
कुणी ती काळजीपूर्वक वापरत आधिकाधिक खरेदी पदरात पाडतय
शेवटी ही सगळी खरेदी करून आयुष्य कुठं जाणार आहे?
कोणीच विचारत नाही
आयुष्याला अडचणीत आणणारे प्रश्न
ज्याला त्याला हवीये उब
कुणास कोमट कोणास उष्ण
माझ्या बापा
तुझ्या दुकानात होणाऱ्या गंभीर चर्चा
बघता बघता जमीनदोस्त होतायत
आणि सुपरमार्केटस त्या चर्चांची पुस्तकं सेलेबल नाहीत म्हणून
ती विक्रीला ठेवत नाहीत

## २१

ब्रॅण्ड इतके एकमेकासारखे आहेत
की ते सवतीसारखे एकमेकांचा मत्सर करतायत
कॉस्मो संस्कृतीत धर्म हा चिकित्सेचा विषय होऊ शकत नाही
म्हणूनच लोक धर्मावर श्रध्दा ठेवतायत
आणि ब्रॅण्डसची चिकित्सा करतायत
ती फार खोलवर जाऊ नये म्हणून
प्रत्येक ब्रॅण्ड बनवतो आहे जाहिराती
आणि जाहिराती प्रत्येक ब्रॅण्ड ही धर्मासारखीच अफूची गोळी आहे हे न सांगता
ब्रॅण्डविषयी तेच सांगतायत
जे ईश्वराविषयी पुराणे सांगत
The Return of Metaphysics
Or
The Return of Supermetaphysics
जाहिराती कवितेचा मेटॅफिजीकल दुरूपयोग करत सुटलेत
आणि कविता चिकित्सा नको असलेल्या बायांसारख्या
भाषेच्या सुपरमार्केटमध्ये
शब्दांची मेटॅफिजीकल विक्री करत
ब्रॅण्डीग कमवतायत
सर्वत्र होतोय माझाच खून
आणि मी खूनी शोधत
माझ्यातच शेवट शोधत असलेल्या कवितेसारखा हिंडतोय

## २२

तुझं तुझ्या जुन्या आरामखुर्चीवर प्रेम आहे
आणि ह्या जुन्या पांढऱ्या कोटावर
जो तू मला मुंबईत येताना दिला होतास
तुझं नागेशीतल्या त्या जुन्या घरावरही प्रेम आहे
जे विकून मला मुंबईत प्लॅट घ्यायचा होता
आता तुझ्या लाकडी खुर्चीला प्लॅस्टीकची वांळवी लागलीये
तुझ्या कोटावर चढलीये जीन्सची निळी बुरशी
आणि घर कधीपासून कपडे काढून
कमर्शिअल कॉप्लेक्स मागत नागडं उभंय
फक्त कोल्हापूरातलं दुकानच असं आहे
जे इतकी वर्षे काळानं टोलवूनही दुकानासारखंच उभंय
मी तुझा आवाज ओळखायला ह्या दुकानातच शिकलो
ह्या दुकानातच मला कळालं की तू किती हॅण्डसम आहेस
आणि बायका तुझ्यावर कशा भाळतात
आणि तू कसा चारित्र्य राखून उभा आहेस
मला तुझ्याकडून काहीच आलं नाही
शिवायकी तुझे गुलाबी देखणे तळहात
जे आजही माझ्या सावळ्या हाताला शोभत नाहीत
आणि कदाचित तुझं नशिब
जे कलावंत असूनही दुकानदारीत भटकलं
ह्या दुकानासमोर उभा राहताना
मी आजही गदगदून खूप रडतो
'तिळवे भांडार'
ह्या बोर्डाचा जुना दरारा आता खतम झालाय
आणि नव्यानं आलेल्या सुपरमार्केटच्या वाऱ्यात
एकेकाळी देवआनंदच्या फुग्यासारखे असणारे त्याचे केस
आता बसत चाललेत
तुझ्या म्हाताऱ्या देहाने मी व्याकूळ होत नाही
तू एक हारत चाललेली लढाई लढतोयस
ह्या विचाराने काळजात चौफेर फाटतो

## २३

"सुपरमार्केटस मित्रहो शेवटी माणसाच्या संस्कृतीची अपरिहार्य प्रगती आहे

ही प्रगती मानवी आहे कारण
सुपरमार्केटसंना लागणारे ग्राहक शेवटी मनुष्यजातीतून
मिळतात ''
प्रत्येक जीभ आता स्टेरिओफोनिक साऊंडमध्ये बोलतीये
प्रत्येक डोकं जे डोंगर होतं आता पोकळ होत चाललय
भाषा प्रचंड झालीये
आणि सांगण्यासाठी तिच्याजवळ काहीच नाहीये
दमदार मोर्चे निघतायत त्या दमेकरी लेखकांच्याविरूध्द
जे श्वास पणाला लावून
करंट हवेविरूध्द लिहितायत
आणि जे वाचलेच जात नाहीत
त्या चित्रकारांच्या विरूध्द
जे हात पणाला लावून रंगवतायत
प्रक्षेपणामधल्या रिकाम्या जागा
आणि जे पाहिलेच जात नाहीत
लोक न्यूज पाहून वाटाण्यासारखे उतावळे होतायत
आणि टणाटण उड्या मारून स्वत:ची न्यूसन्य व्हॅल्यू वाढवतायत
वाईट गोष्टी मृत्यू येईपर्यंत जातायत ताणवल्या
आणि चांगल्या जन्मून मेल्या तरी
बाणवल्या न जाता
दहनासाठी स्मशानात एकट्या सोडल्या जातायत
सांगणारे सांगतायत हे मीडीयाचे एज आहे
आणि मिडिया आपलं एज
त्याला सोळावं वरीस सुरक्षित वाटत असल्याने
सोळाच्या पुढे वाढू देत नाहीये
एक वसंत आलाय
आणि तुझ्यासारखे शिशिरातले संत
ह्या झाडावरती मुंजाइतकेच विसंगत वाटायला लागलेत
माझ्या बापा
आसपास आहेत कुऱ्हाडी आणि झाडं कापणारी मशिनरी
मुकट्याने खाली उतर
आणि झाड खाली कर

## २४

तू ऐकत नाहीस तू ऐकणार नाहीस
तुझे ऑप्टीमिस्टीक कान वाट पाहतायत त्या वार्तेची
जी तुला कधीच मिळणार नाहीये
तू लढतोयस
जाहीरातीविरूध्द दादागिरीविरूध्द मोठ्या भांडवलाविरूध्द
वस्तूंच्या पर्वताविरूध्द
"हा माझ्या लढाईचा सर्वोत्कृष्ट तास आहे"
असं म्हणत तू प्रत्येक तासात सर्वोत्कृष्ट लढतोयस
शेवटी हाही धन्दा आहे/-धन-दा
गिऱ्हाईकं ज्यांना तू उधार देत होतास
पैसा येताच तुला नमस्कार करून
सुपरमार्केटमध्ये शिरतायत
दुकानदारी इतकी मायनॉरिटीत कधीच गेली नव्हती
इतकी मोठी लढाई
आणि इतकी कमी ताकद
"मला फक्त मुंबईतून भांडवल पाठव
बघ ह्या सुपरमार्केटलाही नाही लोळवल तर"
तुझ्या नातवाला तू दूध पाजायला विसरत नाहीयेस
तुला वाटतं तो तुझा फ्युचर योध्दा आहे
"हा तिळवे भांडारचा शेवट नाही राजा
हा तिळवे भांडारच्या सुरवातीचा शेवट आहे"
हाईट आहे मिस्टर शांताराम श्रीधर तिळवे हाईट आहे
सगळं शहर सुपरमार्केटसनं झाकून टाकलय
आणि तुम्ही सुईएवढ्या भोकातून
तुमचं दुकान पार करण्याची जिद्द बाळगताय

## २५

काही युध्दखोर लोक
जे शस्त्रांना लागलेलं रक्त पिऊनच
स्वत:च्या त्वचेत झोपी जाऊ शकतात
दारी येतायत
हल्ली गुन्हे करतानाही त्यांच डोकं ठिकाणावर असतं
मृत्यूला घाबरणारे युध्दात लढण्याआधीच मरतात
तू हे ओळखून आहेस
हे ते ओळखून आहेत
तरीही ते येतायत
तू घाबरत नाहीस तू उभाच आहेस पोलीसाला खेटून
भक्षक मरतोय रक्षक मरतोय
आणि भक्ष्य असलेला तू
दोघाच्यांमध्ये घुटमळून
स्वत:चा प्राण का वाचला
पोलीस असूनही आक्रमण का झालं
ह्याची कारणं शोधतोयस
कारणं सापडत नाही
फक्त दुकानावरून फिरवण्यासाठी आणलेला बुलडोझर
शांतपणे पाऊले टाकत
निघून चाललाय
त्यालाही कळत नाहीये
त्याला इथे कुणी आणला होता
आणि तो आता कुठे जाणार आहे?

## २६

तुझं आयुष्य टप्प्याटप्प्यानं कण्टाळवाणं होत चाललय
सिरीयलमधल्या ड्रॅमॅटीक शेवटानां सोकावलेले लोक
व्यक्त करतायत तुझ्याविषयी
मते आणि मतांतरे
जी ह्या बाजारात फुकटात मिळतात म्हणून प्रत्येकाजवळ भरपूर
आहेत
तो जुना काळ
जेव्हा जुनं ते सोनं होतं
तुझ्या डोळ्यातून उडत चाललाय
आता जे जन्मतय त्याची शिकार होतीये
आणि ज्यांची शिकार होत नाही ते ह्या खाटीकखान्यात विकले
जाणार नाहीत
म्हणून शोक करतायत
तू स्वत:ची शिकार होऊ देत नाहीयेस
म्हणूनच दरदिवशी तू एखाद्या ग्लॅडीयेटरसारखा कोसळतोयस
तुझ्या डोळ्यात लढाईचा अस्त दिसत नाहीये
आणि तुझे दुकान उपवासातही कनफ्युज उभंय
आमच्यासमवेत

२७

"कला जी शाश्वततेइतकी खोल होती काळजात
आता काळाइतकीच उथळ बनत खळखळाट करत चाललीये
सर्वत्र"
"लोक ज्या प्रेषितांना क्रूसीफाय करत होते छातीवर
फक्त टाईमपास व्हावा म्हणून करतायत रेकॉर्डीग
त्यांनी शोधलेल्या सत्याचे
सत्य जे कॅसेटमधून विकले जाते आहे
आणि कॅसेटपूरतेच टिकते आहे"
"मी आता इतका अनाथ होत चाललोय
की माझे श्वास मला झोडपतायत
आणि माझी त्वचा
त्वचेला त्वचा भिडवून
प्रेम वगळून
फक्त स्पर्श exchange करायला शिकतीये"
"हे एक असं कल्चर आहे माझ्या आसपास
जिथे लोक स्वत:चा फोटो काढून तो स्वत:लाच विकतायत"
तू बोलतोयस
आणि मला कळतय
हे युध्द आपण दोन्ही बाजूंनी हारत चाललोय

२८

कुठल्याच युध्दात विजय मिळत नाही
युध्दात विजय कमवावा लागतो
कमवावी लागते लायकी
हल्ली कालीमाता वाघावर बसून येत नाही
ती थेट लक्ष्मीवर बसून येते
येताना ती वाद्ये वाजवत नाही
जाहिराती वाजवते
आज लक्ष्मीपूजन आहे
आणि लक्ष्मी सुपरमार्केटमध्ये बसल्याने तुझा नाईलाज झालाय
मुलांना फटाके उडवायला देताना उत्साही असणारा तुझा हात
आता थरथर कापतोय
कदाचित हे फटाके शेवटचे असतील
फटाके वाजतायत आणि तुला बॉम्बब्लास्ट ऐकू येतायत

२९

आपण मेलोय
आणि गेली दोन वर्षे आपण त्याविषयी बोलत नाही आहोत
हे एक असं जगणं आहे
जे भर युध्दात स्वत:चा मृत्यू लपवू शकतं
प्रत्येक सकाळी
निदान आपण आज आत्महत्या करणार नाही आहोत
हे निश्चित करतो
आणि रात्री
जिवंत राहण्याची कारणे शोधतो

३०

प्रत्येक शांतता युध्दाची पूर्वतयारी असते
प्रत्येक दुकान महादुकानाची
कुठलंही युध्द शांततेचं राजकारण
कुठलंही मार्केट आधीच्या मार्केटाला
पुढे चालवत असतं
हिंसक होऊन
असं समजू नकोस की
तुझ्या दुकानात आयुष्यानं जो पॉज घेतला होता
तो मोक्षदायक होता
शक्यता अशीही आहे की त्याकाळात आपलं आयुष्य
बहीरं झालं होतं
ह्याक्षणी आपण हे जग दुरूस्त करू शकत नाही
ह्याहून मोठं फ्रस्टेशन काय असू शकतं
बरं आहे जगात ईश्वर एकच आहे
अनेक असते तर आपणाला परवडलेच नसते
दुकानदाराचं सर्वात मोठं शहाणपण
दुकान बन्द कधी करायचं
हे वेळेआधीच कळण्यात असतं
आपण हे युध्द कधी थांबवणार आहोत?

३१

सुपरमार्केट दांडगट पुरूषांपासून वाचण्यासाठी
बायकात लपून रहात नाही
ते त्यांच्याशी लढताना थेट बाईच होतं
आणि बाईशी लढताना तुझी नेहमीच पंचाईत होते
"प्रत्येक दुकान शेवटी उघडण्यासाठीच बन्द होतं"
तू स्वत:लाच दिलासा देतोयस
तू सत्य बोलतोयस
पण तुझी भाषा चुकीची आहे
एक दिवस सगळं खोटं ईश्वर एका घासात संपवेल
आणि मग खऱ्याचं राज्य सुरू होईल
ही तुझी आशा सुपरमार्केटच्या एका घासात संपत चाललीये
आणि त्याच्या घश्यात दुकान पडताना
तुझ्या सोबत ईश्वर नाहीये
ह्या साक्षात्काराने तू आधिकच उदास होत चाललायस
ह्या शतकाच्या शेवटी
तुझाही ईश्वर मरत चाललाय
फक्त त्याचा मृत्यू आपल्या दुकानाच्या कण्ठात निघावा
हे मला तुझ्या आणि त्याच्या
कुणाच्याच प्रतिष्ठेला साजेसं वाटत नाहीये

३२

ही लढाई खरी होती की लुटुपुटुची होती?
मी युध्दातला हा शेवटचा पण सर्वात दुःखदायक तापदायक प्रश्न
तुला विचारणार नाही
बुटाखालच्या धुळीत राहणाऱ्यांना डोक्यावरची हॅटसुध्दा जुलमी
वाटते
धुळीस मिळताना हे सत्य कळते आहे
हे काय कमी आहे?
तू चालतोयस आवाज न करता
तुझ्या पायाखाली काय जळतय मला माहित नाही
तुझा मार्ग भयानं भरून गेलाय
आकाश चमत्कार करू न शकलेल्या संतासारखं उदास दिसतय
रातांधळा अंधार चंन्द्राचं रताळं खात एकादशी सोडतोय
मित्र जो तुझ्या दुकानातला मध खात वाढला
तुझ्या दुकानाबाहेरचं मद्य पितोय
त्याला तुझं दुकान बन्द होतय की चालू राहतय

ह्याविषयी आता कसलचं सोयरसुतक उरलेलं नाहीये
हे युध्द
तुझ्या काळजाला विलक्षण एकाकी करून
सुपरमार्केटच्या डोक्याबरोबर पळून गेलयं
तू चालतोयस
तुझं दुःख तुझ्या पाठीमागे
काहीतरी पुटपुटतय
असं तुला वाटतय
ते दुःख नाही हे मला माहीत आहे
मी ओरडतोय :थांब
पण तुला माझं काहीही ऐकू येत नाहीये
तू मागं वळतोयस
तुझ्या मानेमागं फक्त सूरी आहे
जिला तुझा चेहरा कनफर्म करायचा होता
अखेरीला तू तुझ्या दुःखाकडूनही फसवला गेलायस
तू कापला जातोयस
तुझं डोकं गडगडत
दुकानासमोर येऊन पडतय
त्याचे होतायत शंभर तुकडे
आणि सूरी
दुकानाला कायमचं कुलूप लावून
ते खांद्यावर टाकून
सुपरमार्केटच्या दिशेनं चाललीये

## मॉलस्य प्रथम दिवसे-श्रीधर तिळवे

### एन्ट्री

मी पाऊल टाकताच आपोआप उघडतोय डोअर
हात लावायची नाही गरज टणक काचेला कोअर
तिच्यातून दिसतय मला अद्भूत जग
त्यांच्या रिफ्लेक्शन्सचे पारदर्शक अपारदर्शक अंधुक ढग
एक कॉस्मोपालिटीन सावली माझ्या देहाला होतीये प्राप्त
हात लावावा की नुस्तेच चालत जावे?
स्पर्श न करताच स्वर्गात पाऊल टाकावे?
हात लावायची गरज नाही ह्या टणक काचेला
तीळा तीळा दार उघड
म्हणून सांगण्यासाठी त्रास नाही माझ्या वाचेला
जीभेचा कम्फर्ट झोन
आणि आत अलिबाबाची सर्वांना खूली झालेली गुहा
मी पाऊल टाकताच उघडतीये आपोआप
कदम कदम माझ्या चालीचे पडतायत काप
हा हपापाचा माल गपापा नाही
हे गणपत वाण्याचे किराणा घराणे नाही
हा आहे वस्तूचां स्टेरीओफोनिक सिडक्टीव ऑर्केस्ट्रा
जो जपानच्या शेंडेफळापासून अमेरीकेच्या बिग ब्रदरपर्यंत
सारखाच वाजतो सगळ्यांच्यात
मी पाहतोय हवेत पसरलेली सिडक्शनची फूल गॅरन्टी
मला फुटतायत वस्तूंइतकेच डोळे
एक दरवान करतोय त्याला फीड केला गेलेला नमस्कार
माझे पाय सुपरफेशीयल होत इथल्या फायबरमध्ये लॉग होतायत
कस्टमरला ताठ ठेवून
कण्यासकट पाठ करुन घेणारा सॉफ्टवेअर
चौफेर
आणि माझ्या नकळत होत मी अनवेअर
चढतो आहे मॉलोबाचा डांगर
माझ्या प्रत्येक खेट्यासाठी होतीये घोषणा
कस्टमर इज द किंग राजे आहात राजे
वस्तू लोड करुन घेतलात की करु सगळे वजूद ताजे
मी राजासारखा चालतोय एअरकंडीशन्ड भरोश्यातून
आणि माझ्यातला माणूस मला न विचारताच माझ्या मेंदूतून
दरवाज्याच्या टणक काचेत डाऊनलोड होतोय
करीना कपूरने आंघोळ घातल्यासारखा माझा देह
थेट मुगले आझममधल्या पृथ्वीराज कपूरसारखा बादशाही घुसतोय
अस्वस्थ आणि हायफाय
माझ्या मुघल साम्राज्याला येतायत शिंका
आणि मी अलिबाबाच्या गुहेचा वास घेत
वस्तूंचा पाठलाग करत
आपोआप आत

### इन्टेरियर:प्रथम दर्शन

एक इन्स्टॉलेशन मांडलय स्पेसचं
एक ईश्वर सोडला तर सगळच इन्स्टाल केलं गेलंय बहुधा
एक सॉलीड बेस
मिल उध्वस्त करुन घातला गेलेला
एक घाला
कामगारांची आय घालून घातला गेलेला
फेस टू फेस फेस थ्रू फेस फेस इन फेस
एक फेस ऑफ समग्र
एक ग्लॅमरस अग्र माझ्या नाकात तार बनून
पेजथ्रीची फेज कुल्ले हलवतीये
भेजा फ्राय करणारी एकके शेज गांडीतून भुलवतीये
रुटलेस पेरणीची फ्रूटफूल क्रेज
मेकअपमधून झुलवताये
''या बळींनो या रे या
लवकर भरभर सारे या
मजा करा रे करा मजा
आज दिवस तुमचा समजा''
सगळं कसं टीपटॉप आहे
कम कम
भूल जाओ गम
कुदरत का हर मौसम
हमारे रॅंपरमे बन्द
गांधीकी नोट बजाओ
प्रभुके गुण गाओ
या क्रेडीट कार्ड महकाओ
प्रभुके गुण गाओ
जो कुछ है काऊन्टर पे छोडो
बॅग, थैली,दिल,दिमाग,कीडनी,लीवर
हम हर चीज करते हैं लॉक
आप अन्दर लडो
हम कपडे सँभालते हैं
हार जाओगे तो आपकी जेब खुली
जीत जीओगे तो अगली बार चढायेंगे सुली.

## आडवा मांडलेला जायंट व्हील: फूड बाजार

प्लीज,
आप अपना सर्च इंजिन ऑन रखे
कृपया
आप अपना रिसर्च इंजीन ऑफ करे
मी टेक ऑफ घेत आत
दूसरा टेक न घेता
ट्रॉल्या फिरतायत - टक टका टक टका टक टक टका टक
माणसे फिरतायत - चक चका चक चका चक चक चका चक
त्वचा फिरतायत - लक लका लक लका लक लक लका लक
मेकप फिरतायत - झक झका झक झका झक झक झका झक
शॉपिंग इज ॲन एक्सपियरन्स बेबी
ॲन्ड ॲन एक्सपियरन्स इज द शॉपींग ऑफ अवर सेन्सेस
म्हणून तर हा सेन्सेक्स
इच फिनॉमिना इज शॉपींग फिनॉमिना
शॉकप्रुफ होण्यासाठी शॉप
शोकमुक्त होण्यासाठी शॉप
SHOP - LIGHTENMENT
मोबाईल वेडे आणि बाईलवेडे
हँगर्स आणि हंगर्स
शर्ट आणि स्कर्ट
पामटॉप्स आणि टीपटॉप्स
आयडेंयंटी कार्ड आणि आयडेंयटी क्राईसेस
ब्रॅण्डेयंटी आणि ब्रॅण्डेयटी क्राईसेस
अंगावर येणारा एकेक मेसेज डिस्टॉर्ट करत माझा डोळा सरकतोय
एकेक कोड डिकोड करत माझी कॉन्टॅक्ट लेन्स तडकतीये
ही वस्तूंची जत्रा ही वास्तूंची मौजमजा
हा साबणांचा सोप ऑपेरा ही शाम्पूची बेरीजवजा
ही नॅपकीन्सची महाआरती ही ताज्या भाजीची आर्टिफीशीअल प्रेअर
हा ब्रॅण्डेड खाऊचा खडा नमाज हा फॅटसचा बैठा कहर
ही कॅलरीफ्रीची फॅन्टसी ही तीन खरीदल्यास एक फ्रीची दुशी
मी एकेका वस्तूतून सरपास होतोय
एकेक जाहिरात पायातून उफाळतीये
ढुंगणात गरगरतीये आणि मेंदूत पादतीये
संपूर्ण सुगंधी पाद अंगभर
लिपस्टीकमध्ये वितळतायत लिसा रे चे ओठ
शेव लोशनमध्ये फेसाळतीये मिलिंद सोमणची इमोशन
पेप्सीच्या टोटल बॉटलमध्ये शाहारुख करतोय तहानेची खटिया खडी
कॅडबरीजमधून चालत जातीये प्रिती झिंटाच्या निगरळ खळीची खेळी बडबडी
इंद्रीये होतायत जाहिरातीतून ताठ
पैसे चाचपतायत आकाराचा माठ
प्रत्येक ब्रॅण्ड माझा वाजवतोय बॅण्ड
मी नजरबन्दी तोडताना जायबन्दी होतोय
प्रत्येक वस्तू मला ओवाळतीये
आणि मी आख्ख्या ग्लोबल व्हिजनने ओवाळून टाकल्यासारखा
एकेका स्टॉलवरुन उचलला जातोय
माझ्या ट्रॉलीत फक्त ढीग
आणि मानसिक सुखात्मेचा एक ढग शिगोशिग
माझी जीभ कापूनच अंथरली जातीये स्लाईस स्लाईस संपूर्ण फूड बाजारभर
आणि माझे दात पहारा उधळण्याऐवजी
जाहिरातीतल्या किटाणूंच्या प्रेमात पडलेत
मला काहीच खरीदायचे नव्हते
मी स्वत:ला विकून वस्तूत परततोय
जादू हर नजर खूशबू हर बदन
तू हाँ कर या ना कर तू है मेरी किरण

## चिंतन

There is nothing outside the market
There is nothing outside the text
Soevery text is 'मार'ket.

## चिंतनामुळे लघवी लागून टॉयलेटला गेल्यावर

पता नही मगर शायद
इस मॉलके हाथोंकाही है ये जादू बडा
इतना घूमकरभी
मेरा लंड खडा का खडा

## फर्स्ट फ्लोरला जाण्याचा मोबाईल जीना

तेरे बिना क्या चढना ओ जीना
तेरे बिना मेरे मनका पार्टीशन ओ जीना
माझे जीणे जीवनगाणे तुमचे हे जीने
माझे गाणे
पायऱ्या फुगतायत नाहीश्या होतायत
साला आपल्या पायाचंही असचं असतं तरं
एसीत राखत तजेलदार त्वचा
आणि बसल्यासारखी वाचा
न घासता टाचा
मी चढतोय
पाऊल न हलवता
बोटेही न डुलवता
कांबळे सरकतोय कुलकर्णी सरकतोय श्रॉफ सरकतीये सोळंकी सरकतायत
टोपीवाला सरकतोय सेंटवाली सरकतीये क्लीवेजवाली सरकतीये पैलवान सरकतोय
कळत नाही
माणसे पायऱ्याना गच्च पकडून आहेत की
पायऱ्याच माणसांपासून पळून जाऊन गुप्त होतायत
मी सरकतोय तो सरकतोय
आडनाव ओलांडून सगळे सरकतायत
लेगवर्क न करता
फूटवर्क न मांडता
हे मॅटेलीक कास्मो जीने
भेदभाव करत नाहीत
त्याना फुलेवाद कळत नाही की सावरकरवाद
पैश्यांचा नाद वाजवा
आणि आख्खा मॉल भटकभवान्यांसारखा गाजवा
मी सरकतोय
माझे आळशी पाय आपोआप सरकताना हरखून गेलेत
मी सरकतोय
माझे पोट मी आता आणखी आळशी होणारा म्हणून टरकून गेलंय
जीने थांबत नाहीयेत
जीणेही थांबत नाहीये
पायऱ्यांपाशी जमा होणारे नवीन नवीन पाय
पाया हरवतायत

पण चढणे थांबवत नाहीयेत

## फर्स्ट फ्लोर

आता सोनीचीकुडी घेऊ की व्हिडोओकॉनचीजगउडी की शार्प हटेला
आता सॅमसंगचा संग घेऊ की नोकीयाची काया की मोटोरोला सटेला
आता टायटानीक झोल करु की पॅनोरमा पॅन करु की अजण्ठाची घण्टाढोल
आता सागरीकाचा साग काढू की टीसीरीजचा बोल काढू की यशराजची ओल
मला निवडीचं स्वातंत्र्य केलय बहाल
आणि मी आय हॅव टू चूज मध्ये बेहाल
प्रत्येक मॅच फिक्स आहे
आणि ह्या ग्लोबल फिक्सिंगमध्ये
खेळाडू निवडण्याचं जबरदस्तीचं स्वातंत्र्य मला आहे
यही है राईट चॉईस बेबी
नही वही है राईट चॉईस बेबी
नही नही नही
वही है राईट चॉईस बेबी
विपूल स्वातंत्र्याचा ऐटबाज गोंधळ
हे घ्या - हे घ्या आणि हेही घ्या
प्रत्येक चीज सेल्सगर्लइतकी ताजी आणि टवटवीत
प्रत्येक माल गबरु ओर खूश्बूदार
इत्र मलो तो इस मॉलमे अभी मलो
पता नही कल खूश्बू यही रहे या ना रहे
माझा पसिना गायब आणि सीना ताठ
हर हसिना का घाटदार घाट
मैं घाट घाट का पानी पी रहा हूँ
ओंर मुझे यहाँ की हर चीजकी उमर लग रही है
शायद मेरी एक्सपायरी डेट कभी न आये
मी वस्तूमैथुन्यात चोखतोय लेबल्सचे स्तन
माझं विंडोशॉपींग आत्ता घरात कनवर्ट होतय
मी कॅटवॉक करतोय
आणि प्रत्येक स्टॉल माऊस असल्याचा बहाणा करत
मला उरात खेचतोय
कुठून कुठून फिरुन आलेली मेटल टॉईज
कुठून कुठून सेटल झालेली देवांची रास
वॉचमन न ठेवता मी खरेदी करतोय वॉच
लव न करताच मी अवलेबेल होतोय लवेबलला
घरी बायको नाही तरी अंडरवेअर रुपाची
टिव्हीला ॲडीक्ट आणि त्यावर सजावट मात्र लाफींग बुध्दाची

## क्लोज सर्कीट कॅमेरे

दुकानच इतके मोठे करा की गरिबाला धाक बसावा
तरीही गरीब आत आला तर अवाढव्य हायफायेत त्याचा कुल्ला फाटावा
तरीही एकसंध कुल्ला आत आलाच तर डाक्यावर सर्वत्र क्लोज सर्कीट कॅमेरा ठेवावा
माझ्या डोक्यावर रोखलेला वामनाचा क्लोजसर्कीट पाय
आणि मी बळी जाऊनही गरीब गाय
अंगावर येणारं स्वातंत्र्य
आणि त्याची चोरी होऊ नये म्हणून कॅमेरे
माझ्या केशरचना वास्तवाचा विस्तव ओलांडतायत
आणि माझ्या केशरचना मेंदू आता कॅमेऱ्याच्या भयाने
कुठले ग्लोबल टक्कल आपल्याकडे सरकवेल ह्या चिंतेने
शाम्पू शोधतायत
माझ्या आतड्यात भूक करतीये भूकभूकाट
आणि मी खरेदी केलेल्या शाम्पूत केसाकेसामधला शुकशुकाट ऐकतोय

## सेकंड फ्लोर

खा खा खा
हे खा ते खा आणि तेही खा
खाई तोच खवखवे
प्या प्या प्या
हे प्या ते प्या आणि तेही प्या
पिई त्याला पवपवे
भाज्या खा प्राणी खा माणसे खा
आणि ढेकर मात्र व्हेजिटरीयन द्या
व्हेरिएशन साधत
आखीर आयडेयन्टीभी कुछ चीज होती है यार

## देव

देवा तुझे किती
सुन्दर हे मॉल
सुन्दर हे मॉल
सदा देती सदा देती सुंदर लायटीगं
सुन्दर प्रकाश।
सगळे झकास
मॉल देती मॉल देती
ना लोड शेडींग
ना लोड ब्लीडींग
अद्‌भूत फिल्डींग
सदा लावती सदा लावती
ही प्रकाशाची सदावर्ते
सदा चालोत
देवा
ह्या मॉलमध्ये तुझीही
देवळे उभी राहोत
हाच
तुझ्या डोक्यावर पाय देणाऱ्या
ह्या भक्ताचा आशिर्वाद

## थर्डफ्लोर मल्टीप्लेक्स

देवावर विश्वास नसेल
तर अभिनयावर विश्वास ठेवा
म्हणूनच हा मल्टीप्लेक्स पडद्याचा ठेवा
ग्राहकहो तुमच्यासाठी
श्रमिकहो ह्या इथे विश्रांति
शक्यतो तात्पूरती
नाहीतर कायमची
काहीतरी दफन केल्याचा हा फील कसला मॅकबेथ
माझ्या वस्तूवर हे रक्ताचे डाग इतकी लेबल्स लावूनही
का पून्हा पून्हा उमटतायत
ब्रॅण्ड खाऊन खाऊन फाटेल माझे पोट
ब्रॅण्ड पिऊन पिऊन फुटतील माझे ओठ
ब्रॅण्ड पाहून पाहून जळले माझा डोळा
ब्रॅण्ड ऐकून ऐकून फटफटेल कानाचा गोळा
ही शक्यतांची आंधळी टनेल्स माझ्यापुढून हटवा

मला मिटू दे माझ्याच पंखात
हा चक्रव्यूहात चकरी फिरवत
गरगरतोय माझा भवरा
हा चस्का लावणारा चस्कर
हा आत्माच स्मगल करणारा तस्कर
मी विसरु पाहतोय
मी प्रचंड थकून तिसऱ्या मजल्यावर
एन्टरटेनमेन्टचा मस्का लावणारा प्रचंड 'आय' फेल टॉवर उभा
मला पाडण्यासाठी
आणि मी स्वखुशीनं मारतोय माझ्या आत्महत्येत दडी
ह्या आत्म्याच्या नानाची टांग मार उडी
मला ठरवून नाहीशी करतीये ही सेलेबल युक्ती
पुन्हा खरेदी करण्याची ताकद पुरवणारा रिचार्जर होतोय ऑन
मी ताठवतोय मांड्या खोलून माझी ग्राफिटी
आणि समोरचा पडदा मला जंक ऑरगॅझम देत
नाहीशी करतोय माझी ग्रॅव्हीटी
स्वत:मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही म्हणतात
आणि मी सुखरुप आहे सुखरुप आहे सुखरुप आहे
ह्या अलिशान स्वर्गात

## Exit

मरताना श्रीधर बादशहासारखा म्हणाला
अगर इस धरतीपे कही जन्नत है
तो वो मॉलमें है मॉलमे है मॉलमे है
सगळ्या वस्तूत त्याचं प्रेत थोडं थोडं सापडतय
आणि मी मॉलच्या बाहेर
त्याची निर्वस्तूवादी चिमूट उचलून
कविता लिहीतोय
जी आतमध्ये जाऊनही
अंगठ्यासकट शाबूत आहे

## मॉलमधला शंभरावा दिवस

### १

इतिहासापासून कोणी इतिहास शिकत नाही
कवितेपासून कोणी कविता
ईश्वरापासून कोणी शिकत नाही ईश्वर
संताच्यांपासून संत
मॉलोबा
तू काय मी काय
आपण आहोत फक्त गोळेकरी - कलेक्टर्स
आयुष्याची गोळाबेरीज करत जाणारे
जनुकांनी गोळा केले म्हणून मी जन्मलो
आणि शब्दांनी गोळा केले म्हणून झालो
कवी

### २

मॉलोबा,
मी गोळा करणारा भक्त असेन
तर तू गोळा करणारा देव आहेस
आपण दोघेही शून्यातून काहीच निर्माण नाही करु शकत
आणि ही खासियत
आपल्याला परमेश्वरपासून वेगळं करते

### ३

प्रत्येकालाच गोळा करण्याची ही तहान का?

ईश्वराने प्रथम मॉल बनवला
मग ॲडम
मग ईव्ह
मॉल मग म्हणाला
"फळ खा फळ खा"
ईश्वराने मोहात पडून फळ खाल्ले
आणि ॲडम व ईव्हला
पुढल्या ऑर्डरसाठी मॉलमध्ये धाडले
तेव्हापासून तो पहिला मॉल
'मॉलोबा'
ह्या नावाने ओळखला जाऊ लागला
आणि स्वत:चे क्लोन वाढवत
सर्वत्र फिरु लागला

प्रत्येकालाच गोळा करण्याची तहान का
मी प्रश्न विचारतोय
आणि लोक शब्द गोळा करत फिक्शन ऐकवत
तहानेत शिरतायत

### ४

वर्षानुवर्षे तू तुझ्या अस्तित्वावर काम केलयस
तू एक असा देव आहेस
ज्याने रविवारीही विश्रांति घेतली नाही
तुझ्या कामाची वेळ गिळत चाललीये प्रत्येक लोकल घड्याळ
आणि तू लोकांना फक्त खरेदीचा ऑप्शन देत
सर्वत्र अवतरतोयस
एक दिवस तुझ्या कामाचा संपूर्ण प्रकाश
पृथ्वीवर पडेल
आणि संपूर्ण पृथ्वी मॉलसारखी दिसू लागेल

### ५

जागा खूप आहेत
पण माणसाइतकी व्यापक जागा कुठेच नाही
प्रत्येक माणसात मॉल पार्क करण्याची तुझी स्कीम
माणसाच्या शेवटाची योग्य सुरवात

### ६

भक्तानां अप्पर हँड देण्याचा बहाणा तुला चांगला जमतो मॉलोबा
तू आहेस खलिफा
आणि तुझे सगळे मॉल मला
खलिफा मानणाऱ्या मुघल साम्राज्याचे वंशज वाटतात
मला सांग
मॉल आणि ताजमहाल ह्यांच्यात काय फरक आहे
शहाजहाननं बांधणाऱ्याचे हात कापले होते
आणि तू बांधणाऱ्यांनाच हातासकट खरेदी केलं होतस

### ७

मॉलोबा
इतर देवांसारखं तुला वहान नाही लागत
तू आपला इंटरनेटवर बसून कुठही
जगातला प्रत्येक उंदीर तू पोखरत चाललायस

आणि प्रत्येक डोंगर भाड्याने घेण्यासाठी तू तत्पराकूळ
ढीगाऱ्यातून ढग निर्माण करणारी तुझी ढब
नैधांझऱ्यांना बॉटलबन्द करणारी तुझी मॅनेजमेन्ट
मॉलोबा
वातावरणाला पडत चाललेत तुझ्यामुळं भोकं
आणि ती तू बुजवण्याऐवजी
पर्यावरणवाद्यांनांचे बूच मारुन
नाक्यानाक्यावर मोकळा

८

माझ्या लवस्टोरीतला तू खराखुरा व्हिलन
"माझ्या त्वचेला ॲटरॅक्ट करणारा मॅग्नेट कोणी शोधेल काय?
तिचा सिडक्टीव सवाल आणि मी बेहाल
मी लाजाळू नव्हतो फक्त माझ्या स्पर्शाची पानं कॉस्मॉपॉलीटन
टचनं क्षणभर बुजत
"तुम्ही पुरुष फारसे बुध्दीमान नाही आहात
म्हणूनच तुमची मान मी कधीही मुरगाळू शकते आहे हिम्मत?"
मी तिच्या आव्हानात माझी गावरान मान घेऊन शिरलो
सभ्यतेने फाशी देणारा तिचा कॉस्मो समाज माझ्या आसपास होता
माझ्या कवितेचे कुरळे केस सरळ करु शकेल अशी जाहिरात
जन्मायचीये
हा माझा विश्वास
ती केस सरळ करणाऱ्या जाहिरातींचा कणा असल्यासारखी ताठ
आम्ही लढलो आणि प्रेमात पडलो
पूर्वी एकेकाळी मी प्रेमाशी परिचित होतो
मग मी अतिपरिचयाने त्याची अवज्ञा केली
ती चूक मला आता करायची नव्हती
मी बरोबरलो मी बरोबरलो आणि मग तू आलास इंटरनेटमधून
एखाद्या राजबिंड्या ग्रीक पुरुषासारखा
माझी गावरान शैली तुझ्याशी अपरिचित होती
आणि ती संधी साधून तू तिच्या डोळ्यात तुझ्या सिडक्शनचं फूल
पाडलंस
ती किंचाळली
"मॉल इज माय लव माय फर्स्ट लव माय सेकंड लव
अमेरिकेत जाईन आणि सगळे मॉल पाहिन"
ज्याला डोळे दिलेत त्याला काळोखात मरायचेच असते
हा निसर्ग आहे आणि त्याचा शेवटचा सर्ग मृत्यू आहे
तिला तुझा लव्हेरिया झाला
आणि तुला प्रत्यक्ष न पाहताही
तिच्या माझ्या नात्याचा प्रकाश
तुझ्यात मृत्यू पावला
बरोबर एक वर्षांनी तू बॉम्बे सेन्ट्रलला प्रत्यक्ष अवतरलास मॉलोबा
त्याचा स्पॉटच्या काठी
जिथे आम्ही एकमेकाशी प्रथम लढलो होतो

९

तू अवतरलोयस आणि तुझ्या प्रकाशात
सेक्सुअल इन्स्टॉलेशन्स लावणारे फोदे लोक
पैसा वसूल करणारे घोदे लोक
गोदेला गोदमध्ये घेऊन हिंडणारे गोदे लोक
गॉडला गाडीत घेऊन गाडणारे खोदे लोक
सभ्य होतायत
मी सभ्य आहे तू सभ्य आहेस
आपण सगळे सभ्य आहोत
जसे सगळे सभ्य असायला हवेत
सगळे सभ्य गातायत तुझी सभ्य आरती

"जयदेव जयदेव जयजय मॉलोबा
सारेच बण्डोबा व्हावेत थंडोबा
अर्धकशास हवा युनिफॉर्म द्यावा
शुध्दीत असणाऱ्यास क्लोरोफॉर्म द्यावा
मॉडीफीकेशनला मॉडेल मिळावे
केल्या केल्या खून रक्त वाळावे
कोण्डी होऊन दारी यावेत कोण्डिबा
सारेच बण्डोबा व्हावेत थंडोबा"
जय जय मॉलविर समर्थ !
यळकोट यळकोट जय मॉल्हार !
यळकोट यळकोट जय मॉल्हार !
सगळे यळकोट आता तुझे कोट घालून हिंडतायत
आणि छातीचा कोट करणारे विकतायत
तुझा टाय

१०

"शेजाऱ्यावर प्रेम करा
कारण तो तुम्हाला नवीन आलेले ब्रॅण्ड सांगेल"
"तुमचं पाप तुम्हाला शोधत येईल
जोपर्यंत ते काळजात आहे
एकदा त्यातून मिळालेल्या लाभाने काही खरेदी केलत
की खरेदी केलेल्या वस्तूत ट्रान्सफॉर्म होऊन ते नाहीसे होईल"
"प्रत्येक दिवशी भाकरी देईल हात्त समाधान मान
मात्र रात्री जिभा पिझ्झात नाचल्या पाहिजेत"
"A call from Mall
can create Heaven for your pal"
तू ईश्वराला ओझा देणारा ड्रायव्हर म्हणून ठेवलायस
आणि ईश्वराला वाटतय की तो ह्या गाडीचा ओवनर आहे

११

"मी आणि ईश्वर
मी आणि सूर्य
ह्यांच्या दरम्यान तू आहेस
तू मनुष्य असशील तर मी तुझ्या खांद्याला खांदा भिडवेन
तू पशू असशील तर मी तुझ्या विरोधात जाईन
तूर्तास तू कोण आहेस हे मला ठरवता येत नाहीये
मात्र यदाकदाचित् तू मेलास तर तुझे शव छान दिसेल"
मी बोलतोय पण तुझे लक्ष नाहीये
तुझा भूतकाळ तुला आठवत नाहीये
कदाचित् तुला भूतकाळच नाहीये
तुझा वर्तमान मात्र पैश्याच्या भाषेत बोलतोय
तू माझ्या तारुण्याचा उन्माद, प्रौढपणाचा संघर्ष आणि
म्हातारपणाचा पश्चाताप आहेस
माझं ऱ्हदय कमर्शिअल जागी नाही
आणि ह्याचा मला अभिमान आहे
तुझे स्वर्ग खुले झाले की रॉक ऐकत मी अमृत पिईन
गाईन मृताच्या दुनियेत आत्म्याच्या अमरत्वाचे गाणे
मला माझा पैसा आजमावयाचा आहे
म्हणूनच तो मी खर्च करण्यासाठी तुझ्या दिशेने निघालो आहे.

## १२

तुझ्या डोळ्याचं ॲपल
आता कम्प्युटर कंपनी खोलून बसलय
तुझे भक्त तिच्या सावलीत
गेम्सच्या माश्या मारत
तुझ्या दिशेने येतायत
कुणी मारुतीमधून येतय
कुणी होण्डामधून
तुझ्याकडे सगळ्यासाठी योग्य तेवढा पार्किंग झोन आहे
जो कुठल्याच टूफोरव्हिलरला घुसमटू देत नाही
सगळ्याना कूल करणार तुझं उभं कूळ
सगळ्याना मूल करणार तुझं आडवं मूळ
तुझं प्रत्येक खेळणं करतय मूलावरती रॅगिंग
आणि मूलं त्या रॅगीगं गार्डनवर हॅगींग गार्डनइतकीच खूष आहेत
कुठही साध खुट्ट झालं तरी
जागेचा कानोसा घ्यायला येणारा काळ
तू खुंटीला टांगलायस
आणि त्याला पहात मी एका अशा हवेतून चाललोय
जिथे स्वत:चे श्वास स्वत:पुरतेच चालतात.

## १३

हे समोर लोक की सपाट गर्दी
कळत नाही
ही गाड्याची भीड
स्वत:ला चालवत येतीये की वहात येतीये
कळत नाही
ही ग्लोबलाझेशनची कोवळी कावळी मुलं की
जागतिकीकरणाच्या प्रौढ शिक्षण योजनेत दाखलं झालेले म्हातारचळ?
तुझ्या ह्या शाळेत पास कोण? नापास कोण?
ही स्मार्ट कार्डस, क्रेडीट कार्डस, गोल्ड कार्डस, अमूकढमूक कार्डस
तुझी मार्कलीस्ट की हिटलीस्ट?
वादळ येण्यापूर्वी धूळ उडते
वादळ आल्यावर छप्पर
वादळ निघून गेल्यानंतर माणूस
ह्या टू व्हिलर्स फोर व्हिलर्स येताना काय आणतात?
त्या आल्यानंतर काय उडते
आणि.काय उडते त्या गेल्यानंतर
पाठलाग!एक अजीबोगरीब खेळ! शिकारीचा सिग्नेचर नमूना!
गाड्या वस्तूचा पाठलाग करण्यासाठी
एकमेकांच्या ब्रॅण्डची शिकार करत
तुझ्यात दाखल होतायत
चितेत जळताना चरित्र आठवणाऱ्या आत्म्यासारखे
तुझे पार्किंग झोन गाड्यांच्या चरित्रात तळपतायत
आणि त्याच्या काचा पूसतायत
शब्द दगडासारखे भिरकावणारे माझे शाळासोबती
त्या खिन्न हातांनी
ज्यांना इतरांसारखी दहा बोटे आहेत
आणि दोन तळहात
एक अमानुषता वाहतीये ह्या सामाजिक फरकात
आणि तू
तुझ्या ग्राहकाच्या गाड्या चकाचक पूसल्या जातायत
ह्यातच खूष आहेस

## १४

विक्री करणाऱ्या लोकांच्या शहाणपणाची जातकुळी काय मॉलोबा
"मॅडम, ह्या वर्षी पन्नास हजार सोप बॉक्स खपले
त्यात लोकल फक्त शंभर होते"
एक सेल्समन रिपोर्ट देतोय
दुसरा चर्चची बेल ग्राहकाला वाजवून दाखवतोय
तिसरा त्याच्या शेजारी एक नवा आलेला ब्रॅण्ड एक्सपोज करतोय
चौथा कर्मठपणा हा त्याचा कसा मठ आणि जे सैल ते त्याचे कसे
चारित्र्य आहे पटवतोय
पाचवा विचार करता करता विदूषकासारखा दिसतोय
सहावा कृती करता करता हुतात्मा होतोय
माझ्या डोळ्यात गळतायत
प्रत्येकाच्या नकली त्वचा
आणि उघडे पडत चाललेले देह
प्रत्येकजण विकतोय
आत्ताच्या अमृतकुंभात भरुन भविष्यातील विष
सिडक्शनच्या डोक्यातून उगवतायत सिडक्शनचेच केस
मॉल मॉल आहे
कारण मॉल मॉल आहेत
माझी इंद्रीये तुझ्या ह्या मॉलशाहीत विरघळताना कमालीचा दुखतायत
तु तुझ्या प्रत्येक सेल्समनच्या घरात आहेस दारात आहेस
आणि तुझ्या साखळदंडाला बांधलेली त्यांची काळीजं
समोरच्याला न्यूनगंड देत
अहंगंड वाजतायत

## १५

पुजाऱ्याला पुरतो दगड मला भाषा
"शेवटी मॉल म्हणजे काय रे भाऊ?"
"घण्टा!"
बालपणी तुझ्यात खरेदी करत करत जो तरुण झाला
त्याला म्हातारपणी फक्त तूच सत्य वाटत राहणार
तुझं ब्रम्हचार्यशी लग्न लागलय
म्हणूनच तू कुठलाही ब्रॅण्ड ठेवू शकतोस
चांगुलपणाची चैन परवडत नाही म्हणून
परवडणारा वाईटपणा घेऊन येतोय प्रत्येकजण तुझ्या दारात
बुध्दीमत्तेच्या वाळवंटात हुशारीची हिरवळ
तू पूर्वेतून उगवत नाहीस घड्याळातून उगवतोस घड्याळातून मावळतोस
माझा चेहरा तुझ्या फॅक्टरीत तयार झालेला नाही
म्हणूनच माझ्या मेकअपचे मालकी हक्क वळकावण्यासाठी
तुझे हात आतूर
तू असा भूका आहेस
जो जाहिरातीतून माझे मुके घेतोय
Numbers are better than few honest brands
तुझ्या ह्या नंबरी तत्वज्ञानाचं नाणं
आजीबोगरीब रितीनं टाकलं जातय माझ्यासमोर
छापा पडला तर तू जिंकतोयस
काटा पडला तर मी हरतोय

## १६

तुझ्या वस्तूची गर्दी जाहीरातीतून राज्य करतीये
आणि तिच्या त्वचेवर माझ्या कवितेची गोठलेली शाई आहे
एक सॅम्पल टिव्ही गातोय कधीचा

मूळ आवाज नाहीसा करून एक रिमिक्स गाणं
ज्या जाहिरातींचे हात पडतायत थेट निरागस डोळ्यात
त्या जाहिराती बालकांच्यात अमर होतायत
शतकात प्रवेश करण्यापूर्वीच सामान्य माणसाचा जो मणका
तुझ्या दरवाज्यात गळून पडला
तो मणका कवितेचा होता
एक लहान मुलगा मला विचारतोय
"अंकल, जो पर्यंत मी बोलत नाही
तो पर्यंत मला माझे विचार कसे कळणार?"
मी काहीच बोलत नाही कारण त्याला मराठी येत नाही
ज्यांना जागतिक संगमरवरात कोरायचे असते स्वत:चे शंव
ते इंग्रजीत गातायत त्यांचे जीवनगाणे
आणि आम्ही मराठी कवी
ज्यांच्या भावना गोठून गेलेत
आमच्या काळजातल्या समुद्रासकट
तुझ्या बर्फाला थेट जाऊन मिळतोय

## १७

ज्याला स्वत:ची बोटं चाखल्याशिवाय स्वत:च्या त्वचेतील मध कनफर्म करता येत नाही
असा तू गोडवा
ज्याला सर्वत्र गुड्या उभ्या केल्याशिवाय नवं वर्ष लागत नाही
असा तू पाडवा
तू होतो आहेस माझ्या अस्तित्वाचे एक व्यभिचारी मिश्रण
जे चांदण्याचा क्षण वाजवतानाही अमावास्येचा आवाज करतं
लढणारा संपल्याने युद्ध संपलय माझ्या आत
आणि तू तसं डिक्लेअरही केल्यानं
मी झालोय ह्या जिंकलेल्या विश्वाचा राजा
तुझी प्रत्येक वस्तू पाडतीये
माझ्या नावानं तुझ्या राजवटीचं नाणं
आणि ते खरं की खोट हेही मला ठरवता येत नाहीये

## १८

राजा असूनही राज्य करता न येणाऱ्या माणसासारखा
मी जेव्हा माझ्या दु:खाची बोटे मोजून शांत होतो
तेव्हा एक व्यापक तयारी सुरु होते
तुझ्या बुटात कोसळण्याची
जे शेतात पीका सारखे न सळसळताच ग्लोवज घालून चालतात आयुष्यात
त्यांच्यासाठीच असतो तुझा हा हायपरसिटी बासमती राईस
जो उडत असतो माझ्या आसपास
त्याचा निपुण सुगंध घेऊन
कोणीच नसतो स्वत:च्या खिश्यात राजा
तरीही खिश्यात पैसा असणारे तू त्याच्या खिश्यात असल्यासारखे
बोलत राहतात सूर्य तोण्ड फुटून तोण्डावर आपटेपर्यंत
आणि तुझ्या बुटात कोसळण्याची
जे शेतात पीकसारखे न सळसळताच ग्लोवज घालून चालतात आयुष्यात
त्यांच्यासाठीच असतो तुझा हा हायपरसिटी बासमती राईस
जो उडत असतो माझ्या आसपास
त्याचा निपूण सुगंध घेऊन
कोणीच नसतो स्वत:च्या खिश्याचा राजा
तरीही खिश्यात पैसे असाणरे तू त्याच्या खिश्यात असल्यासारखे
बोलत राहतात सूर्य तोण्ड फुटून तोण्डावर आपटेपर्यंत
आणि तुझ्या प्रेमळ फसवणुकीला मिठी मारुन
हातातील क्रेडीट कार्डची राख तुझ्यात उडवत
नाचत जातात स्वत:च्या हातावर
माणूस म्हणून बोटातून उडून चाललेला त्याचा मृत्यू
जो दिवसेंदिवस तू अधिकाधिक प्रकाशमान करत चाललायस

## १९

माणसे त्यांचा रविवार घेऊन
तुझ्या मॉलमध्ये येतायत मॉलोबा
त्यांच्या घरातली मांजरं गळ्यात घण्टी बांधून इथ टाईमपास करण्यासाठी येतायत
आणि उंदरं ही चालती बोलती बया चर्च आहे की चर्चा म्हणून कनफ्यूज होतायत
प्रत्येक खरेदी शेवटी युध्दापर्यंत पोहचवणारं हे शतक
ईश्वरावर जमलेली सहा दिवसांची धूळ साफ करत प्रत्येकाचा रविवार
चालत येतोय तुझ्या दिशेनं त्यांच्या आत्मा चमकवत
गांधीजीची तिन्ही माकडं मद्य पिऊन मरण पावलीयेत प्रत्येक नोटेत
आणि तरीही त्यांची प्रत्येक नोट माकडचाळ्यात फडफडतीये
लक्षावधी जीभा त्याच्या
तुझ्या टेस्टस त्यांच्यावरील टेस्टसेल्ससाठी अपूऱ्या पडतायत
लग्न ठरल्यानंतर लग्नमंडपात
नवऱ्याच्या चारित्र्याबद्दल चौकशी करणाऱ्या बाईसारख्या
सर्व टेस्टसेल्स रॅपरसमोर उभ्या
आणि रॅपर्स आतील वस्तूंना दैवी करत
कामनृत्यात मग्न
एक मोहिनीनृत्य करणारी प्रकाशयोजना सर्वत्र फिरतीये
आणि रविवार केवळ डोळ्यांनी रॅपर्स फाडत
छे दिनकी चाँदनी पाहतोय

## २०

मॉलोबा
शॉपींग म्हणजे
कुठली वस्तू मेलीये आणि कुठली जिवंतय हे अंत:प्रेरणेने ठरवणे
आणि जी जिवंत आहे ती खिश्यात पाडून घेणे
आमचे खिशे खुळखुळतायत
आणि सुंदर पाय व मजबूत पैसे घेऊन आम्ही तुझ्या काळजात उतरतोय
आम्हाला माहीत आहे
आमच्या नाशाची बीजं
आम्ही तुझ्यात खालेल्या फळात आहेत
कुठल्याही कमोडीटीची खोली दिसू नये अशी तू केलेली विस्तृत सोय
आणि त्या सोयीखाली आमची चाललेली खरेदी
प्रत्येकजण कमवतोय
वस्तू खिश्याच्या आवाक्यात आल्यानंतर आनंदाचा नाच
किंवा वस्तू आपल्या खरेदीशक्तीच्या बाहेर गेल्यावर दु:खी संयम
आयुष्याच्या ह्या दोन्ही बाजूंना सलग पाहणारे गंभीर डोळे
गायब होतायत
तुझ्याजवळ रामायणाची गंभीरता नाही
आणि आमच्यातही राम नाही
तरीही सगळी द्राक्षं जी एकेकाळी आंबट होती
तुझ्या कृपेने
शबरीच्या बोरासारखी आमच्या तोण्डात पडतायत
आणि
प्रत्येकजण दुसऱ्याला सांगतो आहे
तुझं पॉप महाकाव्य
शबरीच्या आवाजात

२१

माझे डोळे झोकांड्या खातात जेव्हा तुझ्या डोळ्यात
तेव्हा माझे शरीर ताठ असते बॉटलइतके
हे विलक्षण आहे की मी जे तुझ्यात डोंगराएवढं खातो
ते माझ्यात तिळाएवढं होतं
मि.तिळवे हे माझ नाव सार्थ करतोस तू
माझ्या त्वचेचा फुटलेला फुगा
तुझ्या सौंदर्यप्रसाधनानं पुन्हा फुगवता येत नाही
तरीही मी तुझ्या कॉस्मेटिक स्टॉलवर घुटमळतो
नातेवाईक निवडता येत नाहीत पण लेन्सेस निवडता येतात
लिपस्टीकस निवडता येतात हेअरकलर्स निवडता येतात
खरेच येतात?
तुझं मूळ नाव चिखल आहे
आणि तुला कुठूनही पाहिलं तरी
तू पर्यायांच्या प्रत्येक अँगलमध्ये कमळासारखा दिसतोयस

२२

डोळ्यानां उध्वस्त करणारी प्रकाशयोजना
जो तो आणतोय तुझ्या बागेतून
सुगंधाची उसनी खुर्ची
दुःखाचा वास विसरवणारी
तहानेच्या कपात उठतायत पाण्याची वादळं
आणि श्वासांच्या बॉटल्स बिनपावलांनी गोळा करतायत
जगभराचे पांढरे शुभ्र झरे
श्रध्दा उडत चाललेल्या हातांनी ईश्वराला केलेल्या नमस्कारासारखा
डोळे जुळवून
जो तो खरेदी करतोय
निद्रानाश नाहीशी करण्याची गॅरेन्टी देणारी स्वप्ने
झोपलेल्या झोपेत
खूबसूरतीचा दुष्काळ कुणी एकटा माणूस संपवूच शकत नाही ह्या शहरात
त्यासाठी मॉल लागतो किंवा मृत्यू
समजूतदार त्वचा माहितीदार डोळे आकाशाएवढे तोण्ड
तुझी कालिफिकेशन्स गब्बर आहेत
खरेदीच्या दोन तासासाठी बावीस तासाचा दिवस करुन
एका क्षणात उडी मारतायत
माझे बंबैय्या पाय
झोपलेल्या झोपेत
बायकी लगबगीने
पसंतीमधून प्रेमात प्रेमातून लग्नात
आणि मग जाग आली की
पश्चाताप करत राहतात
पुढची झोप चालून येईपर्यंत

२३

मी आत्मा नाहीसा करत सरकतोय झोपलेल्या झोपेत
आणि विविधता सुखाला आत्मा देत
मला हिप्नोटाईज्ड जाग आणतीये
हिप्पोपोटॅमस आणि जीम एकत्रच नांदतायत मॉलोबा
तुझ्या प्रत्येक मॉलमध्ये
"इथली कुठलीच वस्तू माझी बायको नाहीये
तारुण्यात रखेल आणि म्हातारपणी नर्स व्हायला"
एक बॅचलर वैतागतोय लाईफलॉंग गॅरेन्टीवर
आणि मला तुझ्या सगळ्याच गॅरेन्ट्यांचा निषेध करण्याची
उबळ येतीये
"भाषा तोण्डघशी पडलीये
निषेधच करायचा असेल तर चालता हो"
मॉलवर प्रेमकविता लिहिणारे भटके प्रेमवीर मला आदेश देतायत
"when you are in mall
behave like mallans"
मॉलमाज चढलेले भुरटे लोक मला सल्ला देतायत
मी तुझ्यात जितकं परदेशी पाहतोय
तितका माझ्यात देशी होतोय
म्हणूनच मी टाटाला बाटा अद्याप दाखवलेलं नाही
"आमच्या तारुण्यात मॉल नव्हते
आम्ही दुकानाला दुकानच म्हणायचो"
एक म्हातारा नेक्स्ट जनरेशनला सांगतोय
आणि नेक्स्ट जनरेशन रॉक ऐकतीये
"ही शिक्षा
ही खरेदी करण्याची शिक्षा
माझ्या गुन्ह्यापेक्षा मोठी आहे"
एक वेडा पुटपुटत चाललाय
पण तो सुटाबुटात असल्याने त्याला हाकलण्याची ताकद कुणातच
नाहीये
"ही गोष्ट ग्रेट असेल मि सेल्समन
पण ही काही परीस नाही"
मी तुझ्या सेल्समनला सांगतोय
"प्रत्येक माणसात एका चांगल्या मॉडेलचा तुकडा असतो
तो एखाद्या वस्तूच्या गोल्डन प्लॅशने चमकण्याची वाट पहात असतो
ही गोष्ट तुम्हाला चागंली देखणी बनवेल सर"
तुझ्या सेल्समनचा आवाज हा परमेश्वराची कॉपी करत असेल
पण त्याचा गळा सैतानाचा गळा आहे
"be fruiful, and multiply and replynish the earth"
प्रत्येकजण गुप्तहेर होऊन दुसऱ्याच्या खरेदीवर वॉच ठेवतोय
मग राष्ट्राध्यक्षासारखी ती दुसऱ्या दिवशी चोरून खरेदी करतोय
"ह्या दूध पावडरीत मला आईचा पत्ता आढळत नाहीये"
"मॅडम ही दुध पावडर आहे आणि विश्वास ठेवा
ती आईच्या स्तनापेक्षा आधीक पोष्टीक आहे"
मी ऐकतोय फक्त ऐकतोय
माझी जीभ संथाळ आहे
पण ती वाहते तेव्हा नदी निर्माण करते
मी जिभेला काबूत ठेवून वाचतोय
"A TV FOR TV AN EYE FOR EYE
A TOOTHPASTE FOR TOOTHPASTE TOOTH FOR TOOTH
A WATCH FOR WATCH A HAND FOR HAND
THE SHOES FOR SHOES, FOOT FOR FOOT
AN EXCHANGE OFFER

२४

लोक प्रत्येक स्टॉलवर
त्याच्या भुकातुन भटकतायत
ज्या सेमिओडेटीना प्रॉपर मरायचे आहे
त्यां व्यवस्थित खरेदीदारांना खिसा बघून सरळ चावतायत
मी मुळातच वाकडा आहे.
म्हणूनच मला सेमीओडीटीचा गनिमी कावा ठाऊक आहे

मी कवितेसाठी काळीज ओढतोय
खरेदी करून शिणल्यानंतर
मला आलीये भाषेची सिगारेट फुकण्याची विलक्षण उबळ
एक कश घेईन
आणि पुन्हा खरेदीला लागेन
मी भर बाजारात कबीरासारखा उभा राहून कविता लिहितोय
इतके दुःख भोगूनही
चुका करण्याची माझी तळमळ
अजून शाबूत आहे
माझे डोळे माझे हात लिहीत असलेली कविता - वाचतायत
आणि माझे हात माझे डोळे वाचत असलेली कविता -लिहतायत
लोक तुझ्या मॉलमध्ये येतायत
मी बाजारात उभा राहून कविता लिहितोय
हे त्यांच्यापर्यंत अद्याप पोहचलेलं दिसत नाहीये
लोक माझी कविता आणि तू ठेवलेल्या फॅशन्स
ह्यातून फॅशन्स निवडतायत
जे बेस्ट आहे ते खरेदीसाठी बरे आहे
जे फक्त बरे आहे ते खरेदीच्या लायकीचे नाही
मी खरेदीच्या सौंदर्यशास्त्राला भीक न घालता
कविता लिहितोय
आणि लोक हा काय चावटपणा चाललाय
ह्या अर्थाने नजर टाकत पुढे सरकतायत
ज्यांनी भाकरीसाठी घाम गाळला नाही
ते सचोटीच्या ब्रेडसाठी तळमळतील काय?
मी प्रश्न विचारून लोकांपासून वेगळा होत नाहीये
मी फक्त कवितेत उभा राहून लोकात नागडा होतोय
आणि नागड्यांना तू जाणतोस मॉलोबा
सगळे कपडे स्वच्छ आणि सारखेच दिसतात

## २५

फॅशन ही गोष्टच अशी आहे
जी मुबलकतेत सुचते
फॅशन्स तुझ्या मुबलकतेचा महिमा आहे
त्यांची प्रसिध्दी आहे एक बुडबुडा
जो पृथ्वीहून मोठा व्हावा असे ती करणाऱ्यांना वाटते
हे शहर इतकं निष्ठूर फॅशनेबल
की मेलेल्या माणसाच्या खिश्यातूनही
प्रथम आपल्या कुलूपाच्या चाव्या शोधतं
तुझ्याकडे चालत येतं
डिमान्डस खूप आहेत
आणि तुझ्या डिझायनर्सचे पाय गरम आहेत
फोनी है फोनी है फोनी है मेरी दुल्हन
फोनी है फोनी है फोनी है उसकी फॅशन
फॅशन पेहनके पॅशन जताके मेरी दुल्हन कहाँ चली कहाँ चली
धडगं जे जन्मासोबत मोफत मिळालेलं असतं
प्रत्येकाच्या आसपास वावरतय
आणि प्रत्येकाच्या सोबत जळतीये
एक फॅशन उजळवणारी कॅन्डल
शमा कभी पहले ऐसी ना थी
दुनिया कभी पहले ऐसी ना थी
अभी तो मैं जवान हूँ अभी तो मैं जवान हूँ
मॉलोबा,
तू रिमीक्स गा किंवा खयाल
प्रत्येक गाणं मला फक्त दहा प्रवास पुरेल

## २६

मूर्ख निश्चिततेपेक्षा शहाणे सशंयकल्लोळ कधीही परवडेबल
म्हणून सगळे संशय उरावर घेऊन
तू तुझ्या गडावरून
सगळ्या मॉलवर वॉच ठेवतोयस
"आम्ही खूप होतो म्हणून हा मॉल बघता बघता उभा राहिला"
कोणीतरी रिपोर्ट देतोय तुझ्या अदृश्यतेला
"कोई लौटा दे वो मेरा पुराना फेस"
एक भगवा कल्ट हिरव्या कल्टमधून पुटपुटत चाललाय
हे एक असे ऋतूचक्र आहे ज्यात टिव्ही गातोय कुहूकुहू
आणि कल्टाला वाटतय की
त्यामुळे त्याचा वसंत रिमिक्स होईल
तो कुंभकर्णासारखा भुकेतही आळस देतोय
आणि त्यांच्या डोळ्यादेखत एक बेबी डॉल
त्याच्या अखत्यारीतील एक मस्कुलीन फॅशन
फेमिनाईन करत चाललीये
बायका नेहमीप्रमाणं ती फॅशन खरेदी करताना
पसरतायत तपशीलांचा फाफटपसारा
आणि सेल्समन मुद्द्याची गोष्ट करणारा त्यांचा ताजा कलम
कधी येतोय ह्याची वाट पाहतायत
कुठल्याच बायकांचा मॉलही एक दिवस मरणार आहे ह्यावर विश्वास नसतो
ह्याही बायकांचा नाहीये
त्या मॉल अमर असल्याचा थाटात किमती विचारतायत
आणि रचतायत केलेल्या प्रत्येक खरेदीचा हॅपी एन्ड
प्रेमावर फार विचार करावा लागू नये म्हणून
माझी प्रेयसीही खरेदी करतीये
एक ग्रिटींग कार्ड
हॅपी बर्थ डे लव
बी कूल अवर लव वील स्माईल अगेन
अॅन्ड हॉट वील रिटर्न
इन युवर ठण्डा ठण्डा मौसम

## २७

सगळी दुकान कधीच सारखी नसतात
तुझा कुठलाच मॉल ह्या नियमाला अपवाद नाही
काही दुकाने सतत Dead काही सतत Live
The only Bad customer is Dead customer
निळा सूट घालून मार्केटींग किंचाळत चाललय
वेडींग ड्रेससाठी फेमस असलेलं शॉप
माझ्या प्रेयसीला विलक्षण आवडतं
मी तिच्याशी कधीही लग्न करणार नाही हे माहीत असूनही
मेलेल्यालाही जिवंत करेन असा उत्साह दाखवत
तुझा प्रत्येक सेल्समन
तिला वाग्दत्त वधू समजून अलौकिक स्पर्श करतोय
इथला प्रत्येक स्टॉल लग्नाइतकाच पॉप्यूलर आहे
प्रत्येक स्टॉलवर जितके वर तितक्या वधू
जितके मोह तितक्या संध्या
तुझ्या चंचलतेला माझ्या दृढतेनं समान करत

मी चालतानाही ताठ आहे
तुझे मोठे मॉल छोट्या दुकानांना शार्कसारखे खातायत
त्यांच्या आणि ह्या शहराचं कॉस्मॉपॉलिटीन पाणी
त्यांच्या National Selection च रेकॉर्डही न ठेवता
डार्विनच्या पुस्तकातून वाहतचं आहे
ह्या शॉपने किती शॉप्स पचवली ह्याने क्षणभर मी अस्वस्थ
आणि प्रेयसी नव्या आलेल्या व्हरायटी पहात माझ्यासारखी
पोहतीये
कदाचित तुझ्याकडे असतील ह्याहूनही अशा कित्येक
सेमिऑडीटीज
आणि त्याना expand करण्याच्या स्कीमस
ज्या माझ्या चिन्हांच्या स्वप्नातही येत नाहीयेत
तुझ्याकडे येणाऱ्या प्रत्येकाचं डोकं परदेशी आहे
आणि त्यांच्या काळजाला आहे ते देशी आहे ह्याचा न्यूनगंड
तरीही वेडींग शॉपमध्ये लोक चमत्कारीकपणे देशी आहेत
समजूतदार जिभा ज्या प्रथम भाषा नाहीशा करतात
आणि मग शहाणपणाला थेट पहात बोलतायत
सर्वत्र गायब
इथेही फक्त भाषा बोलतायत
भाषांशी

२८

गाड्यात गतिमान असणारे कित्येक लोक
तुझ्या इथे येऊन शांत होतायत
एरव्ही बसून असणारे कित्येक लोक
इथे शॉपींग वॉक घेतायत
तू देतोयस खरेदीसाठी निवांत वेळ आणि ऐसपैस जागा
मी पूर्वी गार्डनमध्ये हिंडायचो
आता तुझ्यात हिंडतो
तू एक असा माळी आहेस मॉलोबा
जो स्वत:च वस्तूंची पानं फूलं तोडायला लावून
त्यांची किंमत वसूल करतो
ही स्टॉलची झाडं
ह्या खणांच्या फांद्या
सगळं कसं परफेक्ट आहे
फक्त त्यांच्या अनऑरगॅनिक मूळाचं आडवंतिडवं जंगल मात्र
तू ऑफिशिअली लपवून ठेवलयस
माझ्या बॉडीचं ऑरगॅनिटक मॅटर
चालता चालता ह्या अभावाने कधी कधी दचकते
एवढंच

२९

मी शरीराचे शरीराला
आत्म्याचे आत्म्याला
आणि वस्तूंचे वस्तूंला देतो
तू काय करतोस
वस्तूचं मॅटर डेड असतं की alive असतं?
प्रत्येक वस्तूला शरीर असते आणि expiry date ही असते आत्मा असतो?
मेल्यानंतर माणसाच्या आत्म्याला कुठेच जाण्याची गरज नसते
असं म्हणतात
वस्तू expire होतात तेव्हा त्यांचा आत्मा कुठे जातो?
की वस्तूचा आत्मा काढून घेऊन
त्या पुरेशा परात्मा झाल्या
की मगच तू ह्या स्टॉलला लावतोस?
मी असं काही वेड्यासारख बरळायला लागलो की माझी प्रेयसी म्हणते,
"वेड्या, वस्तूंना आत्मा आपण देतो विशेषत: आम्ही बायका
म्हणून तर त्यांचे मरणही आम्ही सोसतो
तुम्ही पुरुष
जर तुम्हालाच आत्मा नाही तर तो तुम्ही वस्तूनां तो काय देणार?"
मॉलोबा
तू स्त्री की पुरुष?

३०

स्मृती हिरवी असो वा पिवळी
माणसाची असो वा संगणकाची
शेवटी धोकादायक असते
तू एक असा पशु आहेस
जो बलात्कारही संगणकीय तर्क देऊन करतो
तू कुठल्याही भुतापासून सुपरमॅन बनवू शकतोस
कुठल्याही कम्प्युटरपासून तुला हवा तसा सेल्समन
मी तुझ्याकडे ह्या वयात येतो
हा माझ्या रक्ताचा निर्णय नाही
ही इतक्या दिवसांची कोमट सवय आहे
कुठल्याही पैश्याचा शेवट शेवटी खरेदीत होतो
माझा पैसाही अपवाद नाही
माझे सगळे नातेवाईक माझ्या पैश्याने खरेदी करताना
आनंदी आनंद गडे म्हणतात
आणि वेड लागून नागडे होतात
मला खात्री आहे
कयामत तुला शोधायला येईल तेव्हा
तू तिलाही परमेश्वराची पोस्टपोनमेंटची ऑर्डर विकशील

३१

भले भले
तुझ्या ॲडीक्शनमध्ये कोसळले
दोन ब्रॅण्डच्या दरम्यान माणूस कितीकाळ थांबू शकतो
दोन श्वासांच्या दरम्यान मोक्ष असतो असं म्हणतात
दोन खरेदींच्या दरम्यान काय असते?
माया?
"माझ्या विश्वासघाती मित्रा,
माझं शव वा माझ्या मृत्यूचा तुकडा आहे का त्या कॅरीबॅगेत
जी तू माझ्या पैश्याने खरेदी केलीयेस"
मी माझ स्क्रीप्ट चोरुन लगान वसूल करणाऱ्या माझ्या फिल्मी मित्राला संतापानं
विचारतोय
तो नुसता मेंढी असल्यासारखा
मॉ मॉ करत माझ्या पासून पळत चाललाय
पळता पळता तो असिस्टंटसना सांगतोय
"भाग्यवान टकलांनो, पळा पळा
वीग गोळा करण्याची पुन्हा वेळ आली"
तुझ्या ह्या मॉलमध्ये एवढी जागा आहे
की त्यांना शोधणं अशक्य आहे
"ह्या चायनीज भांड्यात भारतीयांचा मृत्यू आहे"
"हे मस्त टिकाऊ नसेल पण स्वस्त विकाऊ तर आहे
आणि जे विकाऊ आहे ते खपावू आहे"
ज्याने परमेश्वराचा गळा कापलाय

तो भक्त तुझ्या जागेत शांततेची विक्री करणाऱ्या सीडी ठेवू शकतो
माझ्या त्वचेवरचे स्टॅन्डिंग केस बसण्याची वाट पाहतायत
माझा बाप आख्खी फॅमिली आली तरी
खरेदीसाठी तुझ्याकडे आलेला नाहीये
तो घरामध्ये नाहीसा झाला असेल काय?
बाप येत नाहीये
माझ्या डोक्यातील शहाणपणा केस पांढरे होऊन गळत सुटलाय
आणि मी त्याची वाट पाहतोय
की तो आला की काहीतरी ड्रॅमेटीक घडेल
ह्याची वाट पाहतोय
मला माहीत नाही

**३२**

पैसा आणि sex मूलतत्ववादासारखेच पसरत चाललेत
आणि तुझी पोर्नोग्राफी
माझ्या आयुष्यातील वीज चोरुन
माझ्यासाठी दिवे जाळतीये
मी खरेदी करतो म्हणून मी आहे
की मी आहे म्हणून खरेदी करतोय?
पूर्वी प्रत्येक खाणावळीत मला मित्र भेटायचा
आणि प्रत्येक खाणावळीवाली माझी बहीण व्हायची
तुझ्या इथे गर्दी भेटते पण माणूस भेटत नाही
मग मित्र भेटणे तर फार दूर
मी माझे कपडे ड्राईव्ह करतोय
एकट्याने भर गर्दीत
तुझ्या प्रत्येक मैलावर मला भेटतोय एक स्टाईलस्टोन
ज्यावर लिहिलंय
Once a mallman, always mallman

**३३**

भोवताली जंगल होते
तेव्हा भोवताली पशु होते
जे आसपास फ्री सेक्स करत
आणि त्यांना पाहून लोक सेक्सबाबत फ्री होत
आता आसपास पशु नाहीत
म्हणून माणसांनाच पशु बनवून ब्ल्यू फिल्मा बनवल्या जातायत
तू कोण आहेस?
त्या जंगलाची रिप्लेसमेंट
की इडन गार्डनचा पर्याय
मी तुझ्या सेक्समॉलमध्ये उभाय
आणि माझ्या आसपास जंगल आहे की गार्डन
मला कळत नाहीये
मी चाललोय
आणि कोणत्याही क्षणी माझे कपडे गळून
मी शूट होईन अशी मला भिती वाटतीये

**३४**

हे इरॉटीक स्वर्ग तुझे वैभव डिक्लेअर करणारे
हे धारावीयीन नरक हॅण्डीकॅप करणारे
हे शहर बिचोबिच लॅपटॉप वाजवत
इथे रात्रीची इनफर्मेशन सकाळी अनोळखी होते
दिवसाचं नॉलेज रात्री आऊट ऑफ डेट होतं
हा कॉम्प्युटर हे एडीट बॉक्स
गतीचा फील देणारे
माझे श्वास गिळतायत
ही बेसलेस ब्रेसलेटस
तुझ्यात खरेदी केलीली
माझी मनगट चावतायत
हे नकटे कण्ठाहार
तू मला विकलेले
माझा गळा कापतायत
माझ्या अंत:करणातील प्रज्ञापाठ शाला
बघता बघता बनत चाललीये मौजेचे महाविद्यालय
आणि जे मासबेस्ड होतं
ते मॉलबेस्ड होत चाललय
तुझ्याकडे येताना
माझी तारुण्यातील पापं
आता चिंता करत नाहीत ईश्वराची
फक्त तुझे हे पॉण्डस हे फेस वॉश
रक्त धुवून काढतील काय
ह्या प्रश्नाने व्याकुळ होतात
माझ्या कुठल्याच खरेदीचे पैसे देऊ शकत नाही
माझी पवित्र त्वचा
त्यासाठी मला माझ्या पापांचे पर्चेसींग पॉवर पुरवणारे
हात लागतात

**३५**

मी प्रथम खरेदी केलेल्या वस्तूत हसतोय
आणि मग आलेल्या बिलात अडखळून पडतोय
रिलॅक्स दाखवण्याची हातोटी मला अवगत नाहीये
हवा थंड ठेवणारा एसी माझ्या श्वासांच्या मुळावर येतोय
हे बरं आहे की
पूर्वी मी प्रत्येक वस्तूच्या प्रेमात पडायचो
आता काही वस्तूंच्या मुळीच प्रेमात पडत नाही
त्यामुळेच त्यांच्याशी होऊ शकणाऱ्या नावडत्या लग्नांचा वेळ वाचतोय
निश्चिततेने सुरवात शंकेत शेवट
शंकानी सुरवात निश्चिततेत शेवट
तत्वज्ञान झालंय विणकराचां उद्योग
आणि जाहिराती फॅक्टरीसारख्या वाढत चालल्या
तू एक चांगला ब्रेकफास्ट आहेस
आणि कदाचित वाईट जेवण
अंधारात सगळ्या वस्तू काळ्या म्हणून
तू फक्त प्रकाशातच खुला होतोस
एकमेकाची हत्या करुन
मॉल बन्द होण्याची वेळ झाली तरी
लोक तुझ्यात जिवंत होण्यासाठी येतायत
त्यांच्या जखमा बेशुध्द करण्याइतपत क्लोरोफॉर्म तुझ्याजवळ आहे
पैसा प्रत्येक दुर्गुणाचं तोण्ड माऊथ फ्रेशनरनं सुगंधित करतोय
आणि वासना त्या तोण्डातून स्वत:चे दात घासत
ऐश्वर्या रॉयसारखी बाहेर पडतीये
प्रत्येकाला सत्ता गाजवण्याचा चस्का
आणि स्वातंत्र्य गमावण्याची उबळ
ज्यांना पत्ते पिसता येतात पणं खेळता येत नाही
अशा पिसकऱ्यांनाही तुझी वाट खुली
जो आज विण्डोत आहे तो उद्या दुकानात घर समजून येईल

हा तुझा प्रॅक्टीकल कॅपिटॅलिझम
निळकंठ खाडिलकरांच्यापेक्षा अधिक खरा आहे
इथली गर्दी मैत्री पुरवु शकत नाही
आणि चेहरे फोटोपुरतेच ठीक असतात
हे कळूनही प्रत्येकजण फोटोला आल्यासारखा
पैश्याची जात एकच
खरेदी
लोक खरेदी करतायत
जे समान आहेत ते मित्र नाहीत
जे मित्र आहेत ते समान नाहीत
जे समान नाहीत ते एकमेकाला सामान समजून
एकमेकाची खरेदी करतायत
आणि जे खरेदी करतायत ते खरेदी केलेल्या ब्रॅण्डवरुन
एकमेकाला मोजतायत
तू आहेस एक वाहती नदी
जिच्यात जे स्वत:ला हलकं ठेवू शकतात तरंगतायत
जे अवजड होतात ते बुडतायत
सुगंधित मध्यंतरे आणि आरामदायक थबक
खरेदी करण्याचा हा उत्साह
तुझ्यासाठी पृथ्वी हलवू शकेल
तू घडवलायस एक असा माणूस
जो तहान नसतानंही मिनरल वॉटर पितोय
भूक नसते तेव्हाही पिझ्झा खातोय
आणि आग नसते तेव्हाही संभोगात उतरतोय
तो विश्वास ठेवतोय कि ह्या सगळ्या गोष्टी
माणसाला माणूसपण देतात
आणि तरीही मॉलोबा
माणसाची प्रत्येक खरेदी पाण्यावर लिहली जातीये

### ३६

बाजारात कुत्रीही फॅशनेबल होतात मग माणसांचे काय?
"खरेदी करा खरेदी करा
तुम्ही खरेदी करु शकता
तुमचा चेहरा खरेदीदाराचा आहे
वेळ तर कुठेही जाणारा
आत किंवा बाहेर
या आणि खरेदी करा
स्वर्ग एन्जॉय करण्यासाठी
नरक हाकलून देण्यासाठी"
मी आत येताना निऑनमधून टेम्प्टेशन नाचत आलं होतं
मी जाताना मेडीटेशन बाहेर चाललंय काठी टेकत
निघतानाही तुझे मॉल रिअलच वाटतायत
कारण ते स्वप्नं विकत नाहीयेत
ते वस्तूंचे स्पेशल इफेक्ट विकतायत
मला माहित आहे
वस्तू जितक्या दाखवतात तितक्या तरुण नसतात
ऍपर्स जितकी वाटतात तितक्या फ्रेश नसतात
सेल्सगर्लचे शब्द तलवारींनीही गुलाबात नटवतात
इथे जोडेही स्वत:ला शालूत लपेटून विकतात
मी माझी सभ्यता घरात सोडूनच आलो होतो
उत्पादनं लैंगिकच असतात
त्यांना ब्रम्हचार्यचं स्वभावात:च वावडं असतं
प्रेमानं आजारी पडलेली दोन जोडपी
तुझ्या ग्रिटींगकार्डच्या औषध योजनेत दाखल होतायत
Surprising!Really Surprising!
की
Horrible! Really Horrible!
एकमेकाबरोबर झोपूनही माणसांना स्वत:चं प्रेम व्यक्त करायला
ग्रिटींग कार्डस लागतायत
मला निघायचय
आणि मी स्तब्ध आहे
माझे पाय हालत नाहीयेत
माझ्याआधी ह्या मॉलमध्ये कोण आलं होतं
माझ्यानंतर ह्या मॉलमध्ये कोण येणारं आहे
हे मला कधीच माहित होणार नाही
इतकं हे शहर मला अपरिचित आहे
आणि तरीही माणसाच्या पाऊलखुणा चाचपत
मी इथं येतोय
ही माणसं जी एकमेकाला ओळखत नाहीत
आणि माणसं
जी एकमेकाजवळच्या ब्रॅण्डसना ओळखतात

### ३७

माझी आजची खरेदी मला संपवू द्या
मग जग नाहीसे झाले तरी चालेल
मॉल बन्द होतांनाही माणसाची खरेदी करण्याची कळकळ संपत नाहीये
काल माणसे तुझ्यात खरेदी करत होती
आज तू वस्तूतून माणूस खरेदी करतोयस
तू कितीही अंतरावर अस
पहिलं पाऊल तुझ्या दिशेनं पडलं की
आख्खा प्रवास तुझ्यापर्यंतच पोहचतो
प्रत्येक देवळाशेजारी आधीक उंचीचा मॉल उभा राहतो
म्हणूनच सगळे चेहरे शेवटी मेकपला जाऊन मिळतात
लंगड्यांना बुटाचं महत्व काय?
आणि बुटांनी लंगड्यांविषयी काय ऐकलेलं असतं
मी वयाने ॲडमइतका आहे
तू वयाने बागेइतका की सैतानाइतका की फळाइतका की साक्षात ईश्वराइतका?
ईश्वराने प्रथम मॉल बनवला
मग ॲडम
मग ईव्ह
मॉल मग म्हणाला
फळ खा फळ खा
ईश्वराने मोहात पडून फळ खाल्ले
आणि ॲडम व ईव्हला
पुढल्या ऑर्डरसाठी मॉलमध्ये धाडले
तेव्हापासून तो पहिला मॉल
मॉलोबा
ह्या नावाने ओळखला जाऊ लागला
आणि स्वत:चे क्लोन वाढवत
सर्वत्र फिरु लागला

प्रत्येकालाच गोळा करण्याची तहान का?

★★★

## मॉलमधला हजारावा दिवस

१

दिवसामागून उलटतायत दिवस
रात्रीमागून रात्री
तरीही तुझ्यातील खरेदी संपतच नाहीये मॉलोबा
माझ्या कवितेचे गालिचे कधीपासून उडतायत तुझ्यात
आणि मी ते कधी जमिनीवर उतरतायत ह्याची वाट पहात
हे स्टॉलचे पर्वत
जे कधीच मंहमदाकडे गेले नाहीत
आणि त्यांच्या खोटं बोलण्याऱ्या इलेवन टू टवींटी कमान्डमेन्टस
मी मॉलमध्ये श्वास घ्यायलाही
आताशा घाबरतो
कारण तो घेतला की मी एकतर खरेदी करतो
किंवा प्रतिज्ञा तरी करतो
"हा मॉल माझा देश आहे सारे मॉलीय माझे बंधु आणि
भगिनी आहेत किंवा प्रियकर वा प्रेयसी आहेत
माझे मॉलवर प्रेम आहे आणि मॉलमधल्या विविध आणि
संपन्न वस्तूनी नटलेल्या स्टॉल्सचा मला अभिमान आहे
त्यांची खरेदी करण्यासाठी लागणारी पात्रता माझ्या
खिश्यात यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन
मी माझ्या आईवडीलांना गुरुजनानां आणि ज्येष्ठानां
इथल्या वस्तू खरेदी केल्यानंतर आदर देईन आणि
त्यांना सन्मानाने वागवेन मी मॉलशी आणि मॉलवासीयांशी निष्ठा राखीन
आणि त्याची उन्नती व प्रगती व्हावी म्हणून सदैव झटेन"
हे तुझे अपराधी वैभव
आणि कोऱ्या चेहऱ्याचे गोरे गिल्ट
माझ्या पैश्याला त्याचे स्वत:चे पंख असतात
माझ्या दारिद्र्याला त्याचे स्वत:चे डंख
मी मधोमध असतो
तुझ्या नाकातील साऱ्या नवीन गंधाची नथ उतरवायला
मला आवडते
मी त्या गंधात पॅरीस मधली न्यूज वाचतो
आणि माझा सुगंध अपडेट करतो
माझ्या आसपास
सगळे सुशिक्षित आणि बुभुक्षित
शेवटी ह्या देशातील दंतकथेतील ब्रह्मदेव
पहिला पिता स्वत:च्याच मुलीच्या मागे लागला होता
मी त्या मानाने खूपच सौम्य आहे
पापावर शहाणपणाचा कधीच पहारा नसतो
म्हणूनच शहाणपणाचा कुणावर दरारा नसतो
तू शेवटी परिणाम आहेस त्या कारणांचा
जी शहाणपणाच्या तुकड्यासारखी वासनेच्या आफिममध्ये चमकतायत

२

अनेक वैद्य अंगावर घेऊन मरणाऱ्या अलेक्झांडरसारख्या
अनेक जगज्जेत्या मिल्स मी मॉलमध्ये मरण पावताना पाहिलेत
आणि तरीही मी तुझ्या मॉलमध्ये येतो मॉलोबा
तुला डोळ्यांनी पिण्यासाठी
माझी माणूसकी ह्या अमानुष गर्दीत घासण्यासाठी
माझ्या भुकेचं आतडं
इथल्या फुडबाजारसारख्या कातड्यावर वाजवून
एकताल ऐकण्यासाठी
मी येतो कारण शोधण्यासाठी
की मी का येतो?
तुझे भक्त आता इतकी मॅनेजमेन्ट शिकलेत
की क्रियेशनच्यावेळी त्यांनी ईश्वराला काही उपयुक्त सूचना दिल्या असत्या
पर्यायांच्या संपन्नतेत अवघडलेली निवड
आणि आसपास सर्वांना तुझी लागलेली आवड
जो तुझ्यापासून जितका जवळ तो तितका स्वत:पासून दूर
जे काल लढाईतून पळून गेले
ते आज लढतीसाठी पुन्हा येतील
हा भरोसा तू गाजराच्या पुंगीसारखा मोडून खाल्लायस
आजकाल रोज स्वप्नात मी मॉल होतो
जागृतीत मूळ स्त्रीचा बॉल होतो
काल हात कापले गेल्यानंतरही
मी अर्धातास तुझ्यात खरेदी करत होतो
आणि एकमेकाच्या कपड्यातून एकमेकाचे कपडे झवत चाललेले लोक
आश्चर्याने पाहत होते
हवेतल्या हवेत चालणाऱ्या माझ्या फॅशनेबल पिशव्या
आज मी सकाळी तुझ्या मॉलवर बसून हिंडलो मॉलोबा
आम्ही परतलो तेव्हा मी मॉलच्या पोटात होतो

३

धर्मासाठी धर्म
कलेसाठी कला
मॉलसाठी मॉल
ह्या चकाचक लाईव कलरच्या तुझ्या भिंती
आता ज्या माझी आख्खी जनरेशन साक्षर करतील असं वाटल होतं
फक्त स्वत:च्या बांधकामात बसून
काळाच्या नावानं बोट मोडतायत
There is always something fishy about your
evolution in mineral water
वेडे आणि प्यासे
चन्द्र न पाहताच
तुझ्यात बॉटल शोधायला बाहेर पडतायत
आणि तरीही तुझ्या गुरुत्वाकर्षणात
सराईत तहान आख्खी पृथ्वी पितीये
तुझी मान कापू इच्छिणारे गळेकापू
तुझ्या आवाजाची ओळखकुळी
अद्याप शोधू शकलेले नाहीत
आणि मॉलचा आवाज हाच लोकांचा आवाज आहे
असे मानणारे पाणीकापू लोक वाढत चाललेत
लोकच तुला पाहून वेडे झाले असतील
तर तुला माझ्या कवितेतल्या शहाणपणाची गरज काय?

४

जगरहाटी कधी बाजारहाट करत नव्हती मॉलोबा
तुकाराम होता तेव्हाही
तुकाराम नव्हता तेव्हाही
मी माझ्या दुकानदार बापावर लिहिलेले अभंग
तुझ्या मॉलमध्ये बुडायला लागलेत
मला खात्री आहे माझे अभंग मला परत मिळणार नाहीत
मॉलमध्ये असं खूप काही बुडतय
जे विकायला म्हणूनही वर काढलं जात नाहीये

५

तू गे आहेस तू लेस्बीयन आहेस
तू हेट्रोसेक्युअल आहेस तू मेट्रोसेक्युअल आहेस
तुझी लैंगिकता फ्लेक्झीबल आहे
जी कुणालाही अॅडजस्ट करतीये
तू आयुष्याचा आयुष्यासारखाच बरा न होणारा रोग
आणि मी आयुष्याने आयुष्याला चढवलेला भोग
आमच्या घराला बाग नाही
आणि तू असा कुंड्याबिड्यांनी नटून बागशाही
आता ईश्वराने प्रथम आम्हाला तुझ्या इथे पाठवावे नाहीतर कुठे?
तू ईश्वराचं हिमालयन ब्लंडर असूनही
ईश्वराला टेकून
हिमालयासारखा जिथे तिथे उभा
ईश्वराने तुला निर्माण करताना सांडलेल्या रक्तात
काहीतरी असं आहे जे आमच्या रक्तात
आत्म्याची हत्या खेळवतय
मी मॉलमध्ये बोलतोय
आणि आलेल्या बायका खरेदी करता करता ऐकतायत

६

मला माझ्या रक्तात खेळत असलेल्या आत्महत्येचा हात हातात घेऊन
तुझ्या मोकळ्या जागेत भटकायला आवडतं मॉलोबा
ती तुझ्या एखाद्या मॉलच्या प्रेमात पडते
आणि माझे रक्त सोडून त्याचा हात पकडून निघून जाते
ती निघून गेली की मी वाट पाहतो
माझ्या आत्म्याचा दरवाजा तुझ्या आरश्यातून उघडण्याची
पण तुझे आरसे माझ्या आत्म्यासाठी उघडत नाहीत
ते फक्त त्यांचा मेकप खपवण्यासाठी
माझे चेहरे पहात राहतात

७

मला भेटणाऱ्या प्रत्येक बाईचा चेहरा
हा माझ्या आत्महत्येसारखाच असतो
म्हणूनच बाई जेव्हा स्वत:विषयी बोलत असते
तेव्हा मी माझ्या आत्महत्येविषयी ऐकत असतो
बायकांना मॉलमध्ये हिंडत असतानाही कवी आवडतात
कारण कवी फक्त शब्दांचेच मुके घेतात
आणि बायकांनाही त्यांच्या शब्दांचाच मुका घेणारा कोणी हवा असतो

८

खरेदी करता करता बायकांची शिंगे
स्वर्गापर्यंत पोहचतायत
आणि म्हणूनच तूही बैलासारखा माजत चाललायस
मी बायकांना त्यांच्या परफ्युमवरुन ओळखतो
तू कशावरुन ओळखतोस
त्यांनी केलेल्या गॉसिप्सवरुन ?
मीडीया ही त्यांची मूर्तीपूजा आहे
आणि म्हणूनच मी मिडीयाबाबत नास्तिक आहे
माझ्या हरवलेल्या सर्व वस्तू तुझ्या मिडीयाप्रकाशात सापडत नाहीत
मात्र कधीकधी माझे आंधळे हात तुझ्या अंधारात अचुक जागी पडतायत
म्हणूनच मी घरापासून सुरवात करतो
आणि शेवटी थेट नोहाच्या नौकेपर्यंत पोहचतो
जी तुझ्या इथे कधी कधी सेलला लागलेली असते

९

वय उलटत चाललंय
आणि तरीही मला कळत नाही
तुम आखिर किस चिडीया का नाम हो?
मी विचारले तर लोक आताशा
सरळ उत्तर देत नाहीत
फक्त चमत्कारिक आवाज काढत पुटपुटतात
कुठलाच आवाज अंतिम नाही.. नो फायनल टेक..
कविता जी एकेकाळी जीवनाची गति होती
आता थांबा झालीये
तुझ्याबाहेर ट्रॅफिक
तुझ्या आत ट्रॅफिक
आणि मी सिग्नलसारखा
कधी हिरवा कधी लाल कधी पिवळा
माझी भाषा एक अशी कांऊटर नोट होतीये
जी सगळ्या करंट करंसीना त्यांच्या विसंगतीत उलटं पाडतीये
आयुष्याच्या सर्व कांऊटरवर मी फाटतोय
आणि तरीही सर्व बँकेत चाललोय
तू निर्माण केलेल्या कोलाहलातही
स्वत:चं काळीज ऐकण्याची माझी क्षमता
अद्याप कानाग्र आहे

१०

तुझी भाषेवरील पकडीची ग्रेस कॉंग्रेससारखी वाढत चाललीये
आणि तुझ्या जाहिरातीत
गवत खाणारे लोक
वाघाचा चट्टामट्टा करतायत
तू सोडलेले साप
तू स्पॉन्सर केलेल्या ह्या हिरवळीत सहजासहजी दिसत नाहीत
आणि तुझी स्वीट कंपलशन्स
आता संगीतातही आत्मविश्वासानं खोटं बोलायला लागलीयेत
तू झालायस सर्वशक्तिमान व्याकरण
आणि पंतप्रधानांनाही बोलताना तुझे नियम पाळावे लागतायत
फक्त आम्ही कवीच काय ते
ह्या व्याकरणाचा बाहेर उभे आहोत
एकतर आम्ही तुला मोडीत काढू
किंवा तू आम्हाला मोडीत काढशील
कोणीतरी मोडीतं काढलं जाणार एवढं नक्की
पण त्याचा काय परिणाम होणाराय माहीत नाही
कदाचित् त्याची कल्पनाच करता येत नाहीये
कुणालाच काही नाही माहीत
कुणाचे हीत कुणात आहे

११

तू लक्ष्मणच्या सामान्य माणसाने
स्वप्नात पाहिलेला शेवटचा फोटो होतास
हे मला ह्या शतकात प्रवेश करताना कळतय
पाण्याने रक्त धुतले जाते पैश्याने खून
त्यामुळे आता तुझ्या कुठल्याच गुन्ह्याची शिल्लक नाही कुठलीच खूण
तू आहेस एक कॉस्मॉपॉलिटीन डॉन
आणि तुझी खून करण्याची स्टाईलही एक स्टेटमेंट आहे
मी तिच्यावर भाळत नाही

# आत्मचरित्रातले काल्पनिक क्षण

## Untouchable

### खण्ड : ३

### (२००५)

श्रीधर तिळवे

जेहत्तेकालाठायी एक श्रीधर होता. त्याला डोळ्याच्या जागी काचा, कानाच्या जागी खाचा, पायाच्या जागी फक्त टाचा आणि जिभेच्याजागी वाचा होती. त्याचे डोके होते मडके, त्याचे खिशे होते कडके, हात होते सडके आणि पोटे होते सदा भडके. त्याच्या काळजात होती वीज, मणक्यात होते बीज, लिंगात होते चीज आणि पाठीत सर्वत्र नीज. सूर्यापुढे गेला की लिंग वितळायचे. पाण्यात भिजला की काळीज कडाडायचे. बर्फ पडला की मणके आ ऽ ख डायचे मग काय म्हणता महाराजा

झाली अशी पंचायत झाली
झाली अशी पंचायत झाली
उन्हात फिरायचं तर वांधा
पाऊसात भिजायचं तर वांधा
हिवाळ्यात हिंडायचं तर वांधा.

मग मडक्यानं खिशाला विचारलं ! खिशानं हाताला विचारलं ! हातानं पोटाला विचारलं !

काय विचारलं महाराजा?
मडक्यानं विचारलं,
आता करायचं काय?

कुणाला काही सुचेना ! कुणाला काही सुचेना! कुणाला काही सुचेना ! सुचणारं तरी कसं महाराजा?

अहो डोके होते मडके ! डोके होते मडके ! डोके होते मडके ! मडके मडक्याला कधी काही सुचलंय काय? म्हणून मडक्यान विचारलं,

आता काय करायचं.

प्रश्न अवघड. जग अवघड. इथे महाराजा जो चळला तो चळत झाला. जो गळला तो गर्भगळीत झाला. जो जळला तो जळीत झाला.

तर आता ह्या अशा जगात काय करायचं? श्रीधर वाट पाहू लागला. जे जे होतेय ते साहू लागला. आपलं हे अजीब शरीर वाहू लागला आणि एक दिवस वाट पाहण्याचे सार्थक झाले. एक दिवस असा उगवला ज्या दिवशी उन्हाळा उन्हाळा नव्हता हिवाळा हिवाळा नव्हता, पावसाळा पावसाळा नव्हता. विनऋतुच्या त्या दिवशी श्रीधर गुहेतून बाहेर पडला. काळोखात धडपडला. टाचात तडफडला. श्रीधर हलू लागला. श्रीधर झुलू लागला. श्रीधर चालू लागला. चालता चालता ब्रह्मदेवापाशी पोहोचला. म्हणाला, ''ब्रह्मदेवा, हे असलं शरीर मलाच का रे बाबा?'' ब्रह्मदेव म्हणाला, ''हे मला माहीत नाही. देवाना कधी कारणं माहीत नसतात. माणसं माहीत झालेल्या कारणातून देव निर्माण करतात'' तर महाराजा साक्षात ब्रह्मदेवानंच तो इन्फर्मेशन टेक्नॉलॉजीचं बायप्रॉडक्ट आहे असं सांगितल्यावर करायचं काय? श्रीधर डिजीटली चालत राहिला. श्रीधर हेजीटेटली चालत राहिला. श्रीधर बीजिटली चालत राहिला. एकेठिकाणी त्याला आकाशातून फांद्या आलेल्या दिसल्या. फांद्या कुठून आल्या ते दिसेना. श्रीधरनं विचारलं, ''बायांनो आलात कुठून?'' फांद्या म्हणाल्या, ''मेगॅसुपरकम्प्युटरकडून ! हा कॉम्प्युटर कुणाला दिसत नाही. कुठे फसत नाही. कुठे बसत नाही.'' श्रीधरनं विचारलं, ''त्या मेगॅसुपरकम्प्युटरकडे माझं उत्तर असेल का?'' फांद्या म्हणाल्या, ''त्याच्याकडे उत्तर नाही असा प्रश्न नाही. त्याच्याकडे जवाब नाही असा सवाल नाही. त्याच्याकडे आन्सर नाही असा क्वेश्चन नाही. श्रीधरनं विचारलं, ''हे असलं शरीर मलाच का रे बाबा?'' फांद्या म्हणाल्या ''सन्नी ग्रहावर एकदा ब्लेड रनर्स जे रेप्लीकाज होते आणि ब्लड रनर्स जे हाडामासांचे होते ह्यांचं जुंपलं. ह्या युद्धात सगळे ब्लेड रनर्स आणि ब्लड रनर्स मारले गेले. वाचले ते फक्त दोन ब्लड रनर्स. सगळे रेप्लिकाज मारले गेल्याने जवळजवळ सगळी इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी मारली गेली आणि जे ब्लड रनर्स वाचले ते लहान होते. हे दोन ब्लड रनर्स पृथ्वीवर अवतरले तेव्हा पृथ्वी मागासलेली होती. हे दोघे सर्वात संपन्न म्हणून भारत वर्षात मायग्रेट झाले. तिथे त्यांनी आपण सन्नी ग्रहावरवरून आल्याचे सांगितले आणि इन्फर्मेशन टेक्नॉलॉजीविषयी ते पुटपुटत राहिले. त्यांनी ज्ञान हे सर्वांनाच उपलब्ध असायला हवे असे सांगायला सुरवात केली. ब्राह्मणांना ते धोकादायक वाटले आणि त्यांनी लोकांना ते मायग्रेट झालेले असल्याने त्यांना स्पर्श करू नका असे सांगितले. ते अस्पृश्य झाले. हळूहळू त्यांच्या शरीराच्या आत बसलेल्या चिपा डिकन्स्ट्रक्ट होऊ लागल्या. त्यांना मुले झाली. पण त्यांच्या शरीरात त्या चिपा आनुवंशिकतेने उगवल्या. पण ऑपरेट झाल्या नाहीत आणि मुलांना त्यांच्या मायग्रेशनचा आणि इन्फर्मेशनच्या मुळांचा विसर पडला. मात्र, ज्ञान सर्वांना मिळायला हवे हा आग्रह कायम राहिला. त्यांना प्रचंड अनुयायी भेटले. ब्राह्मणांनी त्या सगळ्यांनाच अस्पृश्य ठरवले. पिढ्यामागून पिढ्या गेल्या आणि श्रीधरचा जन्म झाला. त्याने अस्पृश्यता नष्ट व्हावी म्हणून घनघोर संशोधना सुरू केली. ही संशोधना एका अशा जागेतून चालली होती ती ब्राह्मणांना माहीत नव्हती. मात्र एलसायबोर्गला संशोधनाचे तेज कळाले आणि तो आपल्या श्रीधरला भेटायला आला. त्याने विचारले, ''बोल काय करू?'' श्रीधर म्हणाला, ''अस्पृश्यता नष्ट कर.'' एलसायबोर्ग म्हणाला, ''मी तर एक प्रोग्रॅम आहे. तुझ्याच पूर्वजांनी सन्नी ग्रहावर तयार केलेला आणि तुमच्या जनुकांशी कॉन्टॅक्ट असलेला मी काय करणार? सन्नी ग्रहावर आता एकही ब्लड रनर शिल्लक नाही आणि नुस्ता प्रोग्राम काहीच करू शकत नाही. माझी अवस्था अशी आहे की, मी जनुकामधून तुझ्याशी बोलू शकतो. पण उतरूही शकत नाही.'' श्रीधर म्हणाला, ''अस्पृश्यता हाही एक प्रोग्रामच आहे. वर्षानुवर्षे फीड केलेला. प्रोग्रामा विरुद्ध प्रोग्राम, डाटा विरुद्ध डाटा, डिजीटल विरुद्ध डिजीटल का लढू शकणार नाही? तू एका देवाचे रूप धारण कर आणि लढायला सुरुवात कर.'' एलसायबोर्गला हे पटले आणि त्याने लढाईला सुरुवात केली. हळूहळू स्वर्ग-नरक हादरू लागले, वेद गोते खाऊ लागले, इंद्राचं आसन डळमळीत होऊ लागले. कुणालाच कळेना हा कोणता नवा देव? इंद्र बृहस्पतीकडे आला. म्हणाला, ''गुरुदेव हा कोणता नवा देव? ह्याचा उद्देश काय?'' बृहस्पती म्हणाले, ''मी बोलून पाहतो.'' बृहस्पती डिजीटली चालत आले. त्यांनी गर्जना केली. ''बाय डिफॉल्ट जन्माला आलेला तू कोण आहेस? आमचं आख्खं सर्च इंजिन गिळणारा तू कोण आहेस? कृपा कर आणि कुठल्या तरी विण्डोमधून तुझं तोंड दाखव.'' एलसायबोर्गनं ते ऐकलं आणि फंगस लागलेल्या ब्लॅक मॅटरच मेन होल उघडून स्वतःच तोंड दाखवलं. बाय डिफॉल्ट जन्माला आलेले ते तोंड बघून बृहस्पती गॅलक्सीभर फुटत गेले. सूर्य विठ्ठलाच्या विटेवर अठ्ठावीस नक्षत्रे घेऊन रिऑलटीसारखा उभा राहिला. विश्वाच्या सगळ्या हालचाली क्युबीक झाल्या. बृहस्पतीने प्रोग्राम्ड डिजीटल वेद वाचले. पण हालचाली थांबेनात. उलट अक्षरे क्रिस्टल होऊन घशवात धूर ओकायला लागली. खुद्द देवांच्या गुरूची ही अवस्था बघून इंद्र पुष्पक विमान शोधायला लागला, पण ते मिळेना. मग इंद्राणीच्या बेंबीतून उगवलेले हेलिकॉप्टर कंट्रोल

करण्याची धडपड तो करू लागला. पण हेलिकॉप्टरची बेंबीशी जोडली गेलेली नाळ तुटेना. इकडे बृहस्पती क्वांटम वेगाने वेद म्हणू लागले. पण हालचाली थांबेनात. शेवटी बृहस्पती म्हणाले, ''देवराज सगळंच तर इमॅजिनरी आहे. मग आपण ही धडपड का करावी. आता जर मरायचेच आहे तर नीट मरू. शेवटी प्रत्येक प्रोग्राम कधी ना कधी तरी मरणारच.'' बृहस्पतीचे हे उद्‌गार ऐकून ब्राह्मण छात्या पिटू लागले. अनेक देव सोमरस पिऊन रियॅलिटीचा फिअर विसरू पाहू लागले. शेवटी बृहस्पतींच्या लक्षात आलं ही प्रोसेस अशीच राहिली तरआपण सगळेच वेस्टबीनमध्ये जाऊ. शेवटी ह्या जगात एकतर सगळं नेकेड असतं, नाहीतर फेकेड आणि नेकेड जेव्हा फेकेडसमोर उभा ठाकतं तेव्हा एक ना एक दिवस फेकेडला मरावंच लागतं. जर हा नवीन देव फेकेड असेल तर तह करता येईल. पण नेकेड असेल तर मात्र आपणही मरू. बृहस्पतींनी वेदांचे पठण थांबवले. त्याबरोबर सर्च इंजिनचा जबडा आ वासून ते बन्द पडले. थोडी शांतता निर्माण झाली. जणू काय आवाजाची मेमरीच नाहीशी झाली होती. त्यांनी ब्लॅक मॅटरवर आपले व्हाईट केमिकल पाय ठेवले आणि विचारले, ''हे युद्ध आपण असे किती वेळा रिसायकल्ड करणार? त्याने ही गॅलक्सी म्हणजे प्लॅस्टीकचा कचरा बनून जाण्याखेरीज हाती काय लागणार? त्यापेक्षा डिकोड हो आणि समोर ये तुढे हे स्टेरॉईडी तोंड असं ब्लॅक मॅटरमधून सतत काळं करण्यापेक्षा एखाद्या इन्स्टालेशनसारखा स्वतःचा सगळा देह माझ्या समोर मांड. आपण एकमेकांशी कनेक्ट होऊया. शेवटी जोपर्यंत माकड हे ऑर्गेनिक मॅटर म्हणून काम करतय तोवर माणूस आणि कॉम्प्युटर ह्यांच्यात फरक राहणारच. तेव्हा संपूर्ण डाऊनलोड हो ! आपण दोघे कल्चरली फ्यूज होऊन एक फ्युजन निर्माण करू. ज्याचे संगीत कनफ्युजनसारखे गल्ली गल्लीत वाजेल.'' एलसायबोर्गला क्षणभर काय करावे ते कळेना. अस्पृश्यता केवळ तह करून नष्ट होऊ शकते का? बरं ही माणसाची जात प्रोग्राम्ड एक करते आणि वागते वेगळीच. बृहस्पतीचं तरी ती ऐकेल ह्याची काय गॅरन्टी? त्याने स्वतःचेच खूप सर्फींग केले. पण वेबमध्ये काहीच सापडेना. अस्पृश्यतेचा प्रश्न त्याच्या प्लॅनेटवर नसल्याने कुठेच काही उतर नव्हते. त्याने डिजीटलचे सगळे डोळे उघडे केले. पण ते अस्पृश्यतेबाबत आंधळे निघाले. त्याने एकेका तंतूवर फायबर जम्पा मारल्या. पण पायाशी काहीच लागले नाही. सर्वत्र फळा मोकळा आणि चिन्हे अस्पृश्यतेबाबत मुक्त ! शत्रूच्या फायबरचा एकही तंतू नसताना त्याला घेऊन ह्या प्रोग्रामपुढे उभे रहायचे कसे? त्याच्याशी वाटाघाटी तरी कशा करायच्या? त्याची तहाची स्ट्रींग स्वीकारायची कशी? त्याने शेवटी चीप चीपांना चोप चोप चोपले. पण तिथेही काही मिळेना. शेवटी मग तो श्रीधरमध्ये डाऊनलोड झाला आणि त्याने विचारले, ''काय करायचं? श्रीधरला आपण सुपरसोल आहोत असा क्षणभर फील झाला. पण त्याकाळी बुटाला सोल नव्हते. त्यामुळे तो अनवाणी पावलानं जमिनीवर आला. शेवटी अस्पृश्यता ही त्याची आणि त्याच्या समाजाची समस्या होती. सत्री ग्रहावरचा एलसायबोर्ग प्रोग्रामचा पातळीवर लढला तरी माणसांची अॅक्चुअॅलीटी त्याला स्वतःलाच बदलावी लागणार होती. काय करावं हा खरोखरच प्रश्न होता. काही माणसे प्रोग्रामच एवढा अवाढव्य रचतात की तो हळूहळू सूक्ष्म अवकाशाही व्यापतो. अस्पृश्यता हा असाच काही माणसांनी रचलेला अवाढव्य प्रोग्राम होता आणि आता तो सूक्ष्म होत होत जनेटीकल झाला होता. त्याचे करायचे काय? श्रीधरला प्रश्न पडला. एक दिवस गेला. दुसरा दिवस गेला. शेवटी एलसायबोर्ग कंटाळून गेला. तो म्हणाला, ''मी तुला काही सुचेपर्यंत जाऊन येतो. तुझ्यात असाच डाऊनलोड राहिलो, तर माझी एक्सपायरी डेट विनाकारण आकुंचित होईल.'' एलसायबोर्ग आपल्या डिजीटल मुळात गेला. त्याबरोबर इकडे बृहस्पतीच्या रबरी डोळ्याचा बबलगम एकदम पूर्वी सारखा झाला. घश्यातला धूर थांबला. श्वास पुन्हा प्रेडीक्टेबल झाले. सगळ्या भारतवर्षाची जिऑग्राफी जैसे थे झाली. त्याच्या डोळ्यातून वाहणाऱ्या फिजीक्स केमिस्ट्रीच्या गंगा पुन्हा सरस्वतीसारख्या गायब झाल्या आणि त्यांच्यातून मनुस्मृतीचे श्लोक बंडल आवाजाने उमटू लागले. ब्राह्मणांना कळाले की, श्रीधरला शंबूकासारखे मारण्याची हीच वेळ आहे. त्यांनी देवांना प्रार्थना केली. ''देवांनो, आमच्या स्मृतींच्या मुळावर उठलेल्या ह्या नव्या शंबूकाला ताबडतोब यमसदनी धाडा.'' सोमरस पिलेल्या देवांनी ताबडतोब श्रीधरला मारण्यासाठी आयुधे परजली, पण कुठल्याच शस्त्राने श्रीधर मरेना. तेव्हा त्याला त्यांनी सदेह पाताळात नेले. बृहस्पतींच्या समोर उभे केले. बृहस्पतींनी सर्च इंजिन जे एलसायबोर्गच्या मुखातून उलटीसारखे बाहेर फेकले गेले होते ते ऑन केले. त्यांना कळाले की, ही सगळी किमया एलसायबोर्गच्या कनेक्शनची आहे. त्यांनी ते डिस्कनेक्ट करण्यासाठी हात घातला तोच मृत्यूची चाहूल लागलेला एलसायबोर्ग पृथ्वीवर आला. पृथ्वीचे अॅन्टीक जाळे धाडकन हालले. त्याने बृहस्पतीचा हात तोंडात घेऊन च्युइंगगमसारखा चघळायला सुरवात केली. सगळे देव क्षणभर डिफ्यूज झाले. बृहस्पतींनी पुन्हा क्युरेटिंग सुरू केले. करायचं काय हा नवा देव भलताच ताकदवान होता आणि श्रीधर हा त्याच्या अवतरण्याचा मिडीयम असल्याने तो मिडीयमचे प्राण पणाला लावून रक्षण करत होता. त्यांनी एकदम स्पायडरमॅनसारखी एकेक आकाशे चढायला सुरवात केली. आणि ते आठव्या स्वर्गात पोहोचले. तिथे अनेक अप्सरा बार्बीसारख्या नाचत होत्या. हा स्वर्ग सायबर स्वर्ग होता आणि देवानांही तो क्वचित दिसायचा. बृहस्पतींनी अप्सरांशी चॅटींग सुरू केलं. सगळे लाल स्क्रीन आता भरून गेले. अचानक एलसायबोर्ग हा शब्द लवसायबोर्ग असा दिसायला लागला. बृहस्पतींना प्रथमच आपल्या प्रोग्रामचा अभिमान वाटला. शेवटी एलसायबोर्गला अटकवण्याची 'की' त्यांना सापडली होती. ते म्हणाले, ''अप्सरांनो, माणसाने तयार केलेल्या परमसुखाच्या मांद्यांनो मी एक माणूस तुमच्या शयनगृहात आणून लपवतोय. त्याला तुमच्या भोगात लपवा इतका की तो कुठल्या प्रोग्रामलाही दिसता कामा नये. त्याला असा डिजीटल भोग द्या की तो रियॅलिटी विसरला पाहिजे. त्याच्या प्रत्येक जीनमधले टणक प्रोटीन टीनपॉट झाले पाहिजे. म्हणजे त्याचे एलसायबोर्गशी असलेले कनेक्शन तुटेल आणि तो डिफ्युज होईल. एकदा तो डिफ्युज झाला की, हे युद्ध आपण जिंकलेच म्हणून समजा.'' मग बृहस्पती पुन्हा थेट ब्लॅकमॅटरवर ऑन झाले. त्यांना पाहून एलसायबोर्गचे तोंड म्हणाले, ''तुमचे सगळे सुंभ आणि उपटसुंभ मी जाळले. पण तरी तुमचा पीळ जळत नाही. तुमचा चोथा केल्यावरच मरून तुम्ही कीर्तीरूपी उरणार काय?'' बृहस्पती काहीच बोलले नाही. त्यांनी फटाफट देवांना केबल्स टाकण्याची, स्क्रीन्स वाढवण्याची गुप्त सूचना दिली. एकाएकी सगळ्या जगाचा जुना स्पेक्ट्रमच बदलून गेला. काय होतंय ते कळायच्या आत सर्वत्र अप्सरांचे नाच दिसायला लागले. त्यांची डिजीटल मोहिनी मांसल वाटू लागली आणि पसरू लागली. एलसायबोर्ग त्यात गुंगून गेला. तोवर बृहस्पतींनी श्रीधरचा एक डिजीटल श्रीधर तयार करून रिअल श्रीधर उचलला आणि आठव्या स्वर्गाच्या आत त्याला पार ढकलला. आता श्रीधर रिअल होता आणि अप्सरा डिजीटल एक वेगळाच झोन त्याची वाट पाहत होता.''

★★★

These is nothing real and fake ! Our thinking makes it so. -William Sexpear

**अप्सरा फेक : १ ?** **शंकीत**

हे कम्युनिस्ट अस्तित्व.
वेगवेगळ्या संस्काराच्या भांडवलाची भांडी घासत
निर्माण करतंय कॅपिटीलस्ट्रीक व्हरायटीज.
हे-हृदय,
ज्याला अधिक प्रेमळ व्हायच आहे
हे डोकं,
ज्याला अधिक बुद्धिमान व्हायचं आहे
झणाणून गेलत
ही नाभी,
जिला काहीच व्हायचं नाही

फक्त असायचं आहे
घुंगटा ओढून स्तब्ध आहे
हा एकांत
गर्दीने भारलेला
हे एकटेपण
जे दुसऱ्याचा विचार करत बसलंय
अस्वस्थ आहे
बुद्धिमान व्हायचं असेल तर
प्रेम हृदयाचीच अनुमती मागतंय
प्रेमळ व्हायचं असेल तर
बुद्धी मेंदूचीच अनुमती मागतीये
'आत'
जो एक शब्द आहे मला ठाऊक असलेला मी जगलेलोच नाही.
परीघावरच फेक शेती करतोय
एक अप्रामाणिकपणा
जो जीवन सुंदर करू शकला नाही
वाट पाहतोय
मृत्यू सुंदर करण्याची
कसं शक्यय?
खरंतर मी विचार करत नाहीये
मी क्रोधिष्ट आहे.
मला स्वर्गात धाडल्याबद्दल
जो मी जाणतो डिजीटल आहे.
हे डिजीटल वेड मी फाडत सुटावे का?
ही डिजीटल उशी मी पिंजून सोडावी का?
स्वर्गाच्या सगळ्या पायऱ्या नरकातून उगवतायत
कदाचित मी लज्जित आहे, क्रोधिष्ट नाही.
मी काय आहे मला माहीत नाही
मी अनिश्चित आहे.
तीन क्षणापूर्वी माझं तुझ्यावर प्रेम होतं
दोन क्षणापूर्वी फक्त आसक्ती
आणि आत्ता ह्या क्षणी ह्या सगळ्याबद्दल फक्त शंका आहे.
कदाचित मी अनेक श्रीधरांची गर्दी आहे.
म्हणूनच कदाचित 'श्रीधर' म्हणून काही अस्तित्वात नाही.
तू एक घंटी वाजवतीयेस
तू मग कपडे काढतीयेस
आणि मी ताठ होतोय
तू एक घंटी वाजवतीयेस
तू मग कपडे काढतीयेस
आणि मी ताठ होतोय
आता तू फक्त एक घंटी वाजवतीयेस
आणि मी ताठ होतोय.
विचार जो श्वासाबरोबरच चालू शकतो.
श्वास जे विचाराबरोबर चालू शकतात.
आणि विचाराशिवायही
मी विचार बन्द करण्यासाठी श्वास बन्द करतोय.
मी बन्द करतोय,
दोन डोळे दोन कान दोन नाकपुड्या
आणि एक तोंड
स्वर्गाचे सगळे भ्रमिष्ट दरवाजे फोडत सात
माझा तिसरा डोळा उगवतोय माझ्या कपाळात
सूर्य माझ्यात उगवतोय, चंद्र माझ्यात मावळतोय.

आता नको वाजवू तुझी घण्टी
मला ती ऐकू येणार नाही
मी इकोतून मुक्त होतोय
मी ब्रह्मांड आहे
मी इकोतून मुक्त होतोय
मीच ईश्वर आहे

माझ्या शरीरावर जाऊ नकोस
तरीही इंद्राच्या सांगण्यावरून करणारच असशील
माझी हत्या
तर हे डिजीटल अप्सरे
मी मरणार नाही

तुझ्या स्वर्गाचा अंत जवळ आलाय
आणि माझ्या खऱ्याखुऱ्या बोटाचे नखदेखील
चिरंजीव होत चाललंय

★★★

डिजीटल डोही डिजीटल तरंग
डिजीटल अंग डिजीटलचे
काय सांगो बाई कळेना काहीही
आहे आणि नाही गोंधळात

**-संत डिज्याराम ऊर्फ डिज्या**

**अप्सरा फेक - २**

कामूक

ज्याला डाव्या अंगाने जायचय
तो उजव्या अंगाने जातोय
ज्याला नाही प्रेम
तो स्वतःस ऱ्हदयवंत म्हणवतोय
ज्याला उजव्या अंगाने जायचय
तो डाव्या अंगाने वाहतोय
ज्याला नाही मेंदू
तो स्वतःस बुद्धिवंत म्हणून नटवतोय
माझ्या हृदयात ना उष्मा
ना मेंदूत थंडी

तू अडकवतीयेस एक पेंन्टीग
ज्यात माझं डाकं गायब आहे
मी काळजानंच सगळं स्पर्शतोय
माझे हात नाहीत तुझ्या हातापर्यंत
माझं काळीजच तुझी बोटं चोखतय
माझे डोळे नाहीत तुझ्या डोळ्यापर्यंत
माझं काळीजच तुझ्या डोळ्यात वाकून
तुझं काळीज पाहतंय
कामरस आणि व्यत्ययत्रास
जो ऐकतोय तो पहात नाही
जो पाहतोय तो ऐकत नाही

जिची आई ब्रेस्ट कॅन्सरनं गेलीये
तिला स्तनांची भिती वाटतीये
जिच्यावर पित्यानंच बलात्कार केलाय
तिला पुरुषाशी बोलण्याची भिती वाटतीये
'मला स्वर्गात राहण्याचा कंटाळा आलाय'
'माझ्या प्रेमात कुणी पडला ना

की मी त्याला स्वर्गातून ढकलून देते
आणि मग मला अगदी मोकळं मोकळं वाटतं
अगदी संभोग करतानाही वाटत नाही इतकं''
'जो माझ्या प्रेमात नाही
त्याच्याच प्रेमात माझे पाय का रूततात''
'मी इंद्राशी भानगडी करते
कारण इंद्र मला इंद्रायणीसमोर
त्याचं माझ्यावर प्रेम नाही
हे दाखवण्यासाठी रग्गड मारतो''
तू बोलतीयेस आणि सुखावतीयेस
कामरस
काकणं हार पट्टा डुलं
वाजतायत आणि तू सुखावतीयेस -कामरस
छड्डी, पट्टा, पादत्राण, रक्तस्राव
तू वास घेतीयेस आणि सुखावतीयेस -कामरस
फळ मी फळ मी
बोलतीयेस आणि सुखावतीयेस -कामरस
खूपं दुखतं खूप वेदना
तू वेदना खोलतीयेस आणि सुखावतीयेस -कामरस
तू नरकाच्या आरश्यात
स्वतःचा स्वर्ग पाहतीयेस आणि सुखावतीयेस -कामरस
तू अस्पृश्य - कामरसाळ जाईजुई
त्याचं इतकं कसलं दुःख बाई
तुझी लक्षणं तुला ठीक दिसत नाहीत
जेव्हा ती सत्य बोलतात
''तुझ्यासारखा एखादाच ह्या आठव्या स्वर्गात
नाहीतर एकट्याच कामरस काढत
इंद्राची वाट बघत
बृहस्पती त्याला कधी ढकलतो
ह्याची प्रतीक्षा करत''
तू बोलतीयेस
तुझी लक्षणं खरं बोलतायत
क्रांती होत नाही
कारण क्रांती सुखाशी पॅच अप करते
तू बोलतीयेस
आणि पेंटींगमध्ये मला हळूहळू डोकं प्राप्त होतंय
तू बोलतीयेस
आणि माझं खरखुरं धड बिनडोक होतंय
हृदयाच्या उमलतायत शंभरेक पाकळ्या
बिनदेठी

**अप्सरा फेक-३**

1st Stage - दमन करणारे नंपुसक मन
IIIrd Stage - प्रेम पण अखंड मुक्ती.
-Dr. Lovely Sing

When She is in 'She'll he is in 'he'll

१.

आईपासून तुटून पडलोय
ह्या स्वर्गात
जो बापासारखा येतोय
आई आणि मी ह्यांच्या मध्ये मध्ये
हे अप्सरांचे सौंदर्य
हे बृहस्पतीचे ज्ञान
हे अस्पृश्यता पाळणारे ब्राह्मण
हे सगळे जे ह्या स्वर्गाला जबाबदार आहेत
ह्या स्वर्गातून गायब आहेत
स्पर्श ही माझी गरज आहे की मागणी की इच्छा?
माझ्यातल्या प्राण्याला
स्पर्शाची गरज आहे
जी त्वचेत आ वासून उभीय
गरज जी गर्मीत थंडी आणि हिवाळ्यात उब मागते
अस्पृश्यता म्हणजे मुलाला
आईपासून दूर लोटण्याचा कट
आई
जी स्पर्शातून वाहते
स्पशाई
दूध बन्द झाले की स्पर्श बन्द होतात
स्पर्श बन्द झाले की शब्द वाढत जातात
शब्द जे दुधाला रिप्लेस करतात
वेद तयार करतात
वेद जे दुधाला रिप्लेस करतात
अस्पृश्यता तयार करतात
वेद ऐकण्याची बन्दी
स्पर्श करण्याची बन्दी
जगणाऱ्यानं कसं जगाव
तुमच्या त्वचेखालून ब्रह्म वाहतं
आणि आमच्या त्वचेखालून काय ते वाहत नाही?
तुमचं ब्रह्महीं इतकं दुटप्पी?
आईला प्राप्त करावं म्हणून
काय काय करायचं?
गळ्यात मडकं बांधायच?
पाठीला झाडू बांधायचा?
शतकानुशतकं स्पर्शाऐवजी खातोय
हा डिजीटल स्वर्ग
आमची आयबोली देऊ शकत नाही
आम्हाला आमची स्पर्शाई
भाषा इतकी अगतिक कधीच नसेल कुठेही
तुमचा देवभाषेचा चोख बंदोबस्त
आणि आम्ही आमचा आय बोलीत अस्पृश्य उभे
आम्ही मागतोय स्पर्श
तुम्ही अस्पृश्य अंगानं पाणी पुरवताय
आम्ही मागतोय स्पर्श
मदरली
तुम्ही ढीगभर लाकडं फोडून घेऊन भाकरतुकडा घालताय
स्पर्श जी गरज होती
मागणी बनतोय प्रेमाची
आणि तुमच्याजवळ पुरवठाच नाही
प्राण्यांना गरज असते
माणसांना इच्छा
इच्छा जी भाषाधारी असते
इच्छा जी भाषेची भाग असते
भाषा जी अस्पृश्यता तयार करते
भाषा जी आमची प्रेम करण्याची इच्छा

दाबून टाकते
इच्छा जी भाषा आहे
आमची प्रेम करण्याची इच्छा दाबून टाकते
भाषा जी भाषेलाच दाबून टाकते
आई जी मुलालाच गळा घोटते
इच्छा म्हणजे अभाव
इच्छा म्हणजे स्पर्शाचा अभाव
अभाव जो तणाव निर्माण करतोय
इच्छा म्हणजे स्पर्श
जो हरवला आहे
इच्छा म्हणजे स्पर्शाची ती नदी
जी गुप्त झालीये
आणि जी आमच्या स्वप्नात
निरर्थक बडबडीत
फाफलणाऱ्या जिभेत
त्वचारोगांच्या लक्षणात
पुन्हा पुन्हा प्रकट होतीये
घेऊन आलीये स्वर्गात
मी स्वर्गात पोहचलोय
आता नदी प्रकटो अथवा न प्रकटो
मी पाण्याच्या पेकटात लाथ घालून
ते पृथ्वीच्या स्पर्शात
ढगाढगाने उतरवणार आहे.

२.

स्वतःचंच कामेंद्रिय
वेगळं काढून पहाण असं
जसं की ते दुसरं आहे
किती सवयीचं झालंय
मी डोकं आहे
आणि बाकीचे अवयव डोक्याचे उपअवयव
इतके डोकेबाजीत गुंतलेला मी
पोशाखही संपूर्ण नाही
एक वरल्या अंगाला
एक खाल्ल्या अंगाला
काळीज
समग्र होऊन प्रतिसाद देत नाही
डोकं ब्राह्मणाला
काळीज क्षत्रियाला
पोट वैश्याला
मांड्या शूद्राला
समाजसुद्धा शरीरात वाटणारे लोक
आसपास असे दारूण भरलेले
त्यामुळे मी असा
माझ्या वाट्याला तर अवयवच नाही
मग स्पर्शाची समग्रता
निर्माण व्हावी कशी?
मला अवयव नाही
म्हणून मला अस्पृश्य ठेवण्याची तोड काढलेली
तरी माझ्या सावलीपासून सगळे दूर पळतायत
सूर्य सगळ्यांनाच सावली बहाल करतो
त्याला सगळ्यांचाच नाईलाज
नाहीतर त्याचेही दोन भाग करून
हा खाल्ल्या अंगाला हा वरल्या अंगाला
असा बटवरा केला असता
प्रत्येक बाईवर नजर
माझ्या बरोबर झोपेल म्हणून
सात स्वर्गातल्या अप्सराही
माझ्या वाट्याला नाहीत
म्हणून मी आठव्या स्वर्गात
एका गठ्ठ्यात तुम्ही बांधता माझे लोक
जगण्याची संधी देऊन
माझ्या लोकांच्या जगण्याचीच सामूहिक हत्या करणारे हे षड्यंत्र
मनापुढे दोनच पर्याय असतात
कमी दुःख जास्त दुःख
तुम्ही तर जबरदस्तीने दुसरा लादला माझ्यावर
आणि मन नाहीसं करून निर्वाण प्राप्त करावं म्हटल
तर साधनेलाही मनाई
हलकटपणाचीही एक सीमा असते
आयुष्य ही माझी निवड नाही
ती एक सक्ती आहे
आसक्तीतून लादली गेलेली
पण मार्गाची निवड करण्याचं स्वातंत्र्य तरी होतेच की
तुम्ही नेमकं तेच बळकावलत
आताही जो स्वर्ग मी निवडलेला नाही
मी त्यातच पडून आहे
जी अप्सरा येणार आहे
तीही आहे डिजीटल
म्हणजे इथेही तुमच्या बायका
माझ्यापासून स्पर्शाच्या अंतरावरच

३.

डोकं ठिकाणावर ठेवून
तुझी वाट पाहतोय काळजात
डोक ठिकाणावर ठेवून
अस्पृश्यतेत जाऊन येतोय
आणि डोकं बाजूला काढून ठेवून
तुझ्या डिजीटल स्पर्शात उतरतोय
एलसायबोर्ग पोहचत नाही
तोवरचा टाईमपास
तू येतीयेस
आणि आत्ता मलाही न सांगता
माझं शिर
धडापासून वेगळं होतंय
डोक वेगळं झालं की ऱ्हदय तीव्र होतं
स्पर्श उकळायला शिकतं
मी त्वचाच झालोय
आता टाचणी मार की टोचणी
रिझल्ट एकच आहे
माझं पोट विचार करतंय
तुझ्या पोटाचा
तू आरश्यासारखी समोर उभी
आणि त्यात माझं बिनडोक प्रतिबिंब

माझ्या वेडेपणाची ही सुरवात आहे
की हृदयाच्या जागरणाची?
ब्राह्मण पलंगावरही ब्राह्मण असतो
क्षत्रिय क्षत्रिय
वैश्य वैश्य
शूद्र शूद्र
आणि अस्पृश्य अस्पृश्य
जोवर तो डोकं घेऊन पलंगावर हिंडतो
काळीज कुठलाच प्रोग्राम फीड करून घेत नाही
म्हणूनच प्रेम प्रेम असतं
काळजाला जातीव्यवस्था नसते
व्यवस्थाच नसते
डोक्याच्या पायऱ्या उतरून
काळजाच्या तळघरात येणं
किती कठीण
मी बिनमजली तुझ्यासमोर उभाय
डोकं दुनियेला मजल्यात वाटतं
आणि काळीज सगळ्या फाळण्या जोडून
तिला एक करतं
तू भोजन मांडतीयेस किती प्रेमानं
आता मीही भोजनाची हत्या करत
जेवणार नाही
जे जेवेन ते कृतज्ञतेने जेवेन
मी जेवतोय
अन्नाला हात जोडून मी जेवतोय
जेव्हा ब्राह्मण सगळ्याचं डोकं
आपल्या डोक्यात गहाण ठेवून घेतो
तेव्हा ईश्वर काळजातून चालत येत
भक्तीची वाट मोकळी करतो
मी जेवतोय
आणि पोटातून काळजातली काही सत्यं
मला थेट दिसतायत
मी गडगडत खाली येतोय
माझं लिंग उमलतय
आणि माझ्या स्पर्शाचा पिसारा
सगळ्या अस्पृश्यतेला ओलांडून
तुझ्या स्पर्शास्पर्शात
थुईथुई नाचतोय
आनंदाच्या समग्र पावसाळी ढगात

### मर्द बनवणारी अप्सरा फेक - ४

लोग जो टांगों के बिचसे सोचते है
मध्यमे नही होते

-Lord Gautam Wiseman

परंपरा ही माणसाची तो जन्मतो तेव्हा गरज असते. त्याच्या आसपासचे जग अवाढव्य असतं आणि तो असहाय्य असतो. अश्यावेळी परंपराच त्याला ह्या जगाशी कसा सामना करायचा कसं जगायचं ते शिकवते. पण मग एकवेळ अशी येते की, त्याच्या लक्षात येते की परंपरा ही फक्त आपली नाही तिचे अनेक प्रियकर आहेत आणि तिचे हे प्रियकर तिला हवे तसे नाचवतायेत. माणसाला तिचे हे सगळे प्रियकर बापासारखे वाटायला लागतात. त्यातूनच परंपरेवर सतत अवलंबून राहण्याचा आणि वाट बघत अगतिक होऊन राहण्याचा संयम संपायला लागतो. परंपरा नेमकं काय पुरवती ह्याचा त्याला अंदाज घ्यावासा वाटतो आणि मग तो परंपरेकडे अशक्य गोष्टी मागायला लागतो. ह्याचवेळी तो तारुण्यात प्रवेश करतो आणि त्याची कामवासना जागी व्हायला लागते. त्याला आता परंपरेबरोबर झोपावसं वाटायला लागतं. पण परंपरेच्या प्रियकरांना हा नवा प्रियकर नकोसा वाटायला लागतो. 'बघता बघता वयात आलेलं हे पोर' त्यांना आता प्रतिस्पर्धी वाटायला लागतं. ते त्याला अडथळा आणू लागतात. एकीकडे वाढत चाललेल्या त्याच्या स्वतःच्या आंतरिक मागण्या दुसरीकडे प्रियकरांनी आणलेले अडथळे ह्यांच्यात संघर्ष सुरू होतो. अशावेळी प्रियकर दोन पर्याय निवडतात. त्यांच्या लक्षात येतं की हा ज्या मागण्या करतोय त्याच्या मुळाशी भाषा आहे, ज्ञान आहे ते मग त्याची हत्या करतात आणि त्याच्या शारीरिक मुलांना त्याच्या पिढ्यांना वर्षानुवर्षे भाषेपासून आणि ज्ञानापासून वंचित ठेवतात. अस्पृश्यता ही वंचित ठेवण्याची एक शास्त्रीय पद्धतशीर खेळी असते. ही खेळी माणसाच्या गरजा पूर्ण करते. त्याला जिवंत ठेवते. पण त्याच्या आत 'मागणी' निर्माण होणार नाही ह्याची अतोनात काळजी घेते. मग एक संपूर्ण मानवी समूह फक्त 'गरजे'त गुंतून पडतो. मागणी निर्माण करण्यापेक्षा आपली ह्या परंपरेच्या प्रियकरांना सतत 'गरज' वाटेल अशी काळजी घेतो. गुलाम माणसाची ही मानसिकता त्याला बंड करू देत नाही. मग क्वचित एखाद्या शतकात एकजण असा जन्मतो ज्याला कुठून तरी अशी भाषा असे ज्ञान प्राप्त होते की त्याच्या गरजा मागणीत रूपांतरित होतात. परंपरेच्या प्रियकरांना दाद न देता तो परंपरेकडे मागणी करत राहतो. त्याला खरे तर परंपरेवरच अवलंबून असणंच संपवायचं असतं. त्यामुळे त्याच्या मागण्या ह्या अनेकदा अशक्य मागण्याच असतात. मग तो विचार करतो की परंपरा मला काय हवं ते पुरवत नाही. त्यामुळं मी आता तिच्यावर अवलंबून राहता कामा नये. मी आता स्वतंत्र झालं पाहिजे आणि तिला काय शक्य आहे ते पाहण्यापेक्षा मला आता काय करणं शक्य आहे ते पाहिलं पाहिजे. मग तो हळूहळू मागण्या करण्यापेक्षा आपल्या नेमक्या इच्छा काय आहेत त्या इच्छाचं स्वरूप काय आहे ते पहायला लागतो. त्याच्या ह्या इच्छा परंपरेच्या इच्छेपेक्षा वेगळ्या आहेत हे तो ओळखायला लागतो. ह्या इच्छा त्याच्यात एकाचवेळी स्वातंत्र्य आणि फ्रस्टेशन निर्माण करायला लागतात. त्याच्या ह्या स्वातंत्र्याला आणि फ्रस्टेशनला पुरेसा प्रतिसाद परंपरेने दिला आणि त्याप्रमाणे स्वतःत बदल घडवून आणले तर ठीक असते, अन्यथा मग तो फ्रस्टेशनमधून बाहेर पडण्यासाठी आख्ख्या परंपरेतून बाहेर पडतो आणि आपल्या स्वातंत्र्याचा उपभोग पडताळण्याठी आख्खी परंपरा ठोकून ठोकून पडतळायला बघतो. त्यातून त्याच्या स्वातंत्र्याला मदत करणारं जे मिळेल ते तो स्वतःचंच म्हणून मिरवतो आणि ते त्याच्या स्वातंत्र्याला बाधा आणतं ते तो नष्ट करायला बघतो इथूनच परंपरेशी युद्ध सुरू होतं इथेच नवतेचा जन्म होतो.

मी स्वतःचच आत्मविश्लेषण करत बसलोय
माझं स्वातंत्र्य माझ्या पराजयानं संपुष्टात आणलंय
आणि मी माझं हरलेलं अस्तित्व भोगत
ह्या स्वर्गात
माझ्या गरजा नाहीशा झालेल्या नाहीत
फक्त हा स्वर्ग त्या आपोआप पुऱ्या करतोय
म्हणून मला त्या जाणवत नाहीयेत
माझ्या मागण्या निरंतर त्याचे डोळे इच्छेवर खिळवून आहेत
त्या माझ्या इच्छा मरू देत नाहीत
मागण्या आहेत तोवर प्रेम आहे
प्रेम आहे तोवर मी वाचण्याची शक्यता आहे
ह्या मागण्याच ज्या पुऱ्या होत नाहीत, इच्छा होतायत
मरणाऱ्या इच्छांच्या जागा घेतायत
स्वर्गात ही कठीण असतं अस्पृश्य माणसाचं आयुष्य
इथेही त्याच्या दुःखाचा पाचोळा अंगभर वाजतच असतो
ज्यांना इच्छाच कळत नाहीत
ते गुलामीच्या अर्धवट झोपेतच बरळत जगतात

आपण एकमेकांच्या मागण्या
एकमेकांकडं नोंदवतोय
आणि प्रेम शाबूत राखतोय
अप्सरा असलीस म्हणून काय झालं
शेवटी तू सुद्धा एक प्रोग्रामच आहे
अस्पृश्यतेसारखा
जो मला डीकोड करायचाय
मी प्रेम करतोय
आणि तू टप्प्याटप्प्याने डीकोड होतीयेस
माझ्या आसपास असणारी वामनाची तटबंदी
ती मात्र कोसळून पडत नाहीये
कदाचित तीही पूर्वी डिजीटल होती
आता रिअल झालीये
प्रत्येक डिजीटल कधीतर रिअल होतं
अस्पृश्यतेसारखं
म्हणून तर डिजीटलचा बंदोबस्त करण्यासाठी
मी पुकारलं एक सर्वंकष बंड
प्रत्येक जण स्वतःचा मालक असतो
गुलामी सुरू होते तेव्हा
जेव्हा बाहेरचं काहीतरी आवश्यक बनतं
अन्न, कपडे, निवारा
शरीरात तयार होत नाहीत
म्हणूनच त्यांच्या गरजा तयार होतात.
संन्यास म्हणजे गुलामी न पत्करता
गरजा भागवणं
आणि भागत नसतील तर गुलामी न पत्करता
मरण पत्करणं
संन्यास ही बंडाची पहिली कृती आहे
प्रेम
ज्याची कधीच पूर्ण पूर्ती होत नाही
प्रेम
जे कितीही उपसलं तरी संपत नाही
प्रेम
जे प्रत्येकाला हवं असतं.
आणि जे हवं असं प्रत्येक क्षणी सांगताच येतं असं नाही
प्रेम
ज्याच्याविषयी काहींना बोलताच येत नाही
प्रेम
जे काही ठिकाणी करताच येत नाही
प्रेम
जे सगळीकडं असतं
तरीही सगळीकडं भोगता येत नाही
प्रेम
जे आयुष्यात काहीतरी 'नाही'
त्याची ठळक खूण असतं
अवतरतय
आनंद
ज्याच्या अनेक शक्यता असतात
आनंद
तुझ्या शब्दातून माझ्या शब्दात
तुझ्या वक्षातून माझ्या वक्षात
तुझ्या ठराविक सुवासातून माझ्या ठराविक केसात
तुझ्या केसातून माझ्या सुवासात
तुझ्या योनीतून माझ्या लिंगात
तुझ्या डाव्या बाजूला निजलेल्या कुत्र्यातून
माझ्या उजव्या बाजूला झोपलेल्या कुत्र्यात
तुझ्या उजव्या अंगाला असलेल्या मांजरातून
माझ्या डाव्या बाजूला असलेल्या मांजरात
तुझ्या गोलाकार चेहऱ्यातून माझ्या चौकोनी चेहऱ्यात
तुझ्या प्रतिसादी आवाजातून माझ्या निनादी आवाजात
आनंद
जो ठराविक खुट्ट्यांनाच टांगून ठेवण्याची सक्ती केली जातेय
तुझ्या माझ्या सेक्समधून सगळे निश्चित अर्थ उद्ध्वस्त करत
सरकतोय - झोके घेतोय
माझं असहाय्य बालपण
जे अनिश्चित अर्थानि कोलाहलात वाढलं
पुन्हा परततय
अर्थ निश्चित करणाऱ्या भाषा मोडीत काढत
माझं अनिश्चित बालपण
जे अर्थ निश्चित करणारी भाषा
चमत्कारासारखं शिकलं
आणि मग आयुष्यभर ती भाषा
अनिश्चित करत राहिलं
परततय
वाक्यं अनंत आहेत
म्हणूनच वेदांचा मृत्यू निश्चित आहे
अस्पृश्यतेचा अंत निश्चित आहे
आपला प्रत्येक संभोग
किमान चार नवीन वाक्य शोधून काढतोय
जी वेदात नाहीत
जी भाषेत नाहीत
म्हणूनच संभोगाला व्याकरण नाही
संग करणं
म्हणजे भाषा अनिश्चित करत जाणं
शिक्षण
जे व्याकरण निश्चित करतं
दबावणूक आणतंय
दबावणूक जी अडवणूक आणतीये
आविष्काराठी आवश्यक असतं व्याकरण
ते ताटकळतय
आणि मी त्याच्या ताटाखालचं मांजर न होता
हा पाट लावतोय
अविष्कार आणि मुस्कुटदाबी
एकाच नाण्यातून
खणखण आवाज करत
तुझ्या माझ्या त्वचेतून चालतायत
जितकी मुस्कुटदाबी वाढतीये
तितकाच अविष्कार उत्कट होतोय
जितके रक्त आधिक सांडतेय
तितके हृदय जवळ येतंय
जे भव्य आहे
त्यात मी मिसळतोय
पण ते भव्यच जेव्हा मला अल्पसंख्याक ठरवतं
तेव्हा मी सगळ्या अल्पसंख्याकांबरोबर मिसळून
त्या भव्यतेविरोधात उभा ठाकतोय

वागणूकच नागड्याची वागणुकी विरुद्ध शरीरं एक करतंय
मुस्कुटदाबी अती होतीये
तुझ्यात एक आघातावस्था धडकती
मुस्कुटदाबी कमी पडतीये
माझ्यात एक नपुंसकावस्था उमलतीये
समतोल साध
मला मर्द कर
इच्छा भाषा होतीये
भाषा कुणाचीच खाजगी मालमत्ता नाहीये
ती वापरणाऱ्या सर्वांचीच बनतीये
म्हणूनच माझी इच्छा सगळ्यांची इच्छा होतीये
सगळ्यांना मर्दकर
माझ्या इच्छा वैयक्तिक नाहीयेत
त्या तशा भासतायत
ज्या वैयक्तिक राहतायत
त्या भाषेच्या अलिकडेच थांबतायत
दुसरी भाषा शोधत
जी स्वप्नात
स्वप्नातल्या स्वर्गात
वेडगळ बडबडीत
फुकाच्या मज्यामारू विनोदात
तयार करत स्वतःला
प्रकटतीये
तुम्ही मला जो बनवू इच्छिता
तो मी होणार नाही
तुमच्यापासून मी वेगळा उठून दिसेन
तुम्ही जिथे गरीब असाल
तिथे मी श्रीमंती मागेन
तुम्ही जिथे श्रीमंत आसाल
तिथे मी संन्यासी होईन
तुमच्यापासून वेगळा उठून दिसेन
मी चाललोय तुझ्या शरीरातून
वेगळा होण्यासाठी
दुसरी भाषा शोधत
तू कदाचित एक कल्पना असशील
हा स्वर्ग कदाचित कल्पना असेल
पण तो माझ्या इच्छा जिवंत ठेवतोय
अप्सरा
ज्यांना खुलेआम सगळ्यांसमोर नाचावं लागतं
अप्सरा
ज्यांना सर्व सार्वजनिक जागात
पुरुषांशी संग करावासा वाटतो
अप्सरा
ज्यांना इंद्राच्या दरबाराची
सर्व सार्वजनिक जागांची भिती वाटते
मी सगळ्याच अप्सरांना तुझ्यातून भिडतोय
स्वर्ग
जो माझी मूलभूत कल्पना आहे
वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या कल्पना लढवत
अवतरतोय
स्वर्ग
जो पृथ्वी बदलू शकतो
स्वर्ग
जो अस्पृश्यता नाहीशी करू शकतो
बायका
ज्या ब्राह्मण आहेत, क्षत्रिय आहेत, वैश्य आहेत, शूद्र आहेत
डिजिटल करून
मी नाचवतोय स्वर्गात
बायका
ज्यांना स्पर्श करण्यास मनाई आहे
ज्यांना आमच्यापासून मुले झाली
तर अस्पृश्यता नष्ट होऊ शकते
बायका
ज्या त्यांच्या मुलांच्या आमच्या मुलींशी लग्न करायला
स्वखुशीनं अनुमती देतील
आणि अस्पृश्यता नष्ट करतील
अप्सरा होतायत
तुझ्या ह्या आठव्या स्वर्गातून
मी निर्माण करतोय नववा स्वर्ग
जो माझ्या इच्छा जिवंत ठेवतोय
जे डिजीटल असतं ते कधीतरी रिअल होतं
अस्पृश्यतेसारखं
जे आत्ता डिजीटल आहे तेही कधीतरी रिअल होईल
आणि मग सगळंच कसं स्पृश्य होऊन जाईल.

"वेश्यालयात श्रीधर नावाचा एक कवी होता. त्याला सगळेच अगदी वेश्याही अस्पृश्य मानत. त्याचा स्पर्श कुणाला चालत नसे. स्पर्श न मिळाल्याने तो अगदी वेडापिसा होई. एक दिवस त्याला अचानक एक दृश्य दिसलं.

एक क्षत्रिय अगदी म्हातारा होऊन पडला होता आणि त्याला आधाराची गरज होती. आधार द्यायला एक वैश्य पुढे सरकला, तर क्षत्रिय म्हणाला, "वैश्यांचा आधार घेण्याइतपत मी अजून म्हातारा झालेलो नाही." ते ऐकून वैश्य चरफडत निघून गेला. शूद्र आसपास होते, पण जिथे वैश्यांची म्हाताऱ्यानं बोळवण केली होती. तिथे आपला काय पाड लागणार ह्या विचारानं ते गप्प राहिले. एखादा तरी क्षत्रिय येईल म्हणून ते वाट पाहू लागले. पण दुसरा क्षत्रिय येईना. शेवटी तो म्हातारा तिथेच तडफडून मेला.

श्रीधर हे बघत बघत पुढे गेला तर तिथे त्याला आणखी एक दृश्य दिसले.

एक वैश्य आजारी पडल्याने रस्त्याच्या कडेला पडला होता. अंगावरून माश्या उडत होत्या. आसपास सगळे शूद्र होते. ते त्याला म्हणाले, "सेठ, तुमच्या जातीचा कुणी येईल असं दिसत नाही. तेव्हा आम्हीच इस्पितळात घेऊन जातो." वैश्य कडाडला, 'मी इथे ह्या आजारात तडफडून मरेन, पण मला तुम्हा शूद्रांचा स्पर्श नको." शेवटी तो वैश्य तडफडून मेला.

श्रीधर हेही बघत पुढे गेला, तर तिथे आणखी एक दृश्य दिसले.

एका शूद्राचे प्रेत गावकुसा पडले होते आणि अस्पृश्य ते उचलत नव्हते.

श्रीधरनं विचारलं, "तुम्ही त्याला स्मशानात न्हेऊन का जाळत नाही?" तसा एक अस्पृश्य म्हणाला, "शहाणाच दिस्तो की रं तू, आर ह्येच्या अंगाला निस्ता हात लावला तरी आख्खं गावकूसं जाळतील शूद्र. त्येनीच ह्येला वाळीत टाकलंयएका बामणाच्या आदेशावरून ! सडू दे इथंच."

मग श्रीधरनं त्याला उचलाय हात घातला तसे सगळे अंगावर आले.

"आर येडा का तू ? तू उचलशील आणि जाशील, पण गाव समजल आम्हीच उचललाय....आल्या वाटंन जा....तरास नग वाढवू."

श्रीधर बऱ्या बोलानं वेश्यालयात आला. रात्री तिथं मेलेल्या क्षत्रियाचा थोरला मुलगा आला. त्यानं ना स्वतःची जात सांगितली ना वेश्येची जात विचारली. संग करून पितामृत्यूचं दुःख विसरून निघून गेला. मग मेलेल्या वैश्याचा भाऊ आला. त्यानं ना स्वतःची जात सांगितली ना वेश्यचे जात विचारली. भावाच्या मृत्युचे दुःख विसरण्यासाठी संग करून तृप्त होऊन निघून गेला. मग मेलेल्या शूद्राचा बाप तिथं आला. त्यानं ना स्वतःची जात सांगितली ना वेश्यचे जात विचारली. मुलाच्या मृत्यूचं दुःख विसरण्यासाठी संग करून तृप्त होऊन निघून गेला. तेव्हा श्रीधरला लक्षात आलं, जर ह्या वेश्यालयात

लोक जात विसरतात तर एक दिवस संपूर्ण समाजातच ती विसरली जाईल. हे वेश्यालय जातीवर्णवर्ग भाषा मुक्त स्वर्गाची पूर्वखूण आहे. त्याने त्या पूर्वखुणेला त्यातून उद्‌भवणाऱ्या स्वर्गाला नमस्कार केला आणि त्याला स्पर्श न करणाऱ्या त्या वेश्यालयाला कायमचे माफ केले.''

मी प्रवास करतोय त्या स्वर्गातून
जो मला वेश्यालयात सुचला
तू मला आत्ताच हवीयेस - जशी आहेस तशी - ये
मग फार काळ थांबू नकोस
जास्त थांबशील तर
स्वर्ग निर्माण करण्याची माझी इच्छा कंटाळवाणी होईल
पण एकदम नाहीशीही होऊ नकोस
तुझ्याविना स्वर्ग निर्माण करण्याची माझी क्षमता नाहीशी होईल
येताना अतिजवळीक नको
जाताना अतिदुरावा नको
ये
समतोल साधत ये
आणि मर्द कर
जो बरोबर

मधोमध
असेल

**अप्सरा ५ फेक**

वरच्या पायऱ्यावरचे 'मज्या' मारतायत
खालच्या पायऱ्या 'ज्याम' करून

१.
ब्राह्मण
जो शाकाहारी आहे
सिंहाचा अवतार घेऊन
शास्त्रसंमती घेऊन माणूस फाडून खातोय
क्षत्रिय
जो मिश्राहारी आहे
युद्धाचा अवतार घेऊन
माणूस फाडून खातोय
वैश्य
जो मिश्राहारी आहे
व्यापाराचा अवतार घेऊन
माणूस फाडून खातोय

शूद्र
जो मिश्राहारी आहे
जो गायीला मारत नाही
कारण ती शेतीला आवश्यक बैल पुरवते
शेती करता करता
माणूस फाडून खातोय

माणूस
जो खाल्ला जातोय
अवर्ण आहे
ज्याला स्पर्श झाला की विटाळ होतो
विठ्ठल आणि विटाळ ह्यांचा एकत्रच टाळ कुटत
ही संस्कृती
जी माणसांना एकमेकाच्या ताटात वाकू देत नाही
बिनधास्त
माणूस फाडून खातीये
आणि ताट जे समग्र आणि अदृश्य आहे
तिला अलौकिक आनंदानं
माणूस पुरवतय

२.
हे अन्न रहस्यमय आहे
ते बाहेरून आत येत
थेट माझ्या चेतनेला मिळतंय
हे अन्न रहस्यमय आहे
जे माझ्या इंद्रियांना पाठपोठ बाळगत
थेट पदार्थाला मिळतंय
अन्न जे अंतिमतः एकच आहे. माझ्या पोटात वेगवेगळ्या पक्वानात अवतरतंय
अन्न जे अंतिमतः एक आहे.
माझ्यात वेगवेगळ्या समाध्या लावून
मोक्षाला पेलतंय
डोळ्यांचे दरवाजे हलतायत
आणि अन्न स्वतःशीच उघडझाप करत
द्रष्ट्यासारखं उभं आहे
विचारांचे ढग बाहेरून कोसळतायत
हा विचाराचा पावसाळा बाहेरचा आहे
माझ्या आत एक बिनऋतुचं झाड आहे
जे चोवीस तास चेतनेची हमी देणारं फळ
उगवण्याची वाट पाहतय
चेतना
पाठलागाकडे पाठ करून निसटून जातीये
आणि आसक्ती
सुखाचा विचार करत शिकाऱ्यासारखी
चेतनेचा पाठलाग करतीये
मजा आपोआप वाटण्यात आहे
फळात नाही
फळ बोलतय
पण ते ऐकणारे कान
माझ्या पानात नाहीयेत
मला कळतय
वासना घेण्यात आणि प्रेम देण्यात आहे
मी तुला वासनेनं पाहतो तू वस्तू बनतेस
मी वस्तूंना प्रेमानं पाहतो त्या तू बनतात
तू प्रेमानं पाहतेस
आणि मला चिकटलेलं गर्दीचं कवच
गळून पडतं
मी 'मी' होतो
प्रेम दाटून येतंय
मी आख्ख ब्रह्मांड तुला देऊ पाहतो
आणि प्रार्थनेखेरीज मला काहीच करता येत नाही
माझ्या ह्या असहाय्यतेचं मी काय करू
मला दुसरा पाहतो मी वस्तू बनतो
मी दुसऱ्याला मला पाहताना पकडतो तो वस्तू बनतो
एकमेकाला केवळ बघत
आपण दुसऱ्यासाठी नरक बनत
कुठं जातो?
मी प्रेमानं तुला पाहीन - तू तू बन
तू मला प्रेमानं बघ - मी मी बनेन
मग आपलं पाहणं

एकमेकांसाठी स्वर्ग बनवेल
ये
वासनेपासून वाचण्यासाठी बनवलेले कपडे उतरव
प्रेम नग्नतेला सुंदर बनवतंय
मला नग्न कर
वासना नग्नतेलाही वस्तू बनवते
प्रेम कपड्यांनाही व्यक्तिमत्त्व देतं
ये
मला अन्न करून पचवून टाक
स्वतःला अन्न बनवून माझ्यात नाहीशी हो
ये
अन्नाचा फळफळाट कर
फळ
फळव

३
मी स्पर्शाचं भाषांतर तुझ्या त्वचेत करतोय
मी अन्नाचं भाषांतर तुझ्या कायेत करतोय
मला एक अशी स्त्री हवीये
जिला मी अप्सरेत भाषांतर न करता
फक्त स्त्री म्हणून ओळखेन
मला एक अशी स्त्री हवी
जी माझ्या त्वचेवरची ढगळ अस्पृश्यता
भाषांतर न करता
थेट माझ्या माणूसपणाची अढळ माया
माझ्या स्पर्शात वाचेल
माणसं
समोरच्यांना कशात ना कशात रुपांतरित करून
त्या कशा ना कशावर प्रेम करतायत
जे त्या माणसात उपस्थित आहे
असं त्यांना वाटतंय
माणसं
जे प्राप्त करू शकत नाहीत
त्या अप्राप्याला माणसात रूपांतरित करून
त्या अप्राप्याला त्या माणसातून प्राप्त करतायत
मी
जो स्वर्गातही दुसऱ्या स्वर्गाच स्वप्न पाहतोय
जो माझ्याजवळ नाहीये
मी तो दुसरा स्वर्ग आहे
जो माझ्याजवळ नाहीये
जो कदाचित माझ्या मृत्यूबरोबर नाहीसा होईल
जो कदाचित मरतानाही माझ्यात पुटपुटत राहील
मला तुझ्याविषयी सहानुभूती वाटतीये
कारण मला माझीच दया येतीये
मला माहीतीये
मी तुला प्राप्त करूच शकत नाही
मी फक्त माझ्याविषयी तुझ्यात असलेल्या प्रतिमांना
प्रतिसाद देऊ शकतो
ज्या मी आहेत
आणि तरीही ज्या तुझ्याच मालमत्ता आहेत
मी - जो तुझ्यात आहे
दुसराच आहे
जो मला तुझ्याइतकाच अनोळखी आहे
भाषा आपल्याला ओळख देतीये
आणि एकमेकांपासून वेगळंही करतीये
आपल्या देहबोली भिडतायत
आणि देह एकमेकाविषयी अनभिज्ञच राहतायत
देहबोली त्या देहाविषयी बोलतायय
जो स्वतः दुसऱ्याच देहाची देहबोली आहे
स्वर्ग फक्त मेलेल्याच खाऊ शकतात
त्यांना जिवंत माणसाचं काय करायचं ते कळत नाही
म्हणूनच स्वर्ग
फक्त भाषेमध्ये शिल्लक राहतायत

तू
स्वर्गाचे सातही दरवाजे सताड उघडून
निघून गेलीयेस
आणि मी स्वर्गाच्या शंभर खिडक्या सताड उघडून
तुझ्या भाषांतरित झालेल्या सुग्रास सुगंधाचा पाठलाग करत
माझ्यातील तुझ्यापुढं
माझं नाक घासतोय

★★★

अप्सरा ६ रिअल की डिजीटल?

Woman and Waman are contra dictory to each others. What Waman destroys by his feet is recreated by Woman thtrough her womb

**-Shahi Woman Kardak**

अप्सरा म्हणाली, ''नदीचं मूळ आणि ऋषीचं कूळ विचारू नये असं म्हणतात. म्हणून मी तुझं कूळ विचारू नये, पण तुझं कूळ अस्पृश्य आहे म्हणून तर तुला ऋषी होण्यास मनाई आहे आणि नदीचं म्हणशील तर त्या आम्ही स्वर्गातून पाठवल्यात अशा अफवा आम्हीच हवेत सोडून दिल्या आहेत. नाहीतर एखाद्यानं मूळ शोधायचंच ठरवलं तर ते अशक्य नाही.

श्रीधर म्हणाला, ''हे अप्सरे, अशी वक्र बोलू नकोस जे बोलायचं ते स्पष्ट बोल.''

अप्सरा म्हणाली, ''मला तुझी कथा ऐकायची आहे. स्वर्गात 'स्वर्ग नरक, देव, वर्ण, जात, वेद, श्रुती स्मृती पुराण नष्ट करावयास निघालेला खलनायक'' एवढीच तुझी ओळख आहे. तुला मदत करणाऱ्या राक्षसाचं तर नावही धडपणे कळालेलं नाही. सायबोर्ग हे नाव तर आमच्या हिंदू स्वर्गात आढळत नाही. ते कदाचित ख्रिस्ती स्वर्गात आढळेल म्हणून आमचे काही देव तिकडं गेलेत. तेव्हा तूच का हे रहस्य खोलत नाही.

श्रीधर म्हणाला, ''तू काय बोलतीयेस ते मला कळतय, पण मी माहिती देणार नाही. हे युद्ध माहिती युद्ध आहे. माझ्याविषयी मी तुला एककथा सांगतो. ऐक-

माझा जन्म करवीरनगरीत 'मनाई' चटईक्षेत्रात एक माणूस म्हणून झाला. माझे वडील चप्पल तयार करण्याचे काम करीत आणि लोक त्यांना चांभार म्हणत. ब्राह्मणांच्या नादी लागून क्षत्रिय वैश्य शूद्र आम्हाला अस्पृश्य मानत आणि आमची सावलीही त्यांच्यावर पडलेली त्यांना चालत नसे. मला नेहमीच प्रश्न पडे. सूर्य तोच, माणसे तशीच, सावल्या तश्याच मग ह्या लोकांचा प्रश्न तरी काय आहे? हा विटाळ का? मी मनाई चटईक्षेत्रात चप्पल तयार करण्याची विद्या आत्मसात केली. त्यातील बारकावे आणि खाणाखुणा मला प्राप्त झाल्या. पण त्यामुळेच मला चमड्याच्या निरीक्षणाची सवय लागली. ह्या निरीक्षणातून माझ्या लक्ष्यात आलं की, ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र आणि आम्हा सगळ्यांची चामडी एकच आहे. कुणाच्याही भिन्नलिंगी चामड्या घासल्या की त्यातून चामडीच तयार होणार. ह्यातील कुणाच्याही चामडीची मी चप्पल तयार केली

तरी माणूस नावाच्या प्राण्याचीच चप्पल होणार. सगळ्यांची चामडी एक असेल तर मग हा भेदभाव कशाला? मी प्रश्न विचारू लागलो आणि सगळ्या गावाला माझ्या ह्या प्रश्नांचा ताप व्हायला लागला. ब्राह्मणांनी तर मला जिवे मारण्याची धमकी दिली. माझ्या बापानं घाबरून मला 'जप्सी' ताण्डाच्या एका प्रमुखाच्या हवाली केलं. त्यांनी मला त्यांच्यातला एक समजून माझा प्रतिपाळ केला. मी अस्पृश्य आहे हे त्या प्रमुखाने कुणालाच सांगितलं नाही. दुर्दैवाने एके रात्री दरोडेखोरांनी हल्ला केला आणि मला पळवून नेलं. ह्या दरोडेखोरांचा प्रमुख पुत्रविहित होता. त्यानं मला त्याच्या मुलासारखं वाढवलं. मला त्याचं आयुष्य मुळीच आवडत नसे. सार्थवाहांच्यावर हल्ला करून त्यांना लुटणे हा त्यांचा मुख्य धंदा माझ्या जप्सी तांडावरही त्यांनी सार्थवाहांचा तांडा समजूनच हल्ला केला होता हे मला त्यांच्यात राहताना कळालं. मला पळून जायाचं होतं. दरोडेखोरांच्या प्रमुखाच नाव रामस होतं, तर त्याच्या पत्नीचं नाव श्रुती होतं ती ब्राह्मण होती, पण रामसने तिला पळवल्याने ब्राह्मण तिचा स्वीकार करायला तयार नव्हते. रामस नेहमी मला तिच्या जवळ सोडत असे आणि ती मी पळून जाणार नाही ह्याची काळजी घेई. श्रुती अष्टावधानी होती आणि जराशा आवाजाने जागी होई. तिला रामसही नको असे आणि मीही. केवळ आपण ब्राह्मणाकडे गेलो तर ते आपल्याला अग्निपरीक्षा द्यावयास सांगून जिवंत जाळतील ह्या भयाने ती रामसबरोबर रहात असे. मी जप्सी असणार म्हणून तिला मी मुलगा म्हणून मान्य नसे, पण रामसला दुखवायचं नाही म्हणून ती मला सांभाळी एवढंच.

एक दिवस आमच्या मुक्कामी संतापाने तोंडातून शिव्या पडाव्यात तसा आकाशाच्या तोंडातून पाऊस पडायला लागला. ढग गडगडाट करत किंचाळायला लागले. विजा आभाळात मणमणभर चांदी वितळायला ठेवल्यासारख्या चमकायला लागल्या. हळूहळू रात्र झाली. आत्ता वारेही कानात बाभूळी शिरल्यासारखे बोचकारे काढायला लागले. मी श्रुतीच्या जवळून गुहेच्या तोंडाकडे सरकू लागलो. सरकताना माझ्या हाती रामसचा खंजीर लागला. नेमक्या त्याच क्षणी श्रुती जागी झाली आणि वीजही चमकली. त्यामुळे आख्खी गुहा प्रकाशानं क्षणभर उजळली. श्रुती माझ्याकडं एकटक पाहत होती. "कुठं चाललायस?" तिचा आवाज धारदार होता. मला एकदम भीती वाटली. हिच काहीतरी करावंच लागणार होतं. ही किंचाळली की आख्खी टोळी जागी होणं अटळ होतं आणि मग पलायन अशक्य. मी क्षणभर विचार केला आणि काही कळायच्या आत माझ्याकडून खंजीर थेट तिच्या पोटात गेला. हात तिच्या तोंडावर गेला. मी मारलेला तो पहिला माणूस स्त्री होता आणि ब्राह्मणही ! ब्रह्महत्येचं पातक खंजिराच्या पात्याबरोबर मला चिकटलं. मला इथून निसटायचं हे माहीत होतं, पण कुठं जायाचं हे माहीत नव्हतं. मी असाच एका स्त्रीहत्येचं पातक मिरवत आपल्या स्वातंत्र्यांची किंमत एक खून असू शकते का असा काही तरी विचार करत पळत होतो. पळता पळता कधी बेशुद्ध झालो ते कळलंच नाही. जाग आली तेव्हा सार्थवाहांच्या तांड्यात होतो. त्यांनी मला नाव, गाव विचारलं, पण मी काहीच बोललो नाही. कारण नावागावानंतर जात येणार हे मला माहीत होतं. हे लोक वैश्य होते. त्यांच्या प्रमुखाचं नाव कर्णधन होतं. मला ते नाव विचित्र वाटलं. कारण सर्वसाधारणपणे वैश्य आपल्या मुलांची नावे धनावरून ठेवत म्हणजे धनानंद. धनसेन, लक्ष्मीपती वगैरे. नंतर मला कधीतरी कळालं की हा प्रमुख महाभारतातल्याकर्णाचा वंशज होता आणि हे लोक कर्णाला वैश्य मानत. त्यांचा तो कुंतीपुत्र होता ह्यावर विश्वास नव्हता. त्यांच्या मते वैश्य क्षत्रियासारखे लढू शकत नाही ह्या अहंकारापोटी रचली गेलीली ती एक भाकडकथा होती आणि कर्ण हा हाडाचा वैश्य असल्याने कृष्णाप्रमाणे क्षत्रिय न होता त्याने वैश्य राहणेच पसंत केले होते. कर्णधनाचा फक्त तीनच वर्णावर विश्वास होता. ब्राह्मण, क्षत्रिय आणि उरलेले सगळे वैश्य. त्यामुळे कर्ण सुतार असल तरी तो वैश्यच होता, असे त्यांचे मत होते. त्यामुळेच त्यांच्या तांड्यात वैश्य शूद्र, अतिशूद्र, भटके, आदिवासी असे सगळे होते. व्यापारी मालाचे रक्षण करायला लागणारे सारे सैनिक त्याला ह्याच जाती-जमातीतून मिळत. त्याच्या ह्या तांड्यात ब्राह्मण फक्त मंत्र म्हणायला आणि शुभमुहूर्त शोधायला लागत, तर क्षत्रिय आम्ही वैश्यांची चाकरी करणार नाही, असं म्हणत असल्याने त्याच्या तांड्यात नसत. ब्राह्मणाला पैसे देऊन गप्प बसवले जाई. एकंदरच हे एक फिरते असे चक्र होते. जे माझ्या स्थिर गावापेक्षा वेगळे होते. कर्णधनाने मला लिहायला, वाचायला आणि हिशेब करायला शिकवले. वेगवेगळ्या पेठांतून वेगवेगळ्या वस्तू घ्यायचा आणि अधिक भावाने त्या दुसऱ्या पेठात विकायच्या ही पद्धत. मला हे जगणे एकदम आवडले. तांड्यात अनेक तीर्थयात्रेला निघालेले लोकही सामील होत. काही तर फक्त प्रवास करायला तांड्यात सामील होतं. गावात असताना वैश्यांची ही संस्कृती मी पाहिलीच नव्हती आणि आता मी स्वतःच तिचा एक भाग झालो होतो. ह्या तांड्यात असताना माझ्या लक्ष्यात आलं की क्षत्रिय आणि शूद्र हे दोन्ही वर्ण जमिनीशी निगडित आहेत. त्यामुळेच ते एका मांडवाखाली नांदतात, तर खरे ब्राह्मण, भिक्षुक, भिक्खु, संन्यासी आणि वैश्य हे सतत भटकत असतात. त्यामुळे ब्राह्मण आणि वैश्य हे भटके वर्ण आहेत. मला प्रश्न पडे की, आपण चांभार, ढोर, महार ह्यात नेमके कुठे आहोत? आपल्याला जमीन मिळाली तर आपण क्षत्रिय किंवा निदान शूद्र होऊ. पण जमीन मिळाली तर आपल अतिशूद्रत्व जाईल? आपल्याला जात घालवायची असेल तर गाव सोडावं लागेल आणि गाव सोडलं तर आपल्याला एकतर ब्राह्मण बनावं लागेल किंवा वैश्य. त्यातील ब्राह्मण आपल्याला कितपत जवळ करतील कुणास ठाऊक? जे क्षत्रिय वैश्य आणि शूद्रानांही जवळ करत नाहीत ते अतिशूद्रांना काय जवळ करणार? कदाचित वैश्यच जवळ करतील जसं ह्या कर्णधनानं आपल्यासारख्या चांभाराला जवळ केलंय. ज्याला सत्ता प्राप्त करायची असेल तो अतिशूद्र क्षत्रियांना जवळ करेल. ज्याला पैसा प्राप्त करायचा असेल किंवा पैश्यातून प्राप्त होणारी सत्ता प्राप्त करायची असेल तो वैश्यांना जवळ करेल आणि ज्यांना गावात जमिनीवरच रहायचं असेल ते अतिशूद्र शूद्रांना जवळ करतील. म्हणजे अतिशूद्र, भटक्या, आदिवासी ह्यांच्या कायम ह्या तीन वर्णात विभागण्या होतील आणि यदाकदाचित कुणाला धर्म निर्माण करावासा वाटला तर तो ब्राह्मणांना समांतर असंच काहीतरी शोधेल.

वैश्यांच्या तांड्यात मला असं बरंच काही सुचायचं. मात्र हे बोलण्याची हिंमत माझ्याजवळ येत नव्हती. कर्णधन म्हणायचा, "तयार होणाऱ्या मालावर ना जात असते ना धर्म. वैश्याने त्या मालावर फक्त किंमत लिहावी आणि ती मिळाली की तो विकून टाकावा." मला हे फार आवडायचं.

मी तांड्यात असताना चेंडूफेक, नौकानयन, धनुर्विद्या, मल्लविद्या अशा अनेक गोष्टी शिकलो. तांड्याबरोबर असताना मी मग पाटलीपुत्रात पोहोचलो. नेमक्या ह्याचवेळी इथल्या राज्यावर परकीय आक्रमण झालं. रातोरात अमचा माल होत्याचा नव्हता झाला. कर्णधन मारला गेला. सगळे व्यापारी ह्या ना त्या मार्गाने त्यांच्या घरी पळून गेले. मग आम्ही जे शिल्लक होतो ते नव्या राजाचे सैनिक झालो. इथे जुन्या राजाचे निष्ठावंत पूर्ण संपले नव्हते. त्यामुळे नव्या राजाला नेहमी उठावाचे भय वाटे. त्याने आम्हाला जुन्या निष्ठावंताना मारण्यासाठी जंगलात पाठवले. पण जुने निष्ठावंत संख्येने आमच्यापेक्षा अधिक निघाले. त्यांनी आमची अक्षरशः कत्तल केली. मी एकटाच वाचलो. खरेतर मला बाण लागला होता, पण बहुधा तो तितकासा विषारी नसावा. माझा घोडा मेला होता. माझ्यावर चार सैनिकांची प्रेते आणि त्या प्रेतावर माझ्या घोड्याचे प्रेत पडले होते. बहुधा त्यामुळेच निष्ठावंतांना मी दिसलो नव्हतो. मी रांगत सरपटत कसातरी एकदाचा बाहेर आलो. जवळ जवळ दोन मास मी निष्ठावंतापासून स्वतःला वाचवत पाटलीपुत्रात पोहोचलो तर तिथे पुन्हा जुन्याच राजाचं राज्य आलेलं. मी त्यांना मला सैन्यात सामील करून घ्या म्हणालो, पण अधिकारी म्हणाला, "तू त्या राजाचा निष्ठावंत आहेस. त्याच्याच राज्यात जा." मी त्याच्या राज्यात गेलो, तर तिथला अधिकारी म्हणाला, "पाटलीपुत्रात जे नवे सैनिक घेतले ते सर्वच मेले असा अहवाल आमच्याकडे आहे. बऱ्या बोलानं सांग तू त्या राजाचा गुप्तहेर तर नव्हेस?" त्यांनी मग मला कैदेत टाकले, पण मी एक दिवस कर्णधनाच्या ताण्डयात होतो हे सांगताच माझी कारण न सांगताच मुक्तता झाली.

इतक्या सगळ्या घडामोडीनंतर मी ह्या संसाराला विटलो आणि बौद्ध भिक्खु झालो. असाच हिंडत साधना करताना अस्पृश्यता नष्ट करण्याची संशोधना सुरू झाली आणि मी अचानक तू म्हणतेस त्या सायबोर्ग राक्षसाशी जोडलो गेलो.

श्रीधरची कथा संपली.

अप्सरेनं विचारलं, ''तुझी जीवनकथा श्रवणीय आहे, पण ती खरी की खोटी.''

श्रीधरनं विचारलं, ''स्वर्गात फक्त मेलेल्याच गोष्टी येतात. कथा त्याला अपवाद कशा असतील? स्वर्गात प्रश्न खरा की खोटा असा नसतो तर जिवंत की मेलेला असा असतो.

अप्सरेनं विचारलं, ''ठीक आहे मग सांग तुझे हे आत्मचरित्र जिवंत की मेलेले?''

श्रीधर म्हणाला, ''ज्याअर्थी तुला मी ते स्वर्गात सांगितले आहे त्याअर्थी ते मेलेलंच असणार.''

१.

माझ्याजवळ नव्हता वैदिक डिंक
मग कुठून मला
हा वर्ण चिकटला
जात
जी मला माहीतच नव्हती
कशी मला चिपकली
फक्त संस्कारावर उभा असलेला हवामहल
कुठून भरभक्कम पाया घालतो मूर्खतेचा
आसपासच्या मूर्ख लोकांतून
तुमच्या मेंदूच्या पायात
हे पाप जे तिळासारखं
सर्वांनी वाटून खाल्लय
कसं काय
नेमकं शोधून काढतं तुम्हाला बिळाबिळातून

लोक
माणुसकी न पाहता जात बघतात
आणि जातीयता नष्ट करण्याच्या
शपथाही घेतात
जिचा गळा कापायचा आहे
तिच्याच गळ्याची पाठराखण करत

तुम्हाला सांगायची नसली तरी
त्यांना विचारायचीच असते
पाप जे केलेलेच नाही
त्याचं कन्फेशन

मी फाट्यावर मारतो तुमची चौकशी
तुम्हाला हवी असलेली माहिती
मी देणार नाही

माझा गळा काटा
किंवा
माणुसकीचंच गाण गा
इतके दोनच पर्याय मी देतोय तुमच्या तलवारींना
हे जात उगारून आलेल्या
माझ्या मारेकऱ्यानो

२

ब्राह्मण जो अल्पसंख्याक आहे
अस्पृश्य जो अल्पसंख्याक आहे
प्रश्न नाही
प्रश्न आहे
मला कुठं सामील व्हायचं आहे
क्षत्रिय, वैश्य, शूद्र
जो मुख्य प्रवाह आहे
ह्यात मी कुठल्या अटीवर मिसळणार आहे
पुरोहितशाही नष्ट झाली की
ब्राह्मणही होईल आपसुख
क्षत्रिय वा वैश्य वा शूद्र
आदिवासी जो मूळ प्रवाह आहे
तोही येऊन मिळेलच मुख्य प्रवाहाला
प्रश्न आहे
कुठल्या अटीवर

क्षत्रियाचं राज्यशासन हवं
वैश्यांचा व्यापार व विज्ञानतंत्रज्ञान
शूद्रांची शेती

मला हवंय सगळंच
मला सगळ्यातून वहायचं आहे

हे डिजीटल अप्सरे
तुझ्या डिजीटल स्वर्गात
आम्हा सर्वांना एकमेकांत अशी मिसळ
की प्रत्येकाची सळसळ
फक्त माणसाची होवो
आणि उतरो
पृथ्वीवरील प्रत्येक माणसात
स्वर्ग
जो माणसाचा भविष्यकाळ आहे
नरक
जो माणसाचा भूतकाळ आहे
पृथ्वी
जी माणसाचा वर्तमानकाळ आहे

आता ठाकोत एकमेकांसमोर

चार पावलाचे वामन होवोत नष्ट
आणि पाचवा पाय स्पष्ट
फक्त माणुसकीचा होवो
जो वाहून न्हेईल असे अंग
जे बुद्धाचे असेल

३

वर्णव्यवस्था म्हणजे कामाची वाटणी नव्हे
ब्राह्मण - धर्म
क्षत्रिय - राज्य
वैश्य - व्यापार
शूद्र - सेवा
अतिशूद्र - अतिसेवा
अशी कामाची विभागणी नव्हे

वर्णव्यवस्था म्हणजे
क्षत्रियाला धर्मापासून
वैश्याला राज्य आणि धर्मापासून
शूद्राला धर्म, राज्य आणि व्यापारापासून
अतिशूद्राला धर्म, राज्य, व्यापार, शेती व सेवापासून
वंचित ठेवणे

४.

एक बुद्धिबळाचा पट मांडलाय माझ्या भोवताली
तिथे ब्राह्मण वजीरासारखा कुठेही कसाही कशासाठीही किंही
तिथे क्षत्रिय राजासारखा
फक्त एक घर कुठेही कसाही
किंवा कधी घोड्यासारखा अडीच घरे युद्ध करत
तिथे वैश्य उंटासारखा तिरका
किंवा कधी हत्तीसारखा सरळ प्रवास करत
जिथे शूद्र फक्त एक घर पुढे सरकणाऱ्या
प्याद्यासारखा पडेल ते काम करत
जिथे अवर्ण आपण कधी प्यादे बनतोय ह्याची वाट पहात
जिथे एखादे प्यादे क्वचित आठ घरे पार करत थेट वजीर
वजीर जो पुरोहित आहे किंवा गुरू
वजीर जो ईश्वरासारखा सगळी घरे व्यापून आहे
म्हणून सर्वत्र जाऊ शकतो
असा इतरांचा गैरसमज आहे
आणि जो त्या गैरसमजाच्या पाठीवर बसून
चौसष्ठ घरात चौखुर हिंडतोय

'कारण' जे वैज्ञानिक असते फाट्यावर मारत
'धर्म' जो फक्त तर्क आणि नियम आहे
संस्कार करत सर्वत्र मिरवतोय
पुन्हा पुन्हा वर्णमाला गिरवतोय
'भाषा' जी वैज्ञानिक नाही
भाषाजी फक्त 'धर्म' आहे
चालतीच आहे तर्क आणि नियमाच्या आधारे
भाषा जी वर्णव्यवस्थेला
तर्काचा आणि नियमाचा आधार देत
संस्कार करत धर्म बनवतीये
माझ्या तोंडावर आदळतीये
मी प्रथम आईचा आवाज ऐकला
मग कुणाचा तरी आवाज आईचा होता
म्हणून त्या आवाजालाच आई समजलो
आणि मग जन्मभर तो आवाज शोधत
सर्वत्र भटकलो
आवाज जो इच्छा आहे
आवाज जो धर्म आहे
आवाज जो तर्क आहे आणि नियम आहे

हा स्वर्ग तो आवाज असेल
म्हणूनच तो गुंतागुंतीचा बनतोय
प्रेमाइतकाच
इच्छेइतकाच
धर्म
जो तर्क आणि नियमाने बनलाय
माझी इच्छा माझं प्रेम
गुंतागुंतीचं करून टाकतोय
स्वर्ग
एक निर्मनुष्य भूमी बनत चाललाय
मी आणि महाभाषा ह्यांच्या दरम्यानची
स्वर्ग
जो मागणी आणि इच्छा आहे इतरांची
मी अंगावर घेतोय
जिच्यात सामील होतायत
इतरांचे आवाज आणि एकाग्र दृष्टी
आपण इतरांना जागे करतोय
आपल्या आवाजातून
आपल्या एकाग्र दृष्टीतून
'माझ्याकडं असं तुझ्या पाहण्याचा अर्थ काय?'
तू विचारतीयेस
तुला मी हवा आहे
मला तू हवी आहेस

कदाचित माझ्या आईसारखा आवाज तुझ्यात आहे
म्हणूनच स्वर्गवासी होऊन
मी इथे पोहोचलोय
जे जितकं सरळ दिसतं
ते तितक वाकडं असते
जिने त्यालाच असतात
ज्याला
आपल्यापर्यंत कुणी पोहचू नये
आणि कुणी पोहचणाराच असेल तर
त्याची पोहचण्याची लायकी असावी
असं एकाचवेळी वाटतं

स्वर्गाचे जिने दिसत नाही
पण ते असतात
म्हणूनच बहुतेक ज्ञानी
त्रिशंकुसारखे मध्येच लटकतात
ते ज्याला लटकतात
तो जीना असतो
पण जो दिसत नाही
मी तू स्वर्गात आहेस म्हणून स्वर्गात पोहोचतोय
स्वर्ग
ज्यांच्यात इतरांच्या प्रतिमा आहेस -अवतरतायत
स्पर्शाई जी महास्वर्ग आहे
जिला मी आई म्हणतो
जिला तर्क आहे आणि अर्थही - अवतरतीये
आणि स्वर्गाला ओलांडूनही जातीये
ज्याला तर्क आहे आणि नियमही

मी भाषतोय
भाषा जी इच्छेची अभिव्यक्ती आहे
जिचे शब्द इतरांच्या शब्दांसह आहेत - अवतरतीये

बृहस्पतीनं मला बेशुद्ध करताना
आरश्यासमोरच बेशुद्ध केलं
आणि मी आरश्यात ज्याला बेशुद्ध होताना पाहिलं
तो मी नव्हे
कुणी दुसराच होता

वेश्या स्वर्गात पोहचली
आणि अप्सरा झाली
तिनं स्वतःला भाषेत पाहिलं
ती दुसरीच होती

आपण दुसरे एकमेकांत पहिले होतोय
मला स्वतलाच मी मरताना पहायला आवडतं
आत्महत्या आरसा असतो
जो ही आवड पुरवतो

तू माझी आत्महत्या होतीयेस
मला दुसऱ्याच्या भाषेत
स्वतःच्या प्रतिमा पहायला आवडतं
तू दुसऱ्याची भाषा होतीयेस
मला मी आरश्यात काळा आहे की नाही
हे स्पष्ट दिसतं
तरीही कुणाच्यातरी भाषेत मी काळा आहे की नाही
हे चाचपायला मला आवडत
मला माझे डोळे, माझे ओठ, माझे नाक
दुसऱ्यांच्या भाषेत पहायला आवडतात
मला माझी अस्पृश्यता
दुसऱ्याच्या भाषेत पहायला आवडते
आणि मी दुसऱ्याच्या भाषेत मी अस्पृश्य आहे हे पहातो
आणि थक्क होतो
मी तुला पाहतोय आणि थक्क होतोय
माझ्या हातात खिळे मारले जातायत मी सुळावरून कोसळतोय
माझ्या मनगटात खिळे मारले जातायत मी सुळाला बरोबर लटकतोय
माझ्या काळजातच खिळे ठोकले जातायत भाषेचे
आणि मी सुळासकट
गळ्यात मडकं अडकवून
पाठीला झाडू बांधून
हा सुळसुळाट सोसत तुझ्या त्वचेच्या गावात हिंडतोय

तू
जो अभाव आहे माझ्यातला
मला जन्माला घालतोय
आणि मी स्वर्गसुख शोधत
स्वर्गाची इच्छा बाळगत
स्वर्गाचा अर्थ लावत तुला बोलतोय
स्वर्ग आणि स्पर्श
एकमेकात मिसळतायत
आणि माझे सर्वांग
तुझ्या सर्वांगांचा शंख फुंकत
तुला ऐकतय
तुला
जी वेश्या बनण्यापूर्वी कानांगी होती
अन् जी अप्सरा झाल्यानंतर बहिरी होत चाललीये

५
मालकी हक्क सौंदर्य नष्ट करतो
तू आहेस
आणि तू माझी आहेस
ह्यात प्रेमाचा फरक आहे
मी मुर्दाड नितंबावर एकाग्र बसतोय
जिवंत होतोय
नितंबातून कमळ उमलतय
मी मुर्दाड तळव्यांनी एकाग्र चालतोय
जिवंत होतोय
तळव्यातून कमळ उमलतय
मी बैलगाडीत बैलांच्या वेगात झुलतोय
जिवंत होतोय
वेगातून कमळ उमलतंय
तू नाचतीयेस
तुझं नृत्य शरीर नाहीसं करतय
आणि त्यातून कमळ उमलतंय
प्रत्येक वेदना अंतिमतः एका सुईवरच नाचतीये
मी आकसत आकसत
त्या सुईच्या अग्रावर नाहीसा होतोय
आणि त्यातून कमळ उमलतंय
कमळ उमलतंय
आणि मी
चिखलासकट नाहीसा होतोय
सौंदर्य आहे
आणि मालक
मालकीहक्कासकट गायब

★★★

Only Buddhas are communist
-Kal Sidharth Marr

जगणं ही सतत चाललेली आत्महत्या असते. गुलाम ती बापखुशीने पत्करतात आणि मालक आपखुशीने इतकंच.
-Allwell Camu

अप्सरा ७ फेक — लिंग्विस्टीक

१
"माझा श्वास जळतोय"
"बहुधा वारा सुटलाय"
"कैदी मोकळे झालेत...."
"अस्पृश्याला वेळापत्रक कसलं?"
"त्याची वेळ आली होती म्हणून गेला इतकंच...."
भाषा गैरसमज वाटतीये
आणि प्रेम वाढत चाललंय
शब्द मला कापून
माझ्या एकेका भाकरतुकड्यावर
अपयशाचा कांदा ठेवतायत
भाषा त्या कांद्यातून
मला माणूस बनवतायत
आणि मी मला अनेक डोळ्यांनी रडायचं नाही म्हणून
तुझ्या बरोबर मिळणाऱ्या सुख रसात
स्वतःला एकत्र रचतोय
सुखरस जो दुःख देतो
सुखरस जो मला व्यक्तिमत्त्व देतो
सुखरस जो संघर्ष निर्माण करतो
सुखरस जो मला प्राप्त होत नाही आणि ज्याला मी ओळखतो
भाषा मला सवर्णांची सेवक बनवतीये
भाषा मी सवर्णांशिवाय जगूच शकणार नाही
अशी वेगळ हूल देतीये
भाषा आमची बौद्धिकं घेत आमच्यात चर्चा घडवतीये
भाषा आम्हाला आजारी मानून
वैद्यासारख आमचं विश्लेषण करतीये
भाषा आमचं स्वातंत्र्य नाहीसं करतीये
गुलामाना त्यांच्या इच्छा स्पष्ट दिसतायत
मालक मागण्यांनी आंधळे होऊन
स्वतःच्या इच्छापर्यंत पोहचतच नाहीयेत
ते मागण्या करतायत आणि गुलामाकडून पूर्तता करतायत
मालक गुलामांबरोबर वहात चाललेत
त्यांना सुखरस दिसतोय
करमणूक दिसतीये
पण त्यांच्या आतील

सळसळणाऱ्या इच्छा दिसत नाहीयेत
ते गुलामांकडून त्यांचा सुखरस काढून घेतायत
आणि स्वतः माणूसपणाला पारखं होतायत
गुलाम जोपर्यंत त्यांना मालक म्हणून ओळखतायत
तोवर मालक 'मालक' आहे
मालक त्यांच्या 'मालक' ह्या ओळखीसाठी
त्या गुलामावर अवलंबून आहेत
ज्या गुलामांना ते ओळखतही नाहीत
मालक जे माणसांना माणूस म्हणून पाहू शकत नाहीत
मूर्ख साबीत होतायत
आणि गुलाम ज्यांना मालकातला माणूस स्पष्ट उमगतो
शहाणे आणि समंजस साबीत होतायत

लोकशाही अवतरतीये
मालक गुलाम नाहीसे झाल्याचे भास होतायत
प्रत्येकाला मालक व्हायची इच्छा आहे
आणि प्रत्येकजण त्या इच्छेचा गुलाम आहे

तुरुंगात तुरुंगाधिकारी आणि कैदी
दोघेही कैदेत आहेत
कैद्यांना हे माहिती आहे
तुरुंगाधिकाऱ्यांना माहीत नाही
दोघेही एकमेकाच्या भूमिका बदलत
एकमेकाला कैद करतायत

आई हीच पहिली मालक
आई हीच पहिली गुलाम
दुधावर अवलंबून रहावं लागतं म्हणून
मीच आईचा गुलाम
झक मारत दूध द्यावं लागतं सगळं हगणमुतण काढावं लागतं
म्हणून आई हीच माझी गुलाम

भूमिका बदलतायत
एकमेकाला कैद करतायत
दोघांनाही वाटतय
दुसरा सुखरसात डुंबतोय
दोघांनाही वाटतय
दुसरा आपला सुखरस चोरतोय
दोघांनाही वाटतय
दुसऱ्या पायऱ्यांवरचा दुसरा मज्या मारतोय
माझ्या पायऱ्या ज्याम करून

आंतरजातीय लग्नं
आंतरवर्णीय वाटाघाटी
सगळं धोक्यात आणतायत
शतकानुशतकं शाबूत ठेवलेला खेळ
उद्ध्वस्त होतोय
एक चोरून मिळणारा सुखरस
नाहीसा होतोय

आता उरत चाललाय फक्त चोथा
आणि त्यावर मी लिहित असलेली शेवटची गाथा
जी मी स्वतःच पाण्यात बुडवतोय
विठ्ठला
मला तुझी कसली मदत नकोय
तुझ्या विटेवरच तू तुझी पायरी सांभाळून रहा झालं.

२

माणसाला बाह्यलक्षणावरून ओळखता येत नाही
त्याला त्याच्या भाषेमधून हुडकून काढावं लागतं

सर्वत्र रोग आहे
आयुष्य कामरोगातून जन्मतंय पुन्हापुन्हा
आणि प्रत्येक माणसाला जन्मतःच कामरोगाची लागण होतीये
ज्यातून तो मेल्यानंतरच बरा होतोय
रोग जगण्याची अट आहे आणि अपरिहार्यताही

भाषा बोलत नाहीयेत
त्या रोगांची लक्षणं सांगतायत
भाषा मला रोगाची निवड करायला सांगतायत
मला माझ्या इच्छा ओळखता येत नाहीयेत
आणि लोक त्यांच्या इच्छा माझ्यावर लादतायत

सर्वत्र इच्छांचा कोलाहल वाजतोय
आणि माझ्या गळ्यात गोंधळ घालून
गोंगाट पुढे सरकतोय
माझा तारस्वर उद्रेकवादन करतोय

माझं डोकं दुखतय
मला सगळं अंधुक अंधुक दिसतंय
मी इतरांच्या आवाजापासून गर्भार राहिल्याचे
मला भास होतायत

मी ओळखीच्या लोकांशी बोलतोय
मी अनोळखी लोकांशी बोलतोय
माझी लक्षण भाषेत स्पष्टपणे पुरावा सोडतायत
आणि तरीही मला मोकळं वाटत नाहीये
एक दुःख आहे
पण ते नेमकं कशाचं आहे
मला माहीत नाही

एक पुरुष पुरुषाशी रत होऊ इच्छितोय
एक बाई स्वतःच पुरुष होऊ इच्छिते
एक पुरुषातली बाई बाईशी रत होऊ इच्छिते
एक बाईतला पुरुष पुरुषाशी रत होऊ इच्छितो

लिंगसंक्रमण होतंय आणि किंचाळतय

एक सवर्णातला अवर्ण अवर्णाशी रत होऊ इच्छितोय
एक अवर्णातला सवर्ण सवर्ण होऊ इच्छितोय
एक सवर्णातला सवर्ण फक्त सवर्णाशी रत होऊ इच्छितोय
एक अवर्णातला अवर्ण फक्त अवर्णाशी रत होऊ इच्छितोय

वर्णसंक्रमण होतंय आणि किंचाळतय

स्वर्गाविषयीच्या भ्रांती
पृथ्वीविषयीच्या सवयींवर अधिक भाष्य करतात
माझ्या इच्छांना फेफर येतंय
आणि मी मोकाट बोलतोय

मी धन आहे की ऋण
मी पुरुष आहे की बाई
मी आईला अनुसरत आईसारखा होत कुठे चाललोय
तू बापाला अनुसरत बापासारखा होत कुठे चाललीयेस
निसर्ग आपली लिंगनिश्चिती करू शकत नाहीये
समाज आपली वर्णनिश्चिती करू शकत नाहीये

भाषाच तुझं माझं लिंग तुझा माझा वर्ण निश्चित करतीये
मला भाषेचं फेफरं येतय

जे भाषेला माझ्या लिंगासकट, माझ्या वर्णासकट
अनिश्चित करतय
माझा एकेक मज्जातंतू तुटत चाललाय
मी जिवंत आहे की मी मेलोय

मी एका टोकाला जाऊन अशक्य मागतो आपटतो
मी मग दुसऱ्या टोकाला जाऊन अशक्य मागतो आपटतो
मी दोन अशक्यतात सतत लोंबकळतो
मी अशक्यांची जंत्री करतो वाजंत्री करतो
मी अशक्यांचे ढीग रचतो आणि गाडून घेतो
मी अशक्यांची जत्रा भरवतो
आणि तिच्यात लहान मुलासारखा हिंडतो

मला दोन इच्छा दिसतात
आणि त्यातली खरी कुठली तेच कळत नाही

कधी एक इच्छाही शोधून काढता येत नाहीये
कधी अनेक इच्छा एकमेकांचा खून करतायत

काय करावं कुठं जावं काय पहाव कुणाला पहावं

माझा बाप मला तुझ्याशी लग्न करू देत नाही
आणि मी तुझ्याशिवाय राहू इच्छित नाही

आपला प्रत्येक संभोग माझ्या बापाचा खून करतोय
आपला प्रत्येक स्वर्ग बापाच्या डोक्यावर पाय देतोय

तुला नग्न पाहताना माझ्या बापाची त्वचा जळतीये
माझ्या बापाच्या कपड्यात तुझी राख आढळतीये
मी वर्णव्यवस्था अनुरली की तू तुटतेस
मी तुला अनुसरले की वर्णव्यवस्था तुटतीये

माझं बापावर प्रेम आहे मला बाप हवा
माझं तुझ्यावर प्रेम आहे मला तू हवीस
मला हिशेबाचा रोग झालाय
मला कळत नाहीये की मी जिवंत आहे की मेलोय

ब्राह्मण म्हणाला, "काल मी वेदाशी रत झालो."
क्षत्रिय म्हणाला, "हे तर काहीच नाही काल मी रथाशी रत झालो."
मी म्हणालो, "हे तर कीस झाडकी पत्ती काल मी बाईशी रत झालो."

मी विदूषक आहे.
जो आपल्या लक्षणांच्याच प्रेमात पडलाय

तू उभी आहेस स्वर्गासारखी
स्वर्ग जो आकसतो वाढतो
स्वर्ग जो हालचालतो ठेचकाळतो
स्वर्ग जो रथासारखा धावतो

स्वर्ग - जो वेगात आवेगाचे सुख देतो

स्वर्गात बायका अनेक आहेत
आणि खरा वांदा तिथेच आहे
मी तुझा स्वर्ग होतोय
आणि मी तुझ्यातून स्वर्ग प्राप्त करतोय

मी वृषणातून विचार करतोय
तू गर्भाशयातून विचार करतीयेस
आणि आपण दोघेही एकमेकांतून स्वर्गाला मिळतोय

स्वर्ग जो सत्तेला निर्माण करतोय
सत्ता जी प्रसरणात वाढतीये आकुंचनात कमी होतेय
नरक जो सत्ता आकुंचित करतोय

नरक जो स्वर्गाच्या विरोधात ठाकतोय
नरक जो रसाना रसातळाला नेऊन ठेवतोय

अपयश म्हणजे नरकात जाणे
वंचित होणे म्हणजे नरकात जाणे
मूल न होणे म्हणजे नरकात जाणे

आईला मला जन्म देताना स्वर्ग सापडला
आणि मी ह्या अस्पृश्यतेच्या नरकात येऊन खाली पडलो
मग वर्षानुवर्षे सवर्णाच्या स्वर्गाचे वाद्य झालो
मग आसपास सवर्णांच्या हगण्यामुतण्यातही
स्वर्ग शोधणाऱ्यात वावरलो
मला वहायच्या नव्हत्या गुवाच्या बुट्ट्या
म्हणूनच गावाला बुट्टी मारून
तांड्यात पोहोचलो
ज्याच्या वेगात आवेगाचे सुख होते
ज्यांनी सांभाळलं
त्यांच्यावर मनापासून प्रेम केलं
त्यांच्याशी मनापासून रत झालो
जे संभोग वर्ज्य होते
तेच मनापासून साजरे केले
ज्या प्रेमांना मनाई होती
तिथेच आईची शाई सांडली
बाप टांगात कलमडत राहिले
पण मी त्यांनी घातलेल्या मोडत्यात
मोडून पडलो नाही

सगळे नरक ओलांडून
मी तुझ्याजवळ पोहोचतोय

आता माझ्याकडे पाठ कर किंवा पोट
आता मला पाठीमागून दे वा पुढून

मी थेंबाथेंबात आरोग्य वाचत
आख्खा स्वर्गच निरोगी करणारय

ये

हे आयुष्य
कधीपासून आजारी असलेले
आपण एकमेकांत बरे करू

३

मी सगळीकडे होतो आहे
मी माझ्यातच नाहीसा होतोय

माझ्याविषयी भाषा दोन तोंडांनी बोलतीये
आणि विस्फोटासाठी उर्जा गोळा करत
'मी' घडवतोय
ज्याला फळाविषयी बोलता येत नाहीये
म्हणून जो शाखा प्रशाखावर
ज्या भाषिक आहेत

सत्य स्वातंत्र्यापासून सुरू होतंय
आणि समतेपाशी संपतय

सत्य काय हा माझा प्रश्न नव्हता
सत्य कसे हा माझा सवाल होता

सत्य माझे सारे रोग बरं करतंय
सुदृढपणा आणि आरोग्य

हा माझा शौक नाही
तो माझा अस्पृश्यतेवरचा उतारा आहे
सत्य माझी सगळी अस्पृश्यता धुऊन काढतय
मी होतोय एक असा स्वस्थ माणूस जो सगळीकडेच स्वीकारार्ह असतो

साधना जी विज्ञानापासून सुरू झाली
काव्यापाशी संपतीये
माझ्याकडे आहे माझे हे छोटे शरीर
मी त्याच्या सुईएवढ्या भुईवर अलगद ठेवतोय माझी समग्र उर्जा
एक विस्फोट होतोय

आता मृत्यूही येईल तर त्याला मी
मेलेलो दिसणार नाही
त्याचे डोळेही टवटवीत करेल
इतके आरोग्य मला प्राप्त होतंय

सूर्यदेखील बाहेर वहात
संपत चाललाय
मी माझा सारा प्रकाश आत वळवतोय
खऱ्या आरोग्याकडे
तू माझ्या प्रकाशाचं निमित्त होतीयेस
आणि तुझ्याशी नाळ जोडून
मी माझ्या नाभीला पुन्हा जन्म देतोय

ऊर्जा जी तऱ्हेतऱ्हेनं फिरली
विविध पोशाखांच्या ठिकाणी
नम्रतेला सामोरी जातीये

तर्कटांची खरकटी फेकून दे
सहानुभूतीनं आत घे माझी अनुभूती
तू आहेस खुली
म्हणूनच ह्या संप्रेषणाला अर्थ आहे

माझ्या आयुष्याचा हिमखंड वितळतोय
संपूर्ण समुद्रात
नाव जी मी उगाच वाचवली होती
ऐनवेळच्या सुरक्षिततेसाठी
बुडतीये
प्रयत्नांचा अंत सहज होतोय
फाटे फोडणारी गुंतागुंत सरळ होतीये

प्रेम उमलतय
परिपूर्ण संतोषाचा परिमळ उमलतोय
प्रेम उमलतय
भविष्याचा डोळा नाहीसा होतोय
प्रेम उमलतय
मी नाहीसा होतोय
आपण नाहीसे होतोय

संवेदनाशीलता
जी मी लहानपणी एका देवाणघेवाणीत
आईवडिलांना देऊन टाकली होती
वस्तूंच्या बदल्यात
दुधाच्या बदल्यात
जननेंद्रियांना स्पर्श न करण्याची अट
मान्य करत
सुरक्षिततेच्या बदल्यात
आणि मठ्ठपणे पहात राहिलो होतो
माझ्या आसपासचं भिकार दारिद्र्य
आसपासचे झडत न्हेणारे रोग
आसपासच्या किंचाळणाऱ्या भुका
जागी होतीये

अंगावर एक एक नरक रौरवत येतोय
प्रत्येक माणसात माझं प्रेत जळण्याचा भास
अंगावर येतोय
झडत गेलेल्या महारोगी बोटात
पृथ्वीचं आयुष्य झडत चालल्याचा भ्रम
अंगावर येतोय

पीडांचा रंगतोय विडा
आणि माझी जीभ रंगतीये माझ्याच खुनात

तुझ्या स्पर्शाचा स्वर्गच
मला दाखवतोय अस्पृश्यतेचा नरक
दरवाजे खुलतात
तेव्हा दोन्ही बाजूंनी खुलतात
फुल उमलतं
तेव्हा सुवासासकट आणि दुर्वासासकट उमलंत

जे दुःख उमलतंय ते माझं नाही
आलम दुनियेसाठी आहे

आता आत येईन
तर सगळ्या दुनियेसह येईन

तुझ्या स्वर्गाचा दरवाजा
तोवर ठेव
सताड उघडा

★★★

**अप्सरा फेक ८** **रिअल होतीय**

English is very funny language
English is a fucking good language
English is a good fuck
English is very fake language

**-निओम लॅंग्वाचॉम्स्की** In International Fall N Fuck

जेव्हा अफवा वेड्यासारख्या हवेत उडत असतात तेव्हा सत्याला कंपलसरी फेक जिभांचा विरोध मोडीत काढून चालत जात गळ्यात उतरावं लागतं.

सत्य कुठं राहतं इथेच जीभेच्या अंतरावर

**-अशोक 'केळ' 'खा' कर**

When enlightenment goes mad potential budhas instead of becoming budhas take keen interest in gymnasuim to protect their their body & whole dhamma becomes mad mad mad physical exercise in language.

१

वेडे वाढे वाढे वाढत चाललेत
वेड्यांना वाटतंय की ते भूदेव आहेत
वेड्यांना वाटतंय की त्यांची वाणी
साक्षात देववाणी आहे
वेडे शाप देतायत
आणि ते खरे झाल्याच्या कथा रचतायत
वेडे वर देतायत
आणि तेही खरे झाल्याच्या कहाण्या रचतायत

वेड्यांना
स्वतःचं जानवं सांभाळताना धाप लागतीय
आणि तरीही त्यांना आपण एका पावलात पृथ्वी

दुसऱ्या पावलात स्वर्ग
तिसऱ्या पावलात पाताळ
आणि चौथ्या पावलात इतरांची डोकी
जिंकल्याचे भ्रम होतायत

वेड्यांना ते बुद्ध झाल्याची स्वप्ने पडतायत
वेड्यांना जिथे तिथे राक्षस जन्मताना दिसतायत
राक्षस जे सूर्य, चंद्र ताब्यात ठेवतात
राक्षस जे आकाशगंगा भिरकावतायत
राक्षस जे कुठलंही हृदय कुठेही दाखवतात
राक्षस जे दहशतीचे खेळ खेळतात

वेडे सातवेडे होत वेडातच देवाकरवी राक्षसांना वेगात ठार मारतायत
किंवा ताब्यात ठेवतायत

वेड्यांना वाटतंय की
ते केवळ मंत्रांनी सगळी शस्त्रे
हवी तशी खेळवू शकतात
वेडे ज्याला मंत्र येतो त्याला मंत्री करतायत

वेडे इतके पूर्ण वेडे आहेत
की ते इतरांना ह्या जन्मात वेडे होण्याची संधीही
द्यायला तयार नाहीत
ते इतरांना तुम्हाला पुढील जन्मातच वेडे होणे शक्य आहे
असं सांगतात

वेडेच वैद्य असल्याने
वैद्यकशास्त्रही वेड्याचं काही करू शकत नाहीये
वेडे वरवर पाहता वेडे वाटत नाही
त्यांचं वेड भाषेच्या जाळ्यातच सापडतं

वेड्यांच्या भाषेला आई आहे
म्हणून काही निश्चित अर्थ सापडू शकतो
पण वेड्यांच्या भाषेचा बाप सापडत नाही
ज्यामुळे सगळा अर्थ विचलित होत जातो

वेड्यांना माहीत आहे
की स्वतःची भाषा बोलायला
आईच्या भाषेपासून वेगळं व्हाव लागतं
आणि त्यासाठी त्या 'स्व'ला विशेष नाम द्यावं लागतं

वेडे
व्यक्तींना, जातींना, जमातींना, देवांना, देवींना,
समूहांना, प्रथांना, पुराणांना
विशेष नाम देत गोत्रं पुरवतायत
विशेष नामांच्या कथा रचतायत
ज्यात वेड जोपासणारी विशेष नामे उच्चासनी आहेत
वेडे भाषेला विशेष नामातून ताकद पुरवतायत
आणि विशेष नामं वेड्यांच्या वेडांना विशेष ताकद
जी भल्या भल्या शहाण्यांनाही कळत नाही

वेडे स्वतःचे विशेष मात्र सतत बदलतायत
आणि त्यांचे वेडही कायम ठेवतायत

वेडे स्वतःपुढे बापाचे नाव लावतायत
आणि स्वतःला आईपासून स्वतंत्र पाहतायत

वेड्यांचे बाप बदलतायत आडनावे बदलतायत
आणि वेड्यांची प्रत्येक ओळख
जी बापाबरोबर बदलतीये
जुन्या ओळखीला दाबतीये

वेड्यांच्या दबल्या गेलेल्या ओळखी
पुन्हा पुन्हा उगवतायत
नवीन नवीन देव
नवीन नवीन पूजा
नवीन नवीन विधी
घेऊन
नवे नवे बाप लेवून

ह्या नव्या ओळखी
जुन्याच वेडाचं एक छानसं नवं जाळं तयार करतायत

वेड्यांची विशेष नामं ठाम
वेड्यांचे इतर शब्द लवचिक

'जे सत्य असते ते कधी ना कधी सिद्ध असतेच'
वेडे हे वाक्य वाचतायत
आणि गटारात सोडून देतायत

वेड्यांच्या वेडाच्या नियमांची यादी नेहमी अपूर्णच
कारण काही नियम हरवतायत
किंवा काही नियम परस्पराविरोधी जातायत
जे सगळं वेड अनिश्चित करतायत
आणि वेड्यांत असातत्य टिकवतायत
कितीही गणित ताणलं
तरी वेड्यांचं वेड सिद्ध होत नाहीये
तरी ते सत्य आहे

निवडीत एकतर अपूर्णता निवडावी लागतीये
किंवा परस्परविरोध
ही निवड वेड्याचं वेड शाबूत ठेवतीये

जे अपूर्णता निवडतायत ते खुळचट वाटतायत
त्यांना भाषेचं व्याकरण सापडतंय
असंख्य वाक्यं सापडतायत
पण भाषेचे सगळे नियम सापडत नाहीयेत
जे परस्परविरोध निवडतायत
ज्यांचे नियम परस्परविरोधी जातायत
ते वेडगळ वाटतायत वेडे वाटतायत

वेडे
ज्यांना ह्या परस्परविरोधातून
भ्रम होतायत भास होतायत
कल्पितं रचतायत
कल्पितांना घाबरतायत
कल्पितांनी घाबरवतायत

वेडे
ज्यांचे बाप त्यांना आईपासून दूर ठेवतायत
ज्यांच्या बापांची विशेषणे सतत बदलतायत
पण तरीही ज्यांच्या बापाची विशेष नामे स्थिर आहेत
बापाविषयी गोंधळातयत

वेडे
ज्यांचे वैदिक बाप त्यांना अवैदिक आईपासून दूर ठेवतायत
ज्यांच्या वैदिक बापांची विशेषणे सतत बदलतायत
पण तरीही ज्यांच्या वैदिक बापाची विशेष नामे स्थिर आहेत
वैदिकाविषयी गोंधळतायत

वेडे
ज्यांचे अवैदिक बाप त्यांना वैदिक आईपासून दूर ठेवतायत
ज्यांच्या अवैदिक बापांची विशेषणे सतत बदलतायत

पण तरीही ज्यांच्या अवैदिक बापाची विशेष नामे स्थिर आहेत
अवैदिकाविषयी गोंधळतायत

बाप
जे धर्म आहेत, [illegible] आहेत, कुळं आहेत, जातीजमाती आहेत
वर्ग आहेत, रंग आहेत, रचना आहेत....काय काय आहेत
गोंधळ उडवतायत

विशेष आणि विशेषणं
ज्यांच्याविषयी बोलायला मनाई आहे
त्याविषयीच वेडे बोलतायत
आणि त्या विषयीचे मालकी हक्क स्वतःकडे ठेवून घेत
वेडे स्वतःला आरक्षित करतायत
वेड्यांना स्वतःच्या निश्चित आईपासून नीट वेगळं होता येत नाहीये
म्हणूनच वेडे बापांच्या अनिश्चित विशेषाविषयी बोलतायत
वेड्यांची अडचण
त्यांना भाषेच्या व्याकरणात आणि अर्थात
स्थिरावू देत नाहीये
त्यामुळेच वेडे बोलतायत
तेव्हा ते एकतर कर्मठाहून कर्मठ होतायत
किंवा सैलाहून सैल
त्यांचे करार पायघोळ पण काटोकाट होतायत
किंवा अर्धनग्न मुक्तस्तनी
त्यांना पवित्र ग्रंथ ईश्वरापेक्षा मोठे दिसतायत
माणसे शब्दांच्या मुंग्याहून छोटी

वेडे
आईपासून पुरेसे न तुटल्याची
घरातून पुरते बाहेर न पडल्याची
किंमत चुकवतायत
त्यामुळेच त्यांची भाषाही वेडगळ होतीये
कुणी हत्तीसारखे तोंड म्हणतोय
वेड्यांना तोंडाच्या जागी खराखुरी हत्ती दिसतोय
कुणी पुरुषासारखा समाज म्हणतोय
वेड्यांना मस्तकाच्या जागी ब्राह्मण, छातीच्या जागी क्षत्रिय, पोटाच्या जागी
वैश्य, पायाच्या जागी शूद्र दिसतोय
वेडे कुठलाही विशेष कुठल्याही विशेषकाला जोडतायत
वेडे कुठलाही अवशेष कुणाच्याही प्रेताला जोडतायत

वेड्यांची स्थलांतरित आई घाबरतीये
वेड्यांच्या बापाबरोबर स्थानिक संसार करायला
तिला वेड्याच्या बापाच्या दुरगामी स्पर्शाची भिती वाटतीये
आणि वेडे स्पर्शापासून तिचे रक्षण करण्याकरिता
तिच्या एकखांबी पलंगावरच बसून आहेत
वेडे कुणालाच तिच्या स्पर्शापाशी येऊ देत नाहीयेत
वेडे त्यासाठी अस्पृश्यता पाळतायत

वेड्यांना माहितीये
त्यांच्याखेरीज कुणी पुरुष आईच्या आयुष्यात आहे
जो आईच्या पलंगात येऊन निघून जातोय
जो त्यांना दिसत नाहीये
वेड्यांना बाप आहे
आणि नाहीही
वेड्यांना वाटतंय
ज्याअर्थी पलंगात आईबरोबर ते एकटेच आहेत
त्याअर्थी तेच फक्त आईच्या आयुष्यात आहेत

ह्यात एक परस्परविरोध आहे
जो वेड्यांना दिसत नाहीये
त्यांना आईच्या स्वतःशिवाय
कुणी इच्छुक दिसत नाहीये
त्यांना आईच्या इच्छा ओळखता येत नाहीयेत

वेडे
आईच्या आयुष्यात एकमेव असल्याने
स्वतःला थोर समजतायत उच्च समजतायत
आईला फक्त आपणच हवे म्हणून हुरळतायत

वेडे
बाप आईला पळवून न्हेईल म्हणून घाबरतायत
वेडे
बाप आईला घेऊन जाणार नाही म्हणून घाबरतायत
वेडे
आईला घेऊन पळून जायाला घाबरतायत
वेडे
आईला मागे घरात ठेवून पळून जायाला घाबरतायत
वेडे
आईला स्वतःच घाबरून परदेशी पळून जातायत परततायत
वेडे
आईला काहीतरी भव्यदिव्य रूप देतायत
वेडे
आईला सर्वात पवित्र वगैरे मानतायत
वेडे
आईला सर्वात प्राचीन वगैरे मानतायत
वेडे
आईला कल्पनेत पळवून न्हेणाऱ्यांनाही शिक्षा ठोठावतायत
वेडे
आईला कुणालाच भेटू देत नाहीत
आणि मग ती कशी इतरांना अप्राप्य आहे ते पटवतायत

वेडे
लहानपणापासू आईच्या पलंगातच आहेत
त्यांना स्वप्नात पुरुष दिसतायत
आणि ते म्हणतायत की ते समलिंगी आहेत
वेड्यांना कळत नाहीये की
स्वप्नातले पुरुष त्यांचे बाप आहेत की प्रियकर

वेडे
स्वप्नात दिसणाऱ्या पुरुषाच्या मागे
त्याचे अनुयायी असल्यासारखे धावतायत

वेडे
स्वतःचे समलिंगीपण स्वीकारून
स्वप्नस्थ परेदशी वा स्वदेशी पुरुषाबरोबर संसार थाटून
आईपासून मुक्त होतायत

वेडे
स्वप्नातल्या पुरुषावर पुरुषसुक्त रचतायत
आणि कवी, चित्रकार कलावंत वा ईश्वर होतायत

वेडे
आईला कैदेत ठेवतायत
आणि तिला मुक्तही करण्याचा प्रयत्न करतायत
वेडे
आईच्या कैदेत राहतायत
आणि तिच्यातून मुक्त होण्याचा प्रयत्नही करतायत

वेडे
आईशी बद्धमुक्त खेळ खेळतायत
आणि त्या खेळाला दाद देण्यासाठी
एका हाताने टाळी वाजवतायत
ब्रह्मानंदी न लागलेली

२

मी तादात्म्य होतोय
मी पाप करतोय
मी तादात्म्य होण्याचं पाप करतोय
इतकं की
आईपासून नाळ तुटत नाहीये
माझा नवा जन्म होतच नाहीये
माझं तारुण्य बालपणाशी
माझं म्हातारपणं तारुण्याशी
तादात्म्य होतंय

मला ह्यातून बाहेर पडू दे
पाहू दे आयुष्याचं नाटक
प्रेक्षकासारखं
जे त्राटक करून माझा वर्तमान
खिळे मारत खिळवून ठेवतंय

उलट्या होतायत
मी वर्तमानातून भूतकाळ ओकतोय
श्रुतीच्या रक्तात माझा श्वास लाल होतोय
ब्राह्मणांचा ताण्डा मला मारायला आलेला
आणि माझा वेदांना अकारण घाबरून गेलेला बाप
माझी जन्मदात्री आई
जी आयुष्यात कधी बोललीच नाही
आणि जिचे बन्द ओठ कुलपासारखे दिसत.
माझे भाऊ चामडं सोलत
स्वतःच्या चामड्यात हसणारे
माझी बहीण
जिला एका ब्राह्मणानं एके रात्री
स्मृतीच्या अधिकारात ठेवून घेतल्याने
वेडी झालेली
तिची उडी शेवटी आत्महत्येत अचूक पडतीये

मी साक्षीत्वाच्या झाडूनं काळाची सफाई करतोय
सगळे रोग भूतकाळातून निर्माण होतायत
चालत जाऊन
मेंदूची सफाई करतोय
मन एक दोन तीन म्हणतंय
मी नकार देतोय
मन मग एकशे एक एकशे दोन म्हणतंय
मी नकार देतोय
मी प्रतिक्रमण करत चाललोय
शंभर नव्याण्णव अठ्ठ्याण्णव ,

म्हातारपण
जे मृत्यूला घाबरून भूतकाळाचा विचार करतंय
तारुण्य
जे कर्तृत्वानं हुरळून भविष्याचा विचार करतंय
म्हातारे
जे काळ जेवून गेलेत
तरुण
ज्यांच्यासमोर काळ वाढत जातोय

मी शंभर वर्षे जगेन
तर मी शंभर वर्षे स्वप्न पाहीन
मी शंभर वर्षे मरणनिद्रेत राहीन
तरी मी शंभर वर्षे स्वप्ने पाहीन

मी झोपेला जागं करतोय
मी मागं मागं जातोय
थेट गर्भात
तिथे आईच्या ओठाचं कुलूप हलतंय
मी थेट गर्भधारणेच्या क्षणी पोहचतो
मग थेट मागं
मागील जन्मात

कधी मालक कधी गुलाम
कधी गुलाम कधी मालक

अस्पृश्यता आणि मागील जन्म
ह्यांचा संबंध तुटतोय
अनेक ब्राह्मण अस्पृश्य म्हणूनच जन्म घेतायत

जातीचा आणि जन्माचा सबंधच नाहीये
अस्पृश्यता हे ब्राह्मणांनी रचलेलं कुभांड आहे
वेदांची पवित्रता
एक टक्के लायकीचीही नाहीये

वर्णव्यवस्था
ही ब्राह्मणाचं सर्वात मोठं खोटं आहे

मी मागे जातोय
कधी काळा, कधी गोरा, कधी पिवळा, कधी सावळा,
कधी चपटा, कधी नाकेला, कधी नेत्रकदार, कधी आंधळा

माझ्या कुठल्याच जन्माला जात चिकटलेली दिसत नाही
ना धर्म ना वर्ण ना वर्ग ना वंश
माझा जन्म मुक्त
कुठेही कधीही
हे विश्वची माझे घर म्हणत

मी मागे जातोय
मी पृथ्वीएवढा होतोय

कधी जंतू कधी झाड कधी सिंह कधी माड

मी मागे जातोय
मी झाड असताना मारला गेलोय
मी हरण असताना मारला गेलोय
मी माणूस असताना मारला गेलोय

मी चार कमळे पाहिलीयेत
आणि कमळ ह्या विषयापाशी थांबलोय
मला पाचवे कमळ दिसत नाहीये
मला कमळ हा विषय दिसतोय

मी कमळ पाहूच शकत नाहीये
मी कमळ पाहण्याची ताकद गमावलीये
आणि मी कमळ ह्या विषयावर अधिकारवाणीने बोलतोय
मी ह्या जन्मात ब्राह्मण आहे
आणि लोक मी कमळ पाहिलंय म्हणून
मला ब्रह्मनमस्कार करताहेत
कठीण आहे

मी शस्त्राच्या घाटदार अंगाला स्पर्श करतोय
मी शस्त्रातून मृत्यू हुंगतोय
मी माझे काळीज शस्त्रात सोडतोय
आणि मग ते शस्त्र मी त्या
पुरोहिताच्या पायावर ठेवून नमस्कार करतोय
ज्याला मी राजाची हत्या केल्यानंतर
दक्षिणा देऊन खरेदी केलंय
मी ह्या जन्मात क्षत्रिय आहे
आणि सगळे माझा जयजयकार करताहेत
कठीण आहे

मी माझ्या पत्नीशी रत होतोय
आणि उत्कट स्फोटावेळी किंचाळतोय

शंभर मुद्रा सुवर्णमुद्रा
आणि पत्नी
ह्या सुवर्णमुद्रा कुठून उगवल्या शरीरसंबंधात म्हणून
हताश होऊन नग्नतेला पाहतीये
मी ह्या जन्मात वैश्य आहे
आणि सगळे मी पत्नीशी संग करून बाहेर आल्यानंतर
दानवीर दानवीर म्हणून
माझ्या नावाचा घोष करतायत
कठीण आहे

मी ध्यान लावून शेती करतोय
शेतच होतोय
आणि मालक
ब्राह्मण की क्षत्रिय की वैश्य
कळत नाहीय
माझ्यासकट पीकाची छाटणी करून
मला कोठारात भरतोय
ना ब्रह्मनमस्कार
ना जयजयकार
ना घोष
माझ्या गळ्याला पडलीये कोरड
आणि सत्तावीस नक्षत्रे कोरडी घालवून
मी डोळ्यात ओला होतोय
मी ह्या जन्मात शूद्र आहे
आणि मी शेतीत स्वतःलाच पेरून
स्वतःच्या उगवण्याची वाट पाहतोय
कठीण आहे

वैश्य युद्धे करतायत क्षत्रिय होतायत
क्षत्रिय शेती करतायत शूद्र होतायत
शूद्र व्यापार करतायत वैश्य होतायत
वैश्य शेती करतायत शूद्र होतायत
शूद्र युद्धे करतायत राजे होतायत

वैश्य क्षत्रिय शूद्र होतायत
पण ब्राह्मण होत नाहीयेत
ब्राह्मण वैश्य शूद्र क्षत्रिय होतायत
पण ब्राह्मणच राहतायत

अस्पृश्य युद्धे, व्यापार, शेती करतायत
अस्पृश्यच राहतात

ब्राह्मणांना सर्वत्र प्रवेश
पण कुणालाच ब्राह्मणांच्यात प्रवेश नाही
अवर्णांना कुणातच प्रवेश नाही
मी मागे मागे जातोय
मी भूतकाळाला माध्यम बनवून समग्र काळ होतोय

मी निखळ माणूस होतोय
वर्ण जात वर्ग भाषा
माझ्या अंगावरून निघून चाललेत

मी प्रेम झालो की मी प्रेमात पडतोय
मी घृणा झालो की मी घृणेत पडतोय

एक विहीर आहे आत
जी प्रेमही पुरवतीये आणि घृणाही

प्रेमानं घडा बुडवलास तर प्रेम मिळेल
घृणेनं घडा बुडवलास तर घृणा

तू घडा बुडवतीयेस
आणि मी साक्षीभावाने
विहीर पाहतोय
जी वहात सुटलीये

कधीकाळी मी दरवाजावर कपड्यांवर, चप्पलांवर
चिडलो होतो
मला त्याचं आता हसू येतंय
आणि मी चाललोय
एक नाव माझ्या नावेवर आपटतीये
म्हणून मी तिच्यावर चिडतोय
तर ती रिकामी
एक चप्पल माझ्या डोक्यावर पडतीयें
म्हणून मी त्या माणसावर चिडणार
तर तिच्यात कुणाचे पायच नाहीत
एक दरवाजा माझ्या नाकावर आदळतोय
म्हणून मी दरवाजा ढकणाऱ्याला ठोसा मारणार
तर दरवाजामागे कोणीच नाहीये

तू येर्तःयेस
आणि मला रिकामी नाव दिसतीये
माझ्या काळजाचं पाणी पाणी होतंय
मी त्या दिशेनं वहात चाललोय
जिथे मी अस्तित्वातच नाहीये

**अप्सरा रिअल**

तू आहेस एक आदिम रहस्य
एक भिंत जिच्यावर आपटून आपटून
कैक डोकी फुटली
तू आहेस असं गूढ
ज्यातून मी जन्मलोय
आणि जन्मताना ज्याला त्या गूढाचं एक अक्षरही
वाचता नाही आलं

तुझ्याबाबतीत मी निरक्षरच आहे
आणि म्हणूनच की काय
निसर्गानं तुझ्यावर उमटवण्यासाठी मला दिलाय
माझ्या लिंगाचा हा अपरिहार्य अंगठा
जो तुझ्यावर उमटवूनही
मला वाचता येत नाही

-संत श्रीधरपंत 'घर'श्री
मु. पो. धरगाव, गोवा

Once Mickey n Donald had a fight. Donald banged Mickey on d wallsoon after Mickey was found writing

New 'Her'd Ramayan'

WHY

Bcoz Mickey had become

WALLMICKEY

-WALL KOOL -HI

"Man is an idiot"

" & woman?"

"Idiot - box"

-पुरषोत्तम स्त्रीद्वेष्टे

"36 - 24 - 36" इससे बडा सच क्या हो सकता है?

"O- cc-0"

-संत जानकीबाई सहजो

★★★

१

भाषा आदळतीये थेट डोळ्यात
कपड्यांना हस्तमैथुन करायला लावून
त्वचेवरून
घरंगळत
घरंगळत
घरंगळत
जिरून जातीये पायात
जे सापेक्ष आहेत
कायदे डोक्यात
प्रेम काळजात
भूक पोटात
काम लिंगात
आणि भटकंती पायात ठेवून
मी पूर्ण पुरुष शोधत
हिंडतोय माझ्यातच
माझ्याजवळ केवळ उत्तेजकं भडकणारी
तुझ्याकडे उत्तेजकं भडकवणारी आणि सृजकं भटकवणारी
तुझी द्विमानी उर्जा
मला एकमानी करत
माझ्या स्वाभिमानाची मान
मी कधीही मुरगाळू शकतेच्या आविर्भावात
मी अभावात
निर्लैंगिक होत
मला दिसतो आहे माझ्यातच एक बुद्ध
जो कधीही केव्हाही बनू शकतो स्त्री वा पुरुष
जिंकत आतबाहेरील युद्ध
आणि जो मला कळत नाहीये
माझ्यातच असून
आणि तू उमगत नाहीयेस तुझ्या समोर बसून
एका गूढ सर्जनचा तुम्हा दोघात पसरवणारा आनंद
मी मूढ पणानं पाहतोय खात कंद
तुमचे ग्लास सांतात वेगळे दिसतायत
आणि वाईन्स एकाच तोण्डानी अनंतात हसतायत

तुम्ही अनंताशी जोडले जाताहात आपसूक
मी मूक जणू सुधारता न येणारी चूक
तुझी उत्तेजना जी बर्फासारखी मर्यादित
आणि सृजना जी पाण्यासारखी मर्यादित
सहज जुळ्या मोजमापात बसवून
मला करतायत मर्यादित दाखवतायत माझा अंत
माझा पुरुषी कामरस मापटातच अडलेला
तुझा स्त्रैण कामरस मर्यादित
आणि अनंताशीही भिडलेला
तू इथे असूनही स्वर्गात ळचकत
आणि मी इथे
आणि फक्त इथेच -विचकत
उत्सुकतेपोटी तो स्वर्ग तुझ्या त्वचेत चाचपत
ज्याच्याविषयी बोलता येत नाही
म्हणून तो अस्तित्वात नाही असं भाषेला वाटतं
भाषा कानात काडी घालून मला विचारतीये
"बाई अस्तित्वातच नाही
कारण जे स्त्रैण आहे
ज्यामुळे स्त्री स्त्री आहे
त्याच्याविषयी बोलता येत नाही
कारण स्त्रैण मोजता येत नाही
ज्याच्या आसपास मुंग्यासारखं फक्त फिरता येतं
ज्याच्या आसपासच्या हवेविषयी
फक्त सिद्धांत रचता येतात
पण जे सिद्ध होत नाही
ज्याला कणात मोजायला गेलं
की जे तरंग होतं
जे तरंगात मोजायला गेलात
की ज्याचे कणकण होतात
जे भल्या भल्या कणादांना सापडत नाही
जे हृदयात फक्त तरंग उठवून
मेंदूच्या ठिकऱ्या उडवू शकतं
आणि त्या ठिकऱ्यांची बंदिश बांधून
त्या बन्दिशीतून एक वाद्य प्रसवून
ते पुरुषाच्या हाती ठेवून
जे त्याला बाईसारखं ते वाद्य वाजवायला भाग पाडू शकतं
सगळ्या बायका ज्याची उदाहरणे आहेत
पण व्याख्या नाही
त्याच्या मागे तू का?"
मी भाषेपासून काडीमोड न घेता
तुझ्या मौनामागचे ओठ
ओठाआडली जीभ
जीभेआतली भाषा
आणि भाषेमधली तू
चाचपडत चाचपतोय
धपापपतोय चपापतोय

आत्ता होती गेली कुठे
इथे होती? गेली कुठे
'होती - गेली' कुठकुठत

मी तुझ्या सुवासात उफाळतोय
मी माझ्या कोमेजलेल्या फुलात कोसळतोय
मी माझ्या मदन बाणात पुरुषी बाणा दाखवत ताठतोय
मी माझ्या केसांच्या तृणात ताणतणाव संपून परतत आटतोय

माझ्या सीमा मोजतायत तुझ्या असीमा
अनंत म्हणजे मोजताना मला आलेला थकवा ढीमा

तुझ्या घराला तळ नाही
आणि मी माझ्या तळघरात परत

तुझ्याकडून मला जे हवं ते मिळत नाहीये
आणि तू काय तेही मला समजत नाहीये
माझ्याकडून तुला जे हवं ते मिळत नाहीये
आणि मी काय आहे ते तुला पूर्ण कळून चुकतंय

एक दुःख वाहतंय
तुझ्या माझ्या त्वचेतून
पण ते पुरुषी आहे की स्त्रैण
थंड की ऊन
कळत नाहीये

भाषिक नौका

नौकानयन
नयन
आणि नेति नेतिचा अक्षरगण
एका संभ्रमात फुटतोय अमिबा
तू मी होतायत तयार
येतायत एकत्र
पण एक होऊ शकत नाहीयेत राहतायत सावत्र
काहीतरी असं जे घालतय बिब्बा
सापडतायत आकार
सापडत नाहीयेत
एकत्र असताना आपण किती पायाचे होतो
तेही आठवत नाहीये
अॅमिबिक - अॅनामिक- अनामिक
एकमेकांच्या विरहात
सतत आकार बदलणाऱ्या तंगड्या अडकवून कामिक
जे स्त्रैण आहेत तेच बुद्ध होणार असेल गमवून पाय
तर माझ्यासारख्या प्रचंड पुरुषी ऋषीनं करायचं काय?
लैंगिक नातं
जे अस्तित्वातच नाही
संपुष्टात येतंय
१ + १ = ० होतच नाहीये
पुरुषी त्वचेला भिडतीये स्त्रैण त्वचा
पण त्याखाली वाहताना मात्र
वाचेची बसतीये वाचा
बायकी हृदयात वितळतय मर्दानी हृदय
पण त्यामागचे श्वास
वेगळाच घेत वास
वेगळ्याच फुलात होतायत पसार बदलत लय
आपण धनऋण नाही आहोत ना एकदिठी
म्हणूनच आपणात धावणारी इलेक्ट्रिसिटी
एका सिटीत मारत नाहीये मिठी
नाही अंधारप्रकाश
म्हणूनच आपला लपंडाव
मांडून मांडून शेवटी मोडावासा वाटतोय सोडून एकमेकाचा गाव
आपल्या उत्तेजना मिळतायत
पण तुझी आधीकची सृजना
माझं आख्खं शरीर मोडीत काढतीये
दाखवत तिच्या फक्त खाणाखुणा
सृजना
तिला पाहताना माझे डोळे होतायत आंधळे
आणि मी आख्ख्या शरीराची तुझ्या शरीरात आपटत काठी
होणाऱ्या आवाजाच्या दाटीतून
तिचा अंदाज घेतोय घाटी
मी मुक्यांशी बोललोय
मी बहिऱ्यांशी बोललोय
मी परभाषिकांशी बोललोय
पण तुझ्याशी बोलण्याची भाषा
मला सापडतच नाहीये
माझ्याजवळ नुस्ते वर्ण आहेत
आणि मला फक्त तुझ्याजवळच राखीव असणारे स्वर
तुझ्या काळजात बसून गायलो खोलवर
तरी गवसत नाहीयेत
मैत्रिणीत मैत्रीण मिळो
मित्रात मित्र मिळो
वा मित्रात मैत्रीण मिळो वाजवत पवित्र घंटा
माझ्या कामहाताचा उंचवटा
शून्यासारखाच होत
फिरवतोय सगळ्या रेषांवर वरवंटा
तुझे कपडे
तुझे अलंकार
तुझा आहार्य
तुझी चप्पले
मला करतायत उत्तेजित
आणि माझा विश्वजीत रस
तुझ्या फक्त शरीरसौंदर्यापुरताच
राहतोय रसरशीत
तुला हवीय माझ्याकडून एक निखळ निष्ठा
आणि मी त्याबाबत खळखळ करत
तुझ्याशी खोटं बोलतोय टाकत भाषिक विष्ठा
तू माझ्याबरोबर झोपलीस
म्हणून तुझ्यावर प्रेम करतोय का?
मी तुझ्याबरोबर झोपलोय
म्हणून मी तुझ्याकडे आकर्षित झालोय का?
मी तुझ्याबरोबर झोपलोय
म्हणजे मी तुझ्यावर प्रेम केलंच पाहिजे का?
तू माझ्याबरोबर सहज झोपलीस
म्हणजे तू सहज मूर्ख उपलब्ध आहेस की काय?
कदाचित थेट म्हणूनच गुंतागुंतीचे वारे
स्पष्ट म्हणूनच डोळे आंधळे करणारे तारे
तुझ्या डोळ्यात माझ्या पेन्टींगचा एक आदर्श नमुना
माझ्या डोळ्यात फक्त तुझी गळणारी वस्त्रे त्यांची वस्त्रना
तुझ्या कल्पितात मी एक पुरुषोत्तम गहनतेचा झरा
माझ्या कल्पितात असंख्य मूल्य नसलेल्या अप्सरा
संस्काराने साकारलेला गैरसमज
त्याची गळामिठी
आणि गाणं शोधण्यापूर्वी माझा कटलेला गळा तुझी मरगळलेली दिठी
शक्यय की तुला हवा असेल एक थेट संभोग
आणि मला निखळ प्रेम
मला काहीही करता येत नाहीये फ्रेम
मी तुझ्या मागे मागे जात
थेट आईपर्यंत पोहचतोय आत आत
आई,
जिला मला स्तनातून पाजताना
भेटतोय योनीतून कामरस
जिला त्याबद्दल वाटतोय अपराधभाव
जी माझं दूध तोडतीये न होता टसमस
दुधाबदली आई मला पाजतीये तिची भाषा
शब्द - शब्द शब्द - शब्द
शब्दाशब्दांनी शब्द वाढवत वाढवतीये माझी अभिलाषा
मी फक्त तिला खूष करण्यासाठी
मातृभाषा शिकतोय
आणि तिला मला भाषा शिकवताना

कामरस मिळतोय
मी दुधासाठी आसक्त उपाशी
तिची भाषा पाजत कामरस पिणारी तृप्त काममाशी
मी होतोय उदास आणि भकास
आणि मला पाजले जातायत शब्द दास
माझे ओठ दुःखी
माझे पोट दुःखी
अनेक भावंडे अनेक भ्रूणो
एक आईपणाचा दुष्
एक बाईपणाचा दुष्का.
जो झिरपत झिरपत काळात
थेट तुझ्या माझ्या त्वचेत
एक आदिबंध बधीर
अधीर होण्याआधीच बंध मोडून काढणारा
एक विस्कळीत कारागीर धीर प्राप्त होण्याआधीच नातं खोडून काढणारा
तू माझ्याकडे करतीयेस तुझी साक्षर पाठ
माझ्या पोटातून जन्मतीये नाळ
जी तुझ्या पाठीवर लिहितीये
माझ्या आयुष्यातील आईपणाचा दुष्काळ
आणि मी तो वाचता वाचता होत आंधळा आणि सैरभर
गर्भाशयात परततोय
निरंतर
आणि निरक्षर
बये, थांबव ही लिखाणाची आग
बये, थांबव हा लेखनाचा जाळ
ही वळलेली पाठ
कर माझ्याकडे
घाल माझ्या आईच्या पोटात
माझी नाळ
आणि काळ बनून आलेली ही लेखणी
काढ मोडीत
मी जे लिहीन
ते पुरूषीच लिहीन
आता तूच भाषांतर तुझे सृजन
माझ्या उत्तेजनेत
तुझ्या अमर्याद नाचाने माझ्या मर्यादा वाच
आणि सगळे स्वर्ग माझ्यात नव्याने लिही
तुझ्या अस्सीम भाषेत
समान करून आयुष्याची बोटे पाच

## २. अप्सरेने श्रीधरला दाखवलेला भविष्यकाळ

मा. संपादक
स. न. वि. वि.
आम्ही
गणेश विलास कांबळे ऊर्फ काळे
प्रताप बाजीराव डोईफोडे ऊर्फ सरनोबत
अनंत कपिल मेश्राम ऊर्फ परब
मुद्दामच आमची नावे बदलून हे पत्र लिहितोय

गेली एक दीड शतके अस्पृश्य आणि अवर्ण ह्यांच्या समस्येवर चर्चा होत आहे आणि ही समस्या सोडवण्याचा अनेकजण प्रयत्न करत आहे. आम्ही इथे जो मार्ग अवलंबला त्याची चर्चा इथे करणार आहोत.

आम्ही तेच लोक आहोत ज्यांच्यावर घरात आंबेडकर व बुद्ध ह्यांचे फोटो न लावल्याबद्दल स्वतःची ओळख व जात लपवल्याबद्दल बायको, पळपुटे, ब्राह्मणी, दगलबाज, नाळ तोडणारे, पाठीत सुरे खुपसणारे अशा अनेक शेलक्या विशेषणांनी टीका होतीये. मात्र आम्ही असे का करतोय हे कुणी लक्ष्यात घेत नाही.

'जात' हे आमच्या मते ब्राह्मणांनी निर्माण केलेले एक स्थिर विशेष नाम आहे. ते विशेष नाम असल्याने त्याचा अर्थबोध बदलत नाही. हे विशेष नाम पूर्वी डिजीटल होते आणि मग ते कालांतराने रिअल झाले, वास्तव झाले आणि आमच्या पूर्वजांच्या पोटी वनवास आणि भोगवटा आला. पुढे म. फुले, शाहू महाराज, म. गांधी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर वगैरे लोकांच्या विशेष प्रयत्नाने अस्पृश्यतेचा प्रश्न ऐरणीवर आला. भीमरावांनी आम्हाला स्वाभिमान शिकवला व शिक्षण दिले. त्यांच्यामुळे आमचा उद्धार झाला. आम्ही सरकारी नोकर झालो. आमच्यातील कांबळे प्राध्यापक झाला. डोईपुढे पुढे अधिकारी झाला, तर मेश्राम सरकारी नोकरी सोडून व्यापारात पडला.

हे सर्व करत असताना आमच्या लक्ष्यात आले की हिंदू समाज हा सहिष्णू नाही, पण डोळेझाक करणारा आहे. खुला नाही, पण चोरट्या जागा निर्माण करणारा आहे. त्याला विशेष नामाबद्दल विशेष प्रेम आहे; कारण त्याला सनातनाचे आकर्षण आहे. क्रियापदे त्याला कंटाळवाणी वाटतात आणि क्रिया करणाऱ्यांचा दुरूनच जयजयकार करण्यात त्याला आनंद वाटतो. त्यामुळेच अशा समाजात इतिहास रचणाऱ्यापेक्षा दंतकथेच्या मिथ्सच्या नायकांना अधिक सन्मान आहे हा एक असा समाज आहे जो प्रत्यक्षापेक्षा भाषेत जगतो. अशा समाजात समता प्राप्त करण्याचे दोन मार्ग आहेत.

पहिला प्रत्यक्ष लढे उभारून आपल्या विशेष नामांना प्रतिष्ठा प्राप्त करून देणे. आपल्या संख्येच्या बळावर एकत्र महाकाय होऊन सत्ता प्राप्त करणे आणि सन्मानित होणे. हा मार्ग आंबेडकरांचा आहे, दादासाहेब गायकवाडांचा आहे. ह्या मार्गाने प्रतिष्ठा प्राप्त होईल आणि मग समतेनंतर आपापसांत रोटी बेटी व्यवहार होऊन हळूहळू जात नाहीशी होईल, अशी आशा आहे. हा मार्ग प्रत्यक्ष युद्धभूमीवर लढणाऱ्यांचा आहे. सगळेच शूद्र, अतिशूद्र, आदिवासी, भटके हे क्षत्रिय होते आणि 'क्षत्रिय' होणे हा त्यांचा विशेष होता असं मानणाऱ्यांना मानसिक पातळीवरही ही प्रत्यक्ष लढाई समाधान देणारी मर्दपणाची फील देणारी ठरू शकते.

दुसरा आमच्यासारख्या बायकी, पळपुट्या, ब्राह्मणी, दगलबाज वगैरे लोकांचा आहे. आमच्या मते चिन्हसृष्टीच्या जागतिकीकरणाच्या ह्या युगात चिन्हांना एकाचवेळी महत्त्व आणि उथळपणा प्राप्त होत आहे. त्यामुळेच तुमच्या विशेष नावांना महत्त्व आहे, पण ती विशेष नामे कुणी पिढ्या न् पिढ्यांचा इतिहास खोलून काढून पहात नसल्याने त्यांच्या इतिहासाचा अंत होतो आहे आणि ह्या इतिहासाच्या अंतामुळेच ही विशेष नामे उथळही होत आहेत.

भारत सरकारने आडनावे, नावे बदलण्यास कायदेशीर परवानगी देऊन ही विशेष नामे विचलित करण्याची सुवर्णसंधीच उपलब्ध करून दिली आहे. भारतात शतकानुशतके बायका सासरी जाताना आपले माहेरचे नाव टाकून सासरचे नाव स्वीकारून आपली ओळख, आपली जात, आपला धर्म सहजरित्या बदलत आहेत. ह्या पुरुष संस्कृतीने त्यांच्यावर सक्तीने लादलेले हे भाषिक विचलन हे भाषांतर हे नामांतर आपणाला मात्र फारच उपकारक ठरू शकते. आपण एकदा आपली जात दर्शवणारी आडनावे टाकून उच्च जात दर्शवणारी आडनावे लावली किंवा सुदैवाने तशी आडनावे मुळातच असल्यास ती लावली आणि दोन तीन पिढ्या आपण उच्च जातीय असल्याचा भडिमार केला, तर तीन पिढ्यानंतर समोरचे लोक आपणाला उच्च जातीचे समजतीलच, पण स्वतः आपले पणतू, त्यांचे नातू, पणतीही स्वतःला उच्च जातीचे समजू लागतील. हा बदल आमच्या नातवंडात घडताना आम्ही प्रत्यक्ष पाहतो आहोत. जागतिकीकरणाच्या ह्या काळात इतके स्थलांतर होते आहे की, तुमच्या विशेष नामाची तथाकथित जातीय मुळे शोधणे जगण्याच्या वेगामुळे शक्यच होत नाहीये. अशावेळी स्वतःचे चिन्हांतर घडवून आणणे ही जाती व्यवस्था नष्ट

करण्याचा सर्वात वेगवान उपाय आहे. ह्याबाबत आपण खोटेपणा करत आहोत असे काहींना वाटेल; पण जात हीच जर खोटी असेल तर तिच्याबाबत काय खरे आणि काय खोटे. शेवटी स्पर्श हाच प्रत्यक्ष आणि प्रत्येक माणसाचा स्पर्श हा जर माणसाचाच असणार असेल तर हे खोटेपण आपल्याला अधिक वेगाने माणूसपणाकडे नेईल. ह्याला कुणी ब्राह्मणी कावाही म्हणतील; पण बामणी काव्याला बामणी काव्यानेच उत्तर दिले तर बिघडले कुठे?

पहिल्या मार्गात चिन्हांतर व्हायला व प्रतिष्ठा प्राप्त व्हायला किती पिढ्या जाव्या लागतील हे कळणे कठीण. भारतीय लोकांच्या भाषिक मानसात जातीयता इतकी खिळून आहे की, सातव्या पिढीनंतरही एखाद्या अस्पृश्यास पंतप्रधान पद प्राप्त झाले तर त्याला 'अस्पृश्य' पंतप्रधान संबोधल्याशिवाय भारतीय जनता राहणार नाही. त्याउलट आमच्या मार्गाने गेल्यास त्या पंतप्रधानाला तो स्वतःच उच्च जातीचा वाटेल व इतरांनाही ते मान्य होईल. मुळातच त्या पदापर्यंत पोहचता पोहचता त्याच्या घराण्यात इतकी आंतरजातीय लग्ने नकळत झालेली असतील की कुणालाही त्याच्या जातीचा पत्ता लागणे शक्य नाही. खुद्द त्यालाही आपली विशिष्ट जात सांगता येणे शक्य होणार नाही. एरव्हीही बरेचसे शूद्र आपले कर्तृत्व सिद्ध झाले की स्वतःला क्षत्रिय म्हणवून घेतात. मग अस्पृश्यांनीच कुणाचे काय घोडे मारले आहे? शेवटी बाबासाहेब आंबेडकरांचेही आडनाव बदलले गेले नव्हते काय? जे त्यांच्याबाबतत अपघाताने घडले ते आपण हेतूपूर्वक का घडवू नये?

एकंदरच दलित समाजातील फाटाफूट पाहता आणि बहुजन समाजात झपाट्याने होणाऱ्या बदलाचा वेग पाहता दलित चळवळ कदाचित लवकरच एक थंडगार गोळा होऊन जाईल आणि अशावेळी सैन्याच्या चिरफाळ्या घेऊन उघडपणे लढण्यापेक्षा आमच्यासारख्यांचा गनिमी कावा हाच दलित समाजाला अधिक तारक ठरेल. पहिला मार्ग साधूंचा आणि आमचा मार्ग संधीसाधूंचा वाटण्याची शक्यता आहे; पण मुळात जातीव्यवस्थेत औषधापुरताही साधूपणा नसल्याने आणि ती ब्राह्मणांच्या संधीसाधूपणामुळे निर्माण झाल्याने ती नष्ट करण्याचे सगळेच मार्ग साधू आहेत. अंतिमतः जे मार्ग नैतिकता साधतात ते साधूच असतात.

आमचे हे विवेचन वाचून कदाचित काहींना हे दोन्ही मार्ग एकसाथ अनुसरावे असेही वाटेल. ते सकृतदर्शनी शक्य होईल असे वाटत नाही, पण तरीही जर कुणाला तसे करणे शक्य असल्यास तसे खुशाल करावे.

शेवटी आंबेडकरांच्या प्रत्यक्ष जयजयकारापेक्षा जातीव्यवस्था प्रत्यक्ष आणि तात्काळ नष्ट होणे हे गरजेचे आहे. बाबासाहेब म्हणाले होते, "गावकीची कामे सोडा, गाव सोडा, धर्म सोडा" आम्ही म्हणतो, "कामे तर सोडाच, गाव तर सोडाच; पण जातही सोडा आणि जात दर्शविणारी विशेष नामेही (नावे आणि आडनावेही) सोडा."

अर्थात ह्या प्रक्रियेत दलितांना काही विशेषाधिकार गमवावे लागतील ते उघड आहे. विशेषतः आरक्षण! पण मुळात आम्ही जो मार्ग सांगतो आहे तो आरक्षणामुळे किंवा आरक्षणाशिवाय आर्थिक सुबत्ता प्राप्त झाल्यानंतरचा आहे. आर्थिक सुबत्ता प्राप्त होण्याआधीच कुणी हे धाडस दाखवले तर ते स्वागतार्ह आहे.

दुसरा विशेषाधिकार हा साहित्यातला आहे, पण मुळात हा विशेषाधिकार आज ना उद्या नष्ट होणे अटळ आहे. जातीयता नष्ट झाल्यानंतर दलित साहित्य कशाला म्हणणार? की त्यावेळी आता जी सोयीस्करीत्या टाळली जाते ती वर्गीय कसौटी लावणार? मग आत्ताच दलितांशी तादात्म्य पावून श्रीधर तिळवेसारखे जे अदलित लेखक आहेत त्यांना दलित साहित्यिक का म्हणू नये? असे केल्याने दलित साहित्य व्यापक होणार नाही काय? एकीकडे बहुजन समाजाने आपल्याला सामील व्हावे असे म्हणायचे आणि एखादा ब्राह्मण वा बहुजन समाजातला साहित्यिक दलितांशी तादात्म्य पावून दलितांचे चित्रण करत असताना त्या कलाकृतीला केवळ लेखकाची जात पाहून अदलित साहित्य म्हणायचे ही वेगळ्या प्रकारची जातीयताच नव्हे काय? हा एका अर्थाने त्या कलाकृतीच्या बाहेरचा कलाबाह्य असा निकष नव्हे काय? एखादी कलाकृती दलित की अदलित हे त्या कलाकृतीतील आशय पाहूनच ठरवणे योग्य नव्हे काय? दलित अशय म्हणजे नेमका कोणता आशय? त्या आशयाचे स्वरूप काय हे आपण कधी निश्चित करणार आहोत की नाही? आमच्या मते दलित आशय म्हणजे दलित व्यक्तीचे, त्यांच्या समाजाचे, त्यांच्या अनुभवविश्वाचे, त्यांनाच प्रमुख झोतात ठेवून केलेले असे चित्रण जे ब्राह्मण्यावर जातीव्यवस्थेवर, वर्णव्यवस्थेवर टीका करून त्याची विरचना करून त्यांना मोडीत काढते वा त्यासाठी चाललेल्या धडपडीला, लढाईला, चळवळीला विधायक बळ पुरवेल असे चित्रण करते. हे आपणाला आपली नावे आडनावे बदलूनही करता येणे शक्य आहे आणि उच्च जातीय म्हणून मिरवणेही शक्य आहे. फक्त दलितांशी तादात्म्य पावणाऱ्या साहित्यिकांना वा कलावंतांना आपणाला सामील करून घ्यावे लागेल इतकेच!

तिसरा विशेषाधिकार हा भाषेविषयीचा आहे. आपल्या अवर्णांच्या काही जाती जमातीनिष्ठ बोली आहेत आणि त्यात बोलण्याचा व लिहिण्याचा विशेषाधिकार आपणास प्राप्त होतो. आमचा प्रश्न असा की ह्या बोलीभाषेत आइन्स्टाईन, हायझेनबर्ग, स्टीफन हॉकिंग्ज ह्यांचे वैज्ञानिक सिद्धांत कार्ल मार्क्स, बरट्रॉण्ड रसेल ह्यासारख्यांची तत्त्वज्ञाने, अमर्त्य सेन, स्वामीनाथन ह्यासारख्यांचे आर्थिक सिद्धांत सांगता येणे शक्य आहे काय? आपल्या बोलीभाषा ह्याबाबत फारशा उपयोगी नाहीत. त्या टिकल्या कारण अशा प्रकारच्या ज्ञानाशी व माहितीशी त्यांची ह्यापूर्वी गाठच पडली नाही तेव्हा अशा ज्ञान माहितीसाठी प्रमाण भाषा स्वीकारण्याशिवाय आपल्याला पर्याय नाही. केवळ साहित्यिकांना उपयोगी पडणाऱ्या बोलीभाषा ह्या साहित्यिकांना त्यांचा विशेषाधिकार टिकवण्यासाठी उपयोगी असल्या तरी विज्ञान, ज्ञान व तंत्रज्ञान आत्मसात करायला निघालेल्या आपल्या समाजाला त्यांचे ओझे वहायची काहीच गरज नाही. मुळात जर त्या त्या बोली भाषा त्या त्या भाषेत बोलणाऱ्यांच्या नातवंडानी पणतवंडानीच फेकून दिल्या तर साहित्यिक काय त्या बोलीभाषांचे लोणचे घालणार आहेत? हां ह्या बोलीभाषेतील चांगले व प्रमाणभाषेत नसणारे शब्द ज्यांना आपण बोलशब्द म्हणू; मात्र आपण बोलणाऱ्या प्रमाणभाषेत जिरवणे निश्चितच गरजेचे आहे. ब्राह्मणांचे प्रमाण भाषेला जे योगदान द्यायचे होते ते जवळ जवळ देऊन संपले आहे. आता प्रमाण भाषा समृद्ध करण्याची जबाबदारी ब्राह्मणेतरांची आहे आणि ब्राह्मणेतर ती पार पाडतील अशी खात्री वाटते.

एकेकाळी ब्राह्मणांनी परशुरामाने सगळे क्षत्रिय मारले असा कांगावा केला. नंतर हेमाद्रीने तेराव्या शतकात ब्राह्मणाने वैश्य व शूद्र ह्यांच्या हातचे अन्न स्वीकारू नये असे सांगितले, तर पराशरमाधवीयमध्ये चौदाव्या शतकात शेती, व्यापार आणि हस्तव्यवसाय हे वैश्य आणि शूद्र दोघांनाही सांगितले, तर पुढे कमलाकर भट्टाने 'कलियुगात वैश्य दुर्मिळ आहेत' असे सांगून सतराव्या शतकात वैश्य लोप पावले आहेत हे स्पष्टच सांगून टाकले. ह्या सगळ्या भाषिक घडामोडीमुळे क्षत्रिय आणि वैश्य हे दोन्ही वर्ण जवळ जवळ नाहीसे झाले आणि ब्राह्मण व शूद्र हे दोन वर्णच उरले. आता काळ उलटा वाहतो आहे. हा काळ व्यापाराचा आहे. ह्या काळात आपण आपली विशेष नामे बदलून चिन्हांतर घडवले तर क्षत्रिय व वैश्य हे दोनच वर्ण उरतील आणि बाकीचे वर्ण नाहीसे होतील. हळूहळू ह्या दोन वर्णातील आंतरजातीय विवाहामुळे तेही वर्ण नाहीसे होतील आणि भारतीय समाज हा समान व एकात्म होईल.

आपले विश्वासू,

**गणेश विलास कांबळे ऊर्फ काळे**

**प्रताप बाजीराव डोईफोडे ऊर्फ सरनोबत**

**अनंय कपिल मेश्राम ऊर्फ परब**

**मा. संपादक**

स. न. वि. वि.

आपल्या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेले आणि आम्हा दलितांपुढे विचारांसाठी ठेवलेले काही दलितांचे (?) पत्र वाचले. पत्र वाचल्यावर महात्मा गांधी मागील दाराने पुन्हा दलित चळवळीत दाखल झाले की काय अशी शंका आली! म. गांधींनी अस्पृश्यांना हिंदू समाजाशी तादात्म्य होण्याचा जो सल्ला दिला त्याचा हा डिजीटल अवतार वाटला.

ह्या सल्ल्याला आम्ही 'बायकी' म्हणणार नाही. कारण 'बायकी' म्हणजे काय हे ह्या भारतीय समाज रचनेत अजूनही पुरेसे स्पष्ट झालेले नाही. ह्या सल्ल्याला आम्ही ब्राह्मणीही म्हणणार नाही. कारण तो 'ब्राह्मण्य' संपुष्टात आणण्याच्या कळकळीने दिला गेलाय. त्याला 'पळपुटा' हेच विशेषण योग्य होईल. हिंदू समाज हा डोळेझाक करणारा असल्याने त्याच्या डोळ्यात धूळ फेकण्याचा हा प्रयोग दिसतो आहे. मुळात हिंदू समाज हा डोळेझाक करणारा नसून डोळे असून आंधळा असणारा आहे आणि आंबेडकरी चळवळीचे उद्दिष्ट हे त्याचे डोळे उघडणे हे आहे. त्याच्या डोळ्यात धूळ फेकणे हे नव्हे; पण डोईफोडे सारख्यांना हे कळणे अवघड आहे. कारण म. गांधींनी त्यांच्या समाजाच्या डोळ्यात धूळ फेकल्याने त्यांना हा धूळ फेकण्याचा उपाय सुचलेला दिसतो.

'जात' ही ह्या देशात एक विशेष नाम नसून ती एक विशेष वस्तुस्थिति आहे. ती वस्तुस्थिति शतकानुशतके बदलत नसल्यानेच तिचा अर्थबोध बदलत नाही. कदाचित ती एकेकाळी डिजीटल असेल, पण तसा पुरावा सापडत नाही. ती कशी निर्माण झाली हे कोडे अद्यापही पूर्ण सुटलेले नाही. खुद्द बाबासाहेब आंबेडकर ह्यांनी 'Castes In India-Their mechanism, Genesis and Development reprint in Govt of Maharashtra, Education Department. Dr. Babasahed Ambedkar-writing and speeches. vol. 1, Bombay, 1979 p. 16 वर म्हटल्या-प्रमाणे "ब्राह्मणांनी जात निर्माण केली असे म्हणणे वैचारिकदृष्ट्या चुकीचे आणि हेतुतः द्वेषमूलक आहे. ब्राह्मणेतर जनतेवर जातीव्यवस्था लादणे त्यांच्या कुवतीच्या बाहेर होते. आपल्या लवचिक तत्त्वज्ञानाने त्यांनी प्रक्रियेला मदत केली असेल" ब्राह्मणांनी जातीव्यवस्था निर्माण केली नाही, त्यांनी ती फक्त टिकवण्यासाठी मदत केली. ही जातीव्यवस्था ब्राह्मणांच्या इतकीच बहुजन समाजाच्याही हाडीमांसी खिळली आहे.

ती नाहीशी करण्यासाठी प्रत्यक्ष लढा लढण्याशिवाय पर्याय नाही. खरा मार्ग आडनाव बदलणे हा नसून आपल्या आडनावाशी जी जात जोडली गेलीये ती नाहीशी करणे हा आहे. जातीनिष्ठ आडनावे ही फक्त भारतातच होती असे नव्हे. ब्रिटिश समाजातही वूडकटर, ब्लॅकस्मिथ, व्हिवर अशी व्यवसायनिष्ठ नावे होती; पण आज ह्या आडनावाशी कुणीही त्यांचे व्यवसाय जोडत नाही. कारण व्यवसाय आणि आडनाव ह्यांचा जो मानसिक संबंध त्यांच्या परंपरेत जोडला गेला होता तो आधुनिकता अवतरल्यानंतर त्यांच्या मनातून आपोआप नाहीसा झाला जेव्हा त्या आडनावाच्या लोकांनी त्या आडनावाशी जोडले गेलेले व्यवसाय सोडून दिले. भारतात आज ना उद्या ही परिस्थिति आल्याशिवाय राहणार नाही. किंबहुना असा जातीमुक्त समाज आणणे हे आंबेडकरवादाचे उद्दिष्ट आहे ते साध्य झाले आणि परंपरानिष्ठ आडनाव निष्ठ व्यवसाय बदलले गेले की लोकांच्या डोक्यातून त्या आडनावाशी निगडित असलेली जातही निघून जाईल आणि ही आडनावेही जातीमुक्त होतील. जातीमुक्त आडनावे बदलून जात नाहीशी करण्यापेक्षा आडनावांनाच जातीमुक्त करून जात नाहीशी करणे ही ह्या काळाची गरज आहे. ब्राह्मणांच्यात ही प्रक्रिया जवळ जवळ पूर्ण होत आली आहे. महारही हळूहळू त्या दिशेने प्रवास करतायत. मुळात भारतातच आडनावांचे चार प्रकार आहेत.

**१) विश्विय किंवा धर्मनिष्ठ आडनावे** उदा. अग्निहोत्री, द्विवेदी, गुरव, त्रिवेदी, चतुर्वेदी, दीक्षित.

**२) क्षेत्रिय आडनावे** : उदा. माडगूळकर, कोल्हापूरकर, बांदेकर, शिरोडकर ह्यात क्षेत्रांशी संबंधित आडनावे येतात.

**३) विशिय किंवा व्यावसायिक आडनावे** : उदा. लोहार, सराफ, सुतार, मेहतर ही प्रामुख्याने व्यवसायाशी निगडित नावे आहेत.

**४) चिन्हिय आडनावे** : ह्यात उरलेल्या सर्व आडनावांचा समावेश होतो. त्यातील काही किताब म्हणून दिली गेलेत. उदा. सरनोबत. काही तर का आहेत त्याचा पत्ता लागत नाही. ह्यातील अनेक आडनावे अनेक जातीवर्णात आढळतात. उदा. काळे, पवार. ह्यातील काही त्या त्या मूळ वंशाची असावीत असा संशय आहे.

तेव्हा तुमचे आडनाव प्रत्येक वेळी तुम्हाला उच्च जातच पुरवेल ह्याची खात्री नाही. पत्रलेखकापैकी एकाने काळे असे घेतलेले आडनाव ते फक्त ब्राह्मण आहे ह्या गैरसमजापोटी धारण केलेले दिसते; पण वस्तुस्थिती अशी आहे की, ते बऱ्याच वर्णात आढळते. भारतातील ५०% हून जास्त आडनावे ही बहुजातवर्णीय असल्याने ती आधीच जातवर्णमुक्त आहेत. त्यात प्रामुख्याने चिन्हीय व क्षेत्रिय आडनावांचा समावेश होतो. जी विश्विय आडनावे आहेत त्यातील बरीचशी ब्राह्मण वर्णाशी निगडित असल्याने ती बरीचशी सन्माननीय झाली आहेत. ब्राह्मणांना ती सोडावीशी वाटणे शक्यच नाही. म्हणजे प्रश्न फक्त विशिय आडनावांचा आहे आणि त्यांचे प्रमाण फक्त २० ते २५% असल्याने आडनावावरून जात कन्फर्म करणे हे फक्त २० ते २५% आडनावाबाबतच शक्य आहे. अशा लोकांनी त्यांना वाटतअसल्यास आडनावाचा त्याग करावा. त्यासाठी उगाच गाजावाजा करून नामांतर चळवळ उभी करण्याची गरज नाही. ह्या लोकांनी शक्यतो ब्राह्मणी आडनावे घेणे टाळावे. कारण ब्राह्मण आता हा देश सोडून पळून गेलेत किंवा जाण्याच्या तयारीत आहेत. तेव्हा इथे जे ब्राह्मण राहतील ते 'गरीब बिच्चारे अल्पसंख्याक' होण्याची शक्यता आहे. त्यापेक्षा ह्या आडनाव बदलू लोकांनी बहुवर्णजातीय अशी आडनावे निवडावीत म्हणजे ही आडनावे अधिकच वर्णजातीमुक्त होतील. अशी आडनावे प्रामुख्याने क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या समाजात अधिक प्रमाणात आहेत. कारण फार पूर्वीपासून हे वर्ण एकमेकांचे व्यवसाय करत आलेत. जो बहुजनसमाज ह्या तिन्ही वर्णापासून बनलाय त्याला ब्राह्मणांनी कित्येक शतकापूर्वी 'शूद्र' ह्या एकाच वर्णात ढकलले आहे. हा समाज आपला शत्रू नाही; मात्र त्यांच्यात असलेले 'ब्राह्मण्य' आपले शत्रू आहे. हा आपल्या मित्राच्या डोळ्यात घुसलेला काटा आहे आणि तो आपल्याला प्रेमाने जागृत करूनच आता काढावा लागणार आहे.

बाबासाहेब आंबेडकरांच्यावेळी आपला लढा हा क्षेत्रिय होता. कारण त्यावेळी स्मृतिश्रुतीपुराणोक्त धर्माचा जयजयकार करणारे ब्राह्मण प्रभावी होते. त्यामुळे हे युद्ध थेट होते आता हा ब्राह्मण पुरता मेला नसला तरी पन्नास वर्षांत त्याचा प्रभाव बराच ओसरला आहे. खरी चिंता आहे ती बहुजन समाजातल्या ब्राह्मण्याची, तर त्याच्याशी जो लढा द्यावा लागेल तो विशिय असेल विशिय आहे. विशियता आली की व्यापार आला. देवाणघेवाण आली. वाटाघाटी आल्या तर ही देवाणघेवाण तुम्ही 'ब्राह्मण्य' सोडा आम्ही संख्यात्मक ताकद देतो त्या बदल्यात आम्हालाही सत्तेत वाटा द्या ह्या तत्त्वावरच होऊ शकते. केवळ आडनावे बदलून व उच्च जात सांगून ह्या वाटाघाटी होणे शक्य नाही. कारण उच्च जातीत जाणे ह्याचा अर्थ आपले संख्यात्मक बळ घटवणे असा होतो. असे संख्यात्मक बळ घटणे आपल्याला समूह म्हणून परवडणारे नाही. आज ना उद्या ह्या वाटाघाटी आंतरजातीय विवाहात बदलल्याशिवाय राहणार नाहीत आणि हे आंतरजातीय विवाहच जातीसंस्था नष्ट करतील. शेवटी व्यापार अस्तित्वात नसलेल्या गोष्टींचा होऊ शकत नाही. तो फक्त अस्तित्वात असलेल्या गोष्टींचाच होऊ शकतो. जात ही अस्तित्वात नाही. त्यामुळे तिचा व्यापार होऊ शकत नाही. त्यामुळे आंतरजातीय विवाहाच्या वाटाघाटीत तिची किंमत शून्य होणे अटळ आहे. फक्तआपण आर्थिक सुबत्ता प्राप्त करणे गरजेचे आहे. राखीव जागांमुळे आर्थिक सुबत्तेचा दरवाजा खुलतो म्हणूनच आपण त्या मागतो.

आता प्रश्न दलित साहित्याचा तर प्रश्न दलित साहित्यातील आशयाचाच आहे. दलित जातीबाहेरील माणसाला तो आशय पेलला आहे असे दिसत नाही. श्रीधर तिळवेंचे जे उदाहरण त्यांनी दिलंय ते अनुचित आहे. तिळवे हे गेली अनेक वर्षे बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचा विचार करत असले तरी ते बौद्ध नाहीत. त्यांनी बौद्ध धर्म स्वीकारलेला नाही ह्यावरूनही हे स्पष्ट व्हावे. इतर अदलित लेखकांचीही वेगळी व्यवस्था नाही. यदाकदाचित कुणा अदलिताचं दलिताशी तादात्म्य होतच असेल तर त्याला आपण मैत्रय दलित साहित्य अशा वेगळ्या कॅटेगरीत घालावं.

प्रमाण भाषेबाबत त्यांचे म्हणणे बरेचसे मान्य आहे.

थोडक्यात आडनावे बदलून क्षत्रिय वैश्य होण्यापेक्षा जातीव्यवस्था मोडून काढून आडनावांनाच जातीवर्णमुक्त करणे हे अधिक शहाणपणाचे आहे. जे लोक पाठीमागच्या दारातून येऊ पाहतात त्यांना घरात 'पुढील' दाराने कधीच सन्मानाने प्रवेश मिळत नाही.

जय भीम !

आपला विश्वासू
**लोकनाथ देवराज बनसोड**

**मा. संपादक**
स. न. वि. वि.

आपल्या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेले मा. आयु. लोकनाथ देवराज बनसोड ह्यांचे टीपण वाचले. त्यात त्यांनी माझ्या संदर्भात जो उल्लेख केलाय त्याबद्दल काही खुलासा.

त्यांनी म्हटलंय की, मी बौद्ध धर्म स्वीकारला नाही: माझा प्रश्न असा की, बौद्ध धर्म स्वीकारणे म्हणजे काय? कुठल्यातरी बौद्ध भिक्खुकडून दीक्षा घेणे? मला बुद्धाला भेटायचे असेल तर मी कशाला त्याच्या मधल्या एजंटाला भेटू? बाबासाहेबांनी कुणाच्या तरी द्वारा दीक्षा घेतली हा त्यांचा निर्णय योग्य की अयोग्य ते मला ठरवण्याचा हक्क नाही; पण त्यामुळे त्यांनी पुरोहित नावाचा प्रकार नकळतपणे स्वीकारला असे माझे स्पष्ट मत आहे. एकदा तुम्ही पुरोहितपणा स्वीकारला की त्याचे थोरले शक्तीशाली भावंड 'ब्राह्मण्य' पाठीमागून येतेच येते हा धर्मसंस्थांचा इतिहास आहे. दुसरी गोष्ट मला बौद्ध धर्मात काडीचाही रस नाही. मला रस आहे तो बुद्धाच्या आध्यात्मात निर्वाण प्राप्त करण्याच्या त्याच्या मार्गात ! त्यामार्गावरून मला चार पावले जरी टाकता आली तरी माझे आयुष्य सार्थ झाले असे मी समजेन. हे करण्यासाठी कुठल्या बौद्ध भिक्खुची मला गरज आहे असे वाटत नाही किंवा बुद्धाच्या मूर्तीपुढे लवण्याचीही मला आवश्यकता वाटत नाही. सुदैवाने बुद्धाने केलेला बराचसा उपदेश बऱ्यापैकी मूळ रूपात उपलब्ध आहे. त्याच्या धम्मपदाचे एक पान जरी मला जगता आणि अनुभवता आले तरी खूप झाले. हां आता हे करताना खरोखरच कुणी नवा जिवंत बुद्ध माझ्यासमोर आला तर त्याच्या पायाचे पाणीही पिण्याची माझी तयारी आहे; मात्र असा जिवंत बुद्ध मला अद्याप तरी भेटलेला नाही. भारतात सर्वत्र आध्यात्माऐवजी धर्माचा बाजार आहे आणि मला कुठल्या धर्माच्या बाजारात उभे रहायचे नाहीये.

दलित की अदलित हा प्रश्न मला वैयक्तिक पातळीवर दुय्यम वाटतोय. त्याला उत्तर द्यायला मी अजून तरी जातीवंत लेखक झालेलो नाही. माझा आग्रह माणूस आहे. मानवता आहे. माणसाला समग्र आणि संपूर्ण पाहणे हा माझा अट्टाहास आहे. त्यात दलित माणूस दलित समूहही येतो. जातीव्यवस्था ही मानवतेच्या संपूर्ण विरोधी आहे. म्हणून ती मुळापासून उखडली गेली पाहिजे हा माझा त्यामुळेच आग्रह आहे. त्यासाठी मला साहित्यात जे करता येणे शक्य आहे ते मी करत असतो. आता हे साहित्य दलित आशयाचे आहे की नाही ह्या प्रश्नाचे उत्तर ज्या त्या वाचकाने द्यायचे आहे. ते देताना कुणाला माझी जात पाहणे, जात शोधणे गरजेचे वाटत असेल तर त्याने ते जरूर करावे. मला त्यात वैयक्तिक रस नाही. माझ्या 'एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्‌गार' ह्या संग्रहाविषयी एक गंमत सांगावीशी वाटते. ज्यांना मी दलित आहे असे वाटत होते त्यांनी हा संग्रह वाचला तेव्हा त्यांना त्यात दलित आशय आढळला, तर ज्यांना मी अदलित आहे असे वाटत होते त्यांना हा संग्रह अदलित वाटला. जातीयता आपले वाचनही कसे हेतूग्रस्त करते त्याचा हा नमुना. असो.

आपला
**श्रीधर तिळवे**

**मा. संपादक**
स. न. वि. वि.

आपल्या टीपणावरची लोकनाथ बनसोड ह्यांची प्रतिक्रिया वाचली. त्यांच्या आत्मविश्वासाचे कौतुक वाटले. मात्र ते अजूनही आंबेडकरांच्या छायेतून बाहेर पडलेले नाहीत असे वाटले. आम्हाला आंबेडकरांविषयी प्रचंड आदर आहे; पण दलितांचे ते एकमेव त्राते होते हे मात्र मान्य नाही. दलितांच्या उन्नयनात अनेक बहुजन समाजाच्या पुढाऱ्यांचे योगदान आहे. शाहू महाराजांनी निर्माण केलेले राखीव जागांचे धोरण, म. गांधींच्या अनुयायांनी निर्माण केलेल्या शिक्षण संस्थांत (ह्यात भाऊराव पाटलांची प्रसिद्ध रयत शिक्षण संस्थाही येते) अस्पृश्यांना मिळालेले शिक्षण, काँग्रेसने स्वीकारलेला लोकशाही समाजवाद ह्या साऱ्यांचा त्यात वाटा आहे.

आंबेडकरवाद्यांना सतत पुणे करार आठवतो आणि ते गांधींना झोडपत सुटतात; पण ह्याच गांधींनी नंतर आंबेडकरांना कायदेमंत्रीपद द्यायला लावले हे विसरतात. गांधी जर अस्पृश्यांचे शत्रू असते तर त्यांनी हे केलेच नसते. गांधी आणि आंबेडकर ह्यांच्यातला वाद हा वरकरणी तात्त्विक वाटत असला तरी खरा वाद अस्पृश्यांचे नेतृत्व कुणी करायचे हा आहे. दोघांनाही एकमेकांचे नेतृत्व सहन होत नव्हते हेच त्यातील सत्य आहे. दोघांच्याही अग्रक्रमातही फरक होता. आंबेडकरांना समाजकारण करायचे होते त्यामुळेच ते त्याबाबत एक ठाम भूमिका घेऊ शकले. त्यामुळेच त्यांनी एवढी मोठी स्वातंत्र्य चळवळ चाललेली असताना त्यात ब्रिटिशांविरुद्ध एकदाही ठाम भूमिका घेतली नाही. आंबेडकरांसाठी समता हे तत्त्व सर्वात मोठे होते. कारण ही समताच दलित समाजाचे भले करू शकली असती. त्यामुळेच दलित समाजाचे मुख्य नेतृत्व हे आंबेडकरांचे होते हे आम्हाला मान्य आहे; मात्र ह्याचबरोबर गांधीनाही दलित समाजाने नीट समजून घेतले पाहिजे असे आम्हास वाटते. गांधींना मुख्यतः राजकारण करायचे होते. त्यामुळे सर्वांना सोबत घेऊन जाणे त्यांना गरजेचे होते. त्यामुळेच ते राजकारणाबाबत एक ठाम भूमिका घेऊन होते. त्यांच्या सोबत जे नेते होते त्यातील ५०% हे ब्राह्मण होते आणि त्यांना सोबत घेऊन जाण्यावाचून त्यांच्यापुढे पर्याय नव्हता. शेवटी ते वैश्य होते आणि त्यांच्या आधी जवळ जवळ किमान एक हजार वर्षे एकाही वैश्याने भारतीयांचे नेतृत्व केले नव्हते. भारतीयांच्या संपूर्ण चार हजार वर्षांच्या इतिहासात प्रथमच भारतीयांचे राजकीय नेतृत्व ब्राह्मण आणि क्षत्रियाखेरीज इतर वर्णाकडे गेले. हा बदल केवढा मोठा होता ह्याची कल्पना आता येणे शक्य नाही. भारतीय इतिहासात वैश्य आणि शूद्र हे कायमच एकमेकांत बांधले गेलेत. त्यामुळेच गांधीजींचे वैश्य नेतृत्व येताच ताबडतोब शूद्र नेत्यांचा रस्ताही मोकळा झाला आणि आख्खा बहुजन समाज स्वातंत्र्य चळवळीत दाखल झाला. फुले आणि आंबेडकर ह्यांना राजकीय नेतृत्व करायचे नसल्याने ते हवे तसे ब्राह्मणांवर तुटून पडू शकत होते. गांधींना राजकारण करायचे असल्याने त्यांना ब्राह्मणांवर तुटून पडता येणे शक्य नव्हते. कारण स्वातंत्र्य चळवळीतले अनेक नेते व मोठे कार्यकर्ते हे ब्राह्मण होते. त्यामुळे गांधीजींनी ब्राह्मणांना गोंजारत हाताळण्याची आणि बहुजन समाजाला पुढे नेण्याची एक मॅनेजमेंट स्टाईलच डेव्हलप केली जी काँग्रेस आजही फॉलो करते आहे. काँग्रेसची मेथडॉलॉजी ही खास बनियांनी निर्माण केलेली गांधीचीच मेथडॉलॉजी आहे. गांधीजींनी ह्या काळात जर चुकून अस्पृश्यतेच्या निर्मूलनाऐवजी तिला कायम ठेवण्याचीच भूमिका घेतली असती तर आपल्या लढ्याचे काय झाले असते ह्याची कल्पनाच केलेली बरी. गांधीजींनी ह्या काळात ब्राह्मणांना खूष करणारी भाषा वापरली असली तरी त्याची प्रत्यक्ष कृती ही समाजकारण पुढे नेणारीच होती. त्यामुळेच साने गुरुजी असोत वा भाऊराव पाटील ह्या साऱ्या गांधीवाद्यांनी अस्पृश्यतेसंदर्भात पुढे जाणारेच समाजकारण केले आहे. आंबेडकरांनी ब्रिटिशांबाबत मवाळ धोरण स्वीकारले म्हणून त्यांना देशद्रोही म्हणणारे जितके मूर्ख आहेत तितकेच ब्राह्मण्याबाबत व ब्राह्मणाबाबत मवाळ धोरण स्वीकारले म्हणून गांधींना अस्पृश्यद्रोही ठरवणारे अविचारी आहेत. गांधींच्या मृत्यूला पंचेचाळीस वर्षे झाली तरी बहुजन समाजाला ह्याबाबत शहाणे करायला जी यातायात आपणास करावी लागते, ती बघितली की गांधींच्या पुढचे आव्हान किती कठीण होते हे सहज लक्षात येईल. राजकारणी माणसाला सगळा समाज सोबत घेऊन जावा लागतो. गांधींना समतेपेक्षा राजकीय स्वातंत्र्य हे अधिक अग्रक्रमावर ठेवावेसे वाटले. आता स्वातंत्र्य आणि समता ह्यातील अग्रक्रम कशाला द्यायचा हे ठरवणे महाकठीण आहे; मात्र स्वातंत्र्य नसले आणि नुसती समता असली की काय होते ते सध्याच्या

इस्लामकडे नजर टाकली तरी सहज कळू शकते. एकाच काळखंडात गांधी राजकीय स्वातंत्र्य तेही समाजकारणासह (भले ते तडजोडवादी असेल) आणि आंबेडकर समता सामाजिक स्वातंत्र्यासह घेऊन वावरले आणि ते एकंदर भारतीय समाजासाठी चांगलेच झाले. ज्याक्षणी स्वातंत्र्य स्पष्ट दिसले त्या क्षणी गांधींनी स्वातंत्र्यानंतर सर्वात महत्त्वाची गोष्ट ह्या देशातले कायदे असणार हे ओळखून नेहरूंना कायदेमंत्रीपद बाबासाहेब आंबेडकर ह्यांना द्यावयास सांगितले. ह्यावरूनच त्यांच्या प्रत्यक्ष मनात काय चालले होते हे कळावे. गांधींनी सामाजिक तत्त्वज्ञान कधीच सांगितले नाही. त्यांनी फक्त त्यांच्या राजकारणाच्या सोयीसाठी काही सामाजिक वक्तव्ये दिलीत आणि प्रत्यक्ष काम मात्र एखाद्या बनियाने दुकान चालवावे तसे व्यवस्थित चालवले. आंबेडकरांचा व्यापाराशी कधीही दुरान्वयाने संबंध आला नाही. ते वर्णीय भाषेत सांगायचे तर ज्ञानपुरुष म्हणजे एका अर्थाने ब्राह्मण होते आणि त्यामुळेच तात्त्विक कीस पाडणारे होते. त्यामुळेच तात्त्विक पातळीवर गांधीजींचा वारंवार सहज पाडाव करत राहिले; पण गांधीजींचे दुकान काही त्यांना आयुष्यभर कळाले नाही. पुढेही हाच कित्ता त्यांच्या अनुयायांनी गिरवला. त्यांना गांधींना मॅनजमेंट गुरू मानून राजकारण करणाऱ्या काँग्रेसचे दुकान कधीच कळाले नाही. ते आपण तात्त्विक पातळीवर किती भारी आहोत ह्या आनंदातच मशगूल राहिले. परिणामी रिपब्लिकन पक्षाच्या चिरफाळ्या, दलित पँथरची तत्त्वावरून शंभर शकले आणि सत्तेवर मात्र काँग्रेसचे सोयीप्रमाणे वक्तव्य करणारे पण समाजकारण पुढे घेऊन जाणारे राजकीय दुकान.

लोकनाथ देवराज बनसोड ह्यांनी डोईफोड्यांच्या समाजाचा जातीदर्शक निर्देश केलाय तो त्यांनी थेट केला असता तरी चालले असते. डोईफोड्यांचे चप्पलांचे दुकान आहे किंबहुना त्यांच्या समाजाला दुकान टाकूनच उपजीविका करावी लागते. त्यामुळेच त्यांचा समाज गांधीजींचे दुकान सहज समजू शकतो. लोकनाथ बनसोडेंच्या समाजाला व्यापाराची सवय नाही. त्यामुळे सगळे ज्ञानजीवी ! त्यांना गांधीजींचे दुकान कसे कळणार? त्यामुळेच तर ब्राह्मणानंतर त्यांच्या समाजातच बुद्धिजीवी जास्त आणि अहंकारही थेट त्यांच्यासारखाच. हे जग फक्त ज्ञानाच्या अंगाने चालत नाही, तर व्यापाराच्या अंगानेही चालते हे कळाले की आम्ही गांधी का आणतो आहोत हे त्यांना सहज कळेल.

वस्तुस्थिती अशी आहे की, जर आपणाला बहुजनसमाजाशी वाटाघाटी करायच्या असतील तर आपणाला फुले, शाहू, आंबेडकर ह्यांचे तत्त्वज्ञान व गांधीजींची मेथडॉलॉजी ह्याच पद्धतीने काम करावे लागेल. नाहीतरी बाबासाहेबांची सत्याग्रह वगैरे सर्व तंत्रे प्रथम गांधीजींनी अजमावली होतीच.

सांगण्यासारखा मुख्य मुद्दा हाच की अस्पृश्यांचे मुख्य नेते आंबेडकर होते हे निर्विवाद सत्य आहे, पण बदलत्या काळानुसार आपण आता बहुजन समाजातल्या अनेक नेत्यांनाही आत्मसात केले पाहिजे. त्यामुळे शेवटी आपलेच पात्र मोठे होणार आहे.

आणि आत्ता गांधी आणि आंबेडकर ह्यांच्या नेतृत्वातील सर्वात मोठ्या फरकाबाबत. हा फरक मानसशास्त्रीय आहे. गांधीजींचे नेतृत्व स्त्रैण होते, तर आंबेडकरांचे पुरुषी. पुणे कराराच्या रूपाने ह्या दोघांचे लग्न झाले. एका अर्थाने गांधीजींच्या आतील स्त्रैणतेने आंबेडकरांच्या आतील पुरुषाला फासले आणि पुणे करार नावाचे लग्न केले नाहीस, तर आत्महत्या करीन अशी धमकी दिली. आंबेडकर ह्या धमकीला बधले नसते; पण इतरांनी हे लग्न करणे भाग पाडले आणि मग आंबेडकर आयुष्यभर ह्या सक्तीच्या लग्नापासून पळत राहिले. ही बायको किती वाईट आहे ते अनुयायांना पटवत राहिले. गांधीजींची स्त्रैणता मात्र आयुष्यभर ह्या पुरुषाला मग त्याने घटस्फोट घेतला तरी समजून घेत राहिली.

गांधीजींच्यातील ह्या स्त्रैणतेच्या जाळ्यात त्या काळातील सर्वच पुरुषी नेतृत्वे आली. हवालदिल झाली. काहीसाठी ती कर्मठ आईसारखी, तर काहींसाठी अनाकलनीय; पण प्रौढ बायकोसारखी होती. गांधीजींच्या नेतृत्वाचा गौरव हा एका अर्थाने भारतातील समस्त स्त्रियांचा गौरव आहे. भारतातल्या पुरुषसत्ताक समाजामुळे इथल्या पुरुषांना ज्ञानेश्वर, रामकृष्ण परमहंस, म. गांधी ह्यासारख्या स्त्रैण पुरुषाचं काय करायचं हे कधीही कळालं नाही. पुढेही इंदिरा गांधीसारखे जे पुरुषी नेतृत्व आले त्यामुळे ही गुंतागुंत अधिक वाढली. ह्या स्त्रैण पुरुषांना समजून घ्यायचं असेल तर आपण आपल्या घरातील आयांना व बहिणींना नीट पहायला शिकलं पाहिजे. आंबेडकर हे आपणा पुरुषी पुरुषांच्या आतच आहेत. त्यामुळे ते चटकन अपील होतात. गांधीजी हे तसे नाहीत. गांधीजींच्या ह्या स्त्रैण नेतृत्वाने पुरुषी नेतृत्वाची परंपराच मोडीत काढली. गांधीजींच्या ह्या स्त्रैणतेमुळेच ते एकटे पडत गेले, मात्र त्यांच्याविषयीचे आकर्षण संपले नाही.

भारतीय समाजात शतकानुशतके बहुजन समाज हा पुरुषी तर अस्पृश्य हा स्त्रैण प्रवृत्तीने एकमेकांशी व्यवहार करत होते. आंबेडकरांनी ही सगळी परंपरा उलटी करून प्रथमच अस्पृश्यांना पुरुषी प्रवृत्ती दिली. त्यामुळे बहुजनसमाज सटपटला. हा अस्पृश्य पुरुष कसा हाताळायचा त्याचे शिक्षण बहुजनसमाज हा पुरुषी व्यवहार ठेवत असल्याने झाले नव्हते. हा दोन पुरुषातला व्यवहार उघड उघड संघर्षात रूपांतरित झाला असता; पण गांधीजींची स्त्रैणता नेमकी ह्याचवेळी उगवली. तिने बहुजन समाजाला अस्पृश्य पुरुष हाताळण्याचे स्त्रैण तंत्र पुरवले आणि हा संघर्ष टळला. त्यात पुणे कराराच्या लग्नाचा सिंहाचा वाटा आहे. आंबेडकरही जीनांइतके टोकाचे पुरुषी नव्हते. कारण जीनांचा समाज हा शेवटी इथला सत्ताधारी पुरुषी समाज होता, तर आंबेडकरांचा समाज हा सत्ताहिन स्त्रैण समाज होता. अन्यथा भारतात आणखी एक फाळणी झाली असती वा अस्पृश्यांची प्रचंड कत्तल झाली असती. आंबेडकरांचा धोरणी स्वभाव इथे कामाला आला. हे सगळे विवेचन करण्याचे कारण लोकनाथ बनसोड ह्यांना भारतीय समाजात 'बायकी' म्हणजे काय असते ते स्पष्ट व्हावे. आतंकवाद व युद्धाऐवजी सत्याग्रह, आक्रमणाऐवजी लोकशाही पद्धतीचे मोर्चे (धर्मशाही द्विलिंगी, राजेशाही वा एकाधिकारशाही ही पुरुषलिंगी असतात तर लोकशाही ही स्त्रैणच असते) शांतता व लीनतेचा आग्रह (गांधीजी शांततेसाठी नौखालीत गेले ते आठवा) मुदुता ही त्या स्त्रैणतेची वैशिष्ट्ये आहेत. पुरुषी मात्र आक्रमक, वेळप्रसंगी हिंसक, जोरकस, स्त्रैण शांत पणाला अर्पणशील व शरणागती समजणारे असे असते. आंबेडकरांचे लिखाण हे पुरुषी गुणांनी ओतप्रोत आहे आणि त्यामुळेच दलितांचा उद्धार झाला ही वस्तुस्थिती. आंबेडकरही स्त्रैण असते तर अस्पृश्यतेरांनी अस्पृश्यांची चटणी करून त्यांना आंबेडकरांसकट खाल्ले असते. ह्याउलट गांधीही पुरुषी असते तर ते बहुधा कम्युनिस्टच झाले असते (माओ त्से तुंग बनण्याच्या सर्व क्षमता गांधींच्याकडे होत्या) अन् त्यातून एक वेगळाच साम्यवाद भारतात आला असता. कदाचित त्यामुळे आंबेडकरांनाही चौ एन लाय व्हावे लागले असते आणि त्यातून युद्धच झाले असते. कदाचित हिंदुस्तानची तीन शकले झाली असती किंवा अस्पृश्यांची प्रचंड कत्तल. गांधीजींच्या स्त्रैणतेने दाबून ठेवलेल्या सगळ्या पुरुषी प्रवृत्ती एकतर सुभाषबाबूसारख्या काँग्रेसमधून बाहेर पडल्या किंवा नंतर फाळणीच्यावेळी उफाळून आल्या. भारतीय समाज किती हिंसा करू शकतो हे फाळणीवेळी स्पष्ट झाले.

भारतीय समाज हा आतून स्त्रैण वरून पुरुषी आहे. कुठल्याही बाईला प्रथम स्वतःचे घर असावे असे वाटते. त्यामुळेच गांधींना प्रथम हिंदुस्थान नावाचे स्वतंत्र घर हवे होते. त्यामुळेच राजकारण ही त्यांची प्राथमिकता होती. पुरुषाला मात्र ते घर प्रथम नीट असणे विशेषतः त्या घरात त्याच्या हक्काचे संरक्षण व मोकळीक हवी असते. त्यामुळेच आंबेडकरांना हिंदुस्थान हा ब्रिटिशांनी भाड्याने घेतलेले घर आहे (अर्थात बळकावून) हे माहीत असूनही ब्रिटिश गेल्यानंतर हे घर कुणाच्या ताब्यात जाणार आणि आपली त्या घरात नेमकी काय स्थिती असणार ह्याची अधिक काळजी होती. त्यामुळे समाजकारण हा त्यांचा अग्रक्रम होता. एका अर्थाने एका दरिद्री पुरुषाने आपल्या समाजाच्या उन्नतीसाठी व आर्थिक संपन्नतेसाठी केलेल्या त्या कृती होत्या.

भारतीय स्त्रैण असल्यानेच त्यांना भारत हाही भारतमाता दिसला आणि मग ह्या भारतमातेसाठी त्यांनी प्राणाहुती दिली. भारतात स्त्रीचे जे पुरुषी रूप आहे ते 'काली'माता आहे आणि ह्या कालीमातेचे (स्त्रीमधील पुरुषाचे) रूप त्यांना वारंवार मोहवून टाकते. कालीमाता ही पुरुषांच्यातील स्त्रैणतेने स्त्रीमधील पुरुषतेची केलेली पूजा आहे आणि ज्या स्त्रियांत 'पुरुषता' प्रबळ आहे त्यांना शांत स्त्रैणतेपेक्षा कालीमातेमधील उग्रता अधिक मोहात पाडते.

भारतीयांची ही स्त्रैणताच त्यांना टिकून राहण्याचा गुणधर्म पुरवते. कदाचित तिचाच एक दुष्परिणाम म्हणून तिने जातीसंस्था टिकवली. त्यामुळे बाहेरील लोकांना इतर लोक जसे समूळ मारून टाकत (विशेषतः युरोपियन) किंवा व्यक्ती म्हणून सामील करून घेत तसे जातीवाद्यांनी केलेले नाही. त्यांनी बाहेरच्या लोकांनाही 'जाती' रूपात सामील करून घेतले 'व्यक्ती' म्हणून नव्हे. आजही एखाद्या व्यक्तीला सामील करून घेणे हे ह्या जातीवाद्यांच्या जीवावर येते. जात ही बाहेरील गोष्टींना एकाच वेळी बाहेरही ठेवते आणि

आतही घेते. एका अर्थाने हे संभोग तर करायचा; पण कंडोम लावून मूल होऊ द्यायचे नाही तसे आहे. अर्थात तरीही पूर्वी संकर जाती निर्माण व्हायच्या तशा झाल्या आणि आताही होतायत.

आता भारतीय जाती व्यवस्थेबाबत ! तर ती ब्राह्मणांनी निर्माण केली नाही हे आम्हालाही मान्य आहे; पण तिला जे त्यांनी स्वरूप दिले तेच खऱ्या अर्थाने भीषण आहे.

आर्य येण्यापूर्वी भारतात जे समूह होते ते आडवे होते आणि सर्वत्र पसरले होते. जगात सर्वत्रच ही आडवी मांडणी जातीजमातींची होती असे दिसते. अन्न,देवदेवके, विवाह ह्याबाबत त्यांच्यात काही संकेत होते. अनेकदा 'मनाई' होती. हे जाती जमाती गण अनेकदा आपापसांत लढत आणि सहकार्यही करत.

जगात सर्वत्रच ह्या सर्व जाती जमातींना एकत्र आणण्याचे काम आध्यात्माने केले. ह्याची सुरुवात शैव, जैन व बौद्ध आध्यात्मांनी केली. त्यातूनच धर्माचा उदय झाला. भारतात शैव, जैन व बौद्ध हे पहिले तीन धर्म होते. झरतृष्टाने पारसी, मोझेसने ज्यू, येशूने ख्रिश्चन, महंमदाने इस्लाम आध्यात्म आणून त्या त्या क्षेत्रातल्या जाती जमाती एकत्र आणण्याची प्रक्रिया खुली केली.

भारतात आर्यांनी ह्या प्रक्रियेला छेद दिला. विशेषतः वैदिक आर्यांनी हे इतके कट्टर होते की त्यांना आपल्या देवकांची देवांची व धर्मग्रंथाची शक्ती संपवायची नव्हती. ते आले होते ते मुळात दोन वर्णात. ब्राह्मण आणि क्षत्रिय भारतात आल्यावर त्यांना व्यापार व शेती करणारा तिसरावर्ण भेटला वैश्य. त्याला ते देणारा म्हणजे दास म्हणत. आर्य हे तसे भूकेकंगाल व अन्नाला महाग. ते अन्न शोधत इथे आले. इथले जे योद्धे होते त्यांना त्यांनी युद्धात पराभूत करून त्यांनाही दास केले. सुरुवातीला त्यामुळे ब्राह्मण, क्षत्रिय हे आणि विश असे तीन वर्ण होते. पुढे शेती व व्यापार न करणाऱ्या अनेक जाती जमातींशी त्यांचा जसा संपर्क येऊ लागला तसे त्यांनी त्याचा समावेश शूद्रात करून टाकला व सेवा करण्याचे काम त्याला देऊन टाकले. त्यातूनच वैश्याचे वैश्य व शूद्र असे दोन वर्ण झाले. पुढे शूद्रातून व पराजित क्षत्रियांच्यातून अतिशूद्र निर्माण झाले. तरीही काही उरले ते भटकत राहिले. ह्या सर्व व्यवस्थेला त्यांनी वर्ण व्यवस्थेचे रूप दिले आणि स्वतःला उच्च ठेवण्यासाठी त्यांनी ह्या व्यवस्थेची उभी मांडणी केली व ती जन्माधिष्ठित केली. जेणेकरून स्वतःची वंशशुद्धता शाबूत राहील आणि श्रमविभागणी होऊन ब्राह्मणांना कमीत कमी श्रम पडतील.

अशारितीने वर्णजातीव्यवस्था ही एक उभी आडवी व्यवस्था झाली आणि हे करताना त्यांनी अनेक कल्पितं रचली, कथा निर्माण केल्या ह्या उभ्याआडव्या व्यवस्थेला नंतर खोली प्राप्त झाली ती जन्माधिष्ठित व्यवसायकर्माची आणि ही व्यवस्था त्रिमिती (Three Dimensional) झाली आणि ह्याचवेळी ब्राह्मणांनी तिला चौथी मिती पुरवली ती काळाची आणि पुनर्जन्माचा जातीव्यवस्थेशी सांधा जोडला. जगात इतरत्र कुठेही अशी चारही मितींनी मुक्त व्यवस्था नव्हती. त्यामुळेच त्या इतर व्यवस्था मोडीत निघाल्या. मागील जन्मामुळे ही आत्ताची जात तुला मिळालीये हे कालिक प्रमेय जगात इतरत्र कुठेच दिसत नाही.




आकृती : वर्णजातीस्वरूप

ह्यातील व्यवसाय व त्यातून निर्माण होणारी उत्पादन व्यवस्था ह्यामुळे ही व्यवस्था प्रत्यक्ष वाटते; पण उरलेल्या तिन्ही मित्यांचा आकार हा कल्पनाजन्य कल्पिते व भाषा व चिन्हव्यवस्थाच आहे. त्यामुळेच आंबेडकरांचा व्यवसाय व वर्ग बदलले तरी त्याची जात बदलली नाही आणि त्यांना प्रचंड त्रास दिला गेला.

वर्णजात व्यवस्था ही त्यामुळेच प्रामुख्याने कल्पितांच्या आधारे उभी आहे. कल्पितांच्यामुळेच रोटीबेटीस्पर्श बन्दीसारखे रिवाज अस्तित्वात आलेले आहेत तेव्हा जोपर्यंत भारतीय मानसिकतेतून ही कल्पिते नाहीशी होत नाहीत तोवर जात नष्ट होणार नाही. त्यामुळे ज्या आडनावामुळे जात कळते अशी आडनावे ताबडतोब नाहीशी करणे हे गरजेचे ठरते.

ज्यांना दलितांच्या संख्येचे राजकारण करायचे असेल त्यांनी ते जरूर करावे; पण आम्ही मात्र जो जातीव्यवस्था मानत नाही अशा माणसाला मग तो कुठल्याही जातीचा असो आमचाच मानतो. लोकनाथ दे. बनसोड सांगतात त्याप्रमाणे जर प्रत्येकजण आपल्या आपल्या जातीजमातीचे राजकारण करत बसला, तर मग दलितांच्यातही हे संख्याबळाचे राजकारण घुसणे अटळ आहे. मग दलित किती ह्या प्रश्नानंतर अटळपणे महार किती, चांभार किती, मांग किती, ढोर किती असे प्रश्न उपस्थित होणे अटळ आहे. संख्याबळाच्या जीवावर महाराष्ट्रात महारांनी जे सत्ताप्रभुत्व गाजवले ते स्पष्टच आहे.

दलित साहित्याबाबत दलित समाजाबाहेरील माणसाला दलित आशय पेलणार नाही, असा सूर त्यांनी लावला आहे. हे प्रमेय एकदा मान्य केले की, मग त्या त्या जातीविषयी त्या त्या जातीतील त्या त्या वर्णाविषयी त्या त्या वर्णातील आणि त्या त्या वर्गाविषयी त्या त्या वर्गातील माणसालाच चांगले लेखन करता येणे शक्य आहे असा महासिद्धांत तयार होतो. ह्यातून प्रत्येक लेखक व त्याचे लेखन संकुचित होणे अटळ आहे. उद्या एखादा ब्राह्मण 'तुम्हाला आमचा आशय पेलणे शक्य नाही' असे म्हणाला तर तुम्ही त्याला कसा प्रतिवाद करणार. उलट दलित साहित्य ही संज्ञा व्यापक केली तर इतर जातीजमातीतील लोकही दलित समाजाचा अभ्यास करून दलितांच्यावर लिहितील आणि त्याने सामाजिक अभिसरण वाढण्यास मदत होईल. उद्या ह्यापैकी कुणी काही चुकीचे लिहिले तर त्याची समीक्षा करायला आपण आहोतच की ! पण ते चुकीचे लिहितील ह्या भयाने आपण अभिसरणच थांबवणार असू तर आपल्याला आपली चळवळच नीट कळली नाही म्हणावयाचे. जर अभिसरणालाच विरोध असल तर कसल्या वाटाघाटीच्या आणि आंतरजातीय विवाहाच्या गप्पा मारता राव?

आज दलित साहित्याला जी 'एकजातीय' साहित्याची मर्यादा पडलीये. ही मर्यादा ओलांडायची असेल, तर सर्वच दलित साहित्यिकांनी आपापल्या जाती ओलांडायला हव्यात आणि इतर जातींनाही आपल्या साहित्यात आणलं पाहिजे जे दलित महानगरात आहेत त्यांना जातीय विशेष फारसे सतावणार नाहीत; पण एका वेगळ्या एकात्म दलित संवेदनेने लिखाण करणे त्यांना सहज शक्य आहे आणि असे लिखाण दलित साहित्याला पुढेच घेऊन जाईल. आणखी काही दशकात दलित साहित्य हे दलित जातीय असे न राहता दलित वर्गीय साहित्य असे होणे अटळ आहे. त्याची तयारी महानगरातील दलित साहित्यिकांना करता येणे सहज शक्य आहे.

केवळ आडनाव बदलून जातीव्यवस्था नष्ट होणार नाही हे आम्हालाही कळते; पण ती प्रक्रिया वेगवान होऊ शकते आणि चिन्हात्मक पातळीवर वर्णसंकर होऊन वर्ण नष्ट होण्याची गती वाढू शकते एवढेच आम्हाला सुचवायचे आहे.

आपले

**कांबळे / काळे डोईफोडे / सरनोबत मेश्राम / परब**

**मा. संपादक**

स. न. वि. वि.

**कांबळे / काळे डोईफोडे / सरनोबत मेश्राम / परब**

ह्यांनी आम्हाला दिलेले प्रत्युत्तर वाचले.

आमच्या मते सामाजिक सुधारणेच्या बाबतीत एखादी गोष्ट स्त्रैण आहे की पुरुषी ह्या प्रश्नापेक्षा ती सर्वांच्या भल्यांची आहे की नाही हेच महत्त्वाचे आहे. एखादी गोष्ट स्त्रैण असूनही ती घातक असू शकते.

त्यांनी त्यांच्या मांडणीत बौद्ध व जैन धर्माने जगात प्रथम एकात्मीकरण

सुरू केले असे म्हटले आहे ते योग्यच. मात्र, त्यांनी शैव हा धर्म मानला आहे ते आश्चर्यकारक आहे.

त्यांच्या लेखनातील बराचसा भाग म. गांधींच्या समर्थनाने व्यापला आहे तेव्हा प्रत्यक्ष महात्मा गांधी काय म्हणतात तेच पाहू.

१. स्वराज्याची बीजे जातीव्यवस्थेत शोधावी लागतील. वेगवेगळ्या जाती या सेवेसाठी स्थापन केलेल्या वेगवेगळ्या विभागासारख्या आहेत. प्रत्येक विभाग हा समाजाच्या भल्यासाठी कार्यरत आहे.

२. जी व्यवस्था जातीव्यवस्था निर्माण करू शकली त्या व्यवस्थेतच संघटन शक्तीची अमाप शक्यता आहे असेच म्हणावे लागेल.

३. जातीव्यवस्था ही प्राथमिक शिक्षणाच्या सुदूर प्रसाराची सहज उपलब्ध व्यवस्था होय. प्रत्येक जात ही त्या जातीतील मुलांच्या शिक्षणाची जबाबदारीसहज स्वीकारू शकते. जातीव्यवस्थेला राजकीय आधार आहे. प्रातिनिधीक व्यवस्थेसाठी जाती ही मतदारसंघ म्हणून स्वीकारली जाऊ शकते. जात ही न्याय व्यवस्थेचेही कार्य करू शकते. त्यासाठी जातीतून न्यायाधीश प्रतिनिधी निवडता येतील. ते त्याच जातीतील सभासदातील वादविवादाचा न्याय निवाडा करतील. जातीव्यवस्थेच्या आधारावर संरक्षक सेवादल सहज उभारता येईल. प्रत्येक जातीची एक तुकडी उभारली की सैन्य उभे राहील.

४. राष्ट्रीय एकात्मतेसाठी जातीजातीत रोटी बेटी व्यवहार आवश्यक आहेत यावर माझा विश्वास.

५. सहभोजनाने मैत्रीसंबंध प्रस्थापित होतात असे म्हटले जाते, पण अनुभव मात्र याच्याविरुद्ध आहे. हे जर सत्य असते तर युरोपात युद्धे झालीच नसती. मलविसर्जन ही जशी घाणेरडी क्रिया आहे तशी अन्नग्रहण हीसुद्धा घाणेरडी क्रिया आहे . फरक एवढाच की मल विसर्जनाची ही क्रिया निसर्गाचा आदेश म्हणून आपण पाळतो. तेव्हा ही क्रिया केल्यानंतर आपणास स्वस्थता लाभते, तर त्यानंतर मात्र आपण अस्वस्थ होतो. निसर्गाच्या नियमाचे पालन करण्यासाठी, मलविसर्जनासाठी आपणास एकांत हवा असतो. त्याचप्रमाणे अन्नग्रहण करण्याच्या क्रियेसाठी आपणास एकांताचीच गरज आहे.

६. हिंदुस्थानात भावाभावाच्या मुलामुलींचे वैवाहिक संबंध होत नाही. त्यांचे विवाह होत नाहीत म्हणून काय एकमेकांवर प्रेम करीत नाहीत. काही पंथियात काही महिला एवढ्या सनातनी असतात की, त्या आपल्या पिण्याच्या पाण्याच्या भांड्यातून आपल्यासाठी पाणीही घेणार नाहीत, म्हणून त्यांच्यात प्रेम भावनेचे वास्तव्यच नाही असे म्हणायचे का? जातीव्यवस्था जातीजातीत रोटी बेटी व्यवहाराची अनुमती देत नाही म्हणून जातीव्यवस्था चुकीची आहे असे आपण म्हणू शकत नाही.

७. जातीव्यवस्था हे नियंत्रण व्यवस्थेचे दुसरे नाव आहे. जात ही विलासी प्रवृत्तीवर नियंत्रण ठेवते. विलासोपभोगासाठी जात ही आपल्या सदस्यांना विशिष्ट मर्यादाचे उल्लंघन करण्याची अनुमती देत नाही आणि रोटी बेटी व्यवहार बंदी ही मर्यादांचाच एक प्रकार आहे.

८. जातीव्यवस्था नष्ट करून युरोपची पाश्चिमात्य सामाजिक व्यवस्था स्वीकारणे याचा अर्थ हिंदूंनी आपली पिढ्यानपिढ्या वंशपरंपरागत चालत आलेली रोजगाराच्या हमीची, जीविकोपार्जनाची व्यवस्था त्यागणे असाच होईल. हे तत्त्व या जातीव्यवस्थेचा आत्मा आहे. वंशपरंपरागत व्यवसाय शाश्वत तत्त्व आहे. हे बदलणे म्हणजे अव्यवस्था निर्माण करणे होय. मी जर माझ्या जीवनात ब्राह्मणाला ब्राह्मण म्हणू शकलो नाही, तर ब्राह्मणाचा मला काहीही उपयोग होणार नाही. जर दररोज ब्राह्मणाचे शुद्रात आणि शुद्राचे ब्राह्मणात रूपांतर होऊ लागले, तर समाजात पूर्णपणे गोंधळाची व्यवस्था, अव्यवस्था निर्माण होईल.

९. ''जातीव्यवस्था ही समाजाची स्वाभाविक व्यवस्था होय. हिंदुस्थानात या व्यवस्थेला धर्माचे अधिष्ठान प्राप्त झाले आहे. इतर देशांना जातीव्यवस्थेची उपयोगिता समजलीच नाही. त्यामुळे त्या देशात ही व्यवस्था सैल स्वरूपात अस्तित्वात आहे. म्हणून जातीव्यवस्थेचे जे लाभ हिंदुस्थानाला मिळतात त्या लाभापासून हे देश वंचित आहेत. हे माझे जातीव्यवस्थेसंबंधी विचार आहेत म्हणून जातीव्यवस्था नष्ट व्हावी यासाठी जे प्रयत्न करतात मी त्यांचा विरोध करतो.''

१९२२ साली श्री. गांधी हे जातीव्यवस्थेचे संरक्षक होते. जातीव्यवस्थेसंबंधी श्री. गांधी यांच्या विचारांचा मागोवा घेतला, तर १९२५ सालात गांधींच्या जातीव्यवस्थेसंबंधीच्या टीकात्मक विचारांचा परिचय होतो. ३ फेब्रुवारी, १९२५ श्री. गांधी जे बोलत ते असे

''जातीव्यवस्था ही सामाजिक नियंत्रणाची व्यवस्था आहे म्हणून मी जातीव्यवस्थेचा समर्थक होतो; पण वर्तमान जातीव्यवस्था ही नियंत्रणाची व्यवस्था राहिली नसून ती बंधनाची व्यवस्था झाली आहे. नियंत्रण ही उत्कृष्ट व्यवस्था असून त्या व्यवस्थेचा उपयोग स्वातंत्र्य मिळविण्यासाठी होऊ शकतो; पण बंधने साखळीसारखी असतात. त्या स्वरूपात जातीव्यवस्थेविषयी अभिमान वाटावा असे काहीही नाही. ही व्यवस्था वर्तमान स्वरूपात शास्त्रात सांगितलेल्या तत्त्वाच्या विरोधी आहे. जातीची संख्या अगणित आहे. जा जातजातीत बेटी व्यवहाराला मनाई आहे. हा प्रगतीचा मार्ग नव्हे तर हा अवनतीचा मार्ग आहे.

''यातून मार्ग काय'' या प्रश्नाच्या उत्तरात श्री. गांधी म्हणाले,

''उत्तम उपाय म्हणजे लहान लहान जातींना मोठ्या जातीत विलीन व्हावे. या व्यवस्थेत फक्त चार मोठ्या जाती असाव्यात. त्या आधारावर आपणास जुनी वर्णव्यवस्था पुनर्स्थापित करता येईल.''

थोडक्यात, १९२५ साली श्री. गांधी हे वर्णव्यवस्थेचे पुरस्कर्ते बनले. पुरातन काळी हिंदुस्थानात वर्णव्यवस्था प्रचलित होती. त्या व्यवस्थेनुसार समाजाचे चार वर्णात विभाजन करण्यात आले होते. **१) ब्राह्मण** : या वर्णाचा व्यवसाय ज्ञानार्जन हा होता. **२) क्षत्रिय** : या वर्णाचा व्यवसाय युद्ध हा होता. **३) वैश्य** : व्यापार उदीम हे या वर्णाचे क्षेत्र होते आणि **४) शुद्र** : उपरोक्त तीनीह वर्णाची सेवाचाकरी हे या वर्णाचे कर्तव्य होते. सनातनी हिंदूंची जी वर्णव्यवस्था होती तीच व्यवस्था श्री. गांधी यांना अभिप्रेत आहे काय? श्री. गांधी यांनी त्यांना अभिप्रेत असलेली वर्णव्यवस्था खालील प्रकारे स्पष्ट केली.

(हा उतारा श्री. गांधी यांच्या या विषयावरील वर्णव्यवस्था या लेखातून घेण्यात आला आहे. गांधीजींचे साहित्य या ग्रंथात हा लेख असून मूळ ग्रंथ गुजराती भाषेत आहे.,

१. वर्णव्यवस्था ही जन्माधिष्ठीत आहे असा माझा विश्वास आहे.

२. वर्णव्यवस्था शुद्रांना ज्ञानार्जनापासून किंवा युद्ध कौशल्य करण्यापासून परावृत्त करणारी अशी कोणतीही व्यवस्था नाही. या उलट क्षत्रियही सेवा करू शकतात; पण या वर्णव्यवस्थेचा असा आदेश आहे की, ज्ञानार्जनानंतरही शुद्राने त्या ज्ञानाचा जीविकोपार्जनासाठी उपयोग करू नये. त्याचप्रमाणे ब्राह्मणही युद्ध किंवा व्यापाराची कला शिकू शकतात, पण ब्राह्मणानेही या कलांना आपल्या जीविकोपार्जनाचे माध्यम बनवू नये. वैश्यही ज्ञानार्जन करू शकतो. युद्धकला शिकू शकतो; पण त्यानेही या कलांचा उपयोग जीविकोपार्जनासाठी करू नये.

३. वर्णव्यवस्था ही जीविकोपार्जनाच्या साधनांशी निगडित आहे. एका वर्णाच्या व्यक्तीने दुसऱ्या वर्णाच्या कला किंवा विज्ञानात पारंगत होणे यात कोणतीही हानी नाही; पण जीविकोपार्जनासाठी मात्र त्याने आपल्या वर्णासाठी स्वीकृत व्यवसायच स्वीकारला पाहिजे. याचा अर्थ त्याने जीविकोपार्जनासाठी वाडवडिलांचा व्यवसायच स्वीकारायला हवा.

४. वर्णव्यवस्थेचा उद्देश स्पर्धा, वर्गसंघर्ष आणि वर्ग युद्ध टाळणे हा आहे. माझा वर्णव्यवस्थेवर विश्वास आहे. कारण ही व्यवस्था माणसाची कर्तव्ये आणि व्यवसाय निश्चित करणारी व्यवस्था आहे.

५. वर्णव्यवस्था म्हणजे जन्मापूर्वीच माणसाचा व्यवसाय निश्चित करणारी व्यवस्था होय.

६. वर्णव्यवस्थेत कोणालाही आपला व्यवसाय निवडावयाचे स्वातंत्र्य नाही. त्यांचा व्यवसाय त्या तिच्याकरिता वंशपरंपरेने निर्धारित केली जातो.

गांधीजींच्या वरील विधानांवरून गांधी हे वर्णव्यवस्थच्या विरोधात नव्हते हे स्पष्ट व्हावे. बाकी गांधीवाद्यांनी केलेले कार्य ! ते अमान्य करण्याच्या

नतद्रष्टेपणा काही आंधळे आंबेडकरवादी करतात ते मी करणार नाही. 'रयत शिक्षण संस्था'सारख्या संस्था काढून गांधीवादी लोकांनी (भाऊराव पाटील) केलेले कार्य अस्पृश्यांच्या उन्नतीसाठी साहाय्यभूत ठरले हे मान्य आहे, पण त्यामुळे गांधीजींचे विचार कसे मान्य करावे?

आपला विश्वासू,
**लोकनाथ दे. बनसोड**

**मा. संपादक**
स. न. वि. वि.

आमच्या पत्राला उत्तर देणारे म. लोकनाथ दे. बनसोड ह्यांचे पत्र वचले. खरे तर आम्ही कुठेही तत्त्वज्ञान गांधींचे निवडा असे म्हटलेले नाही. आमच्या मागील पत्रात तत्त्वज्ञान आंबेडकरांचे, पण पद्धत गांधींची उपयोगी पडेल, असे आम्ही म्हटले आहे. ह्या देशातला बहुजन समाज गांधी जसे सुरुवातीला कर्मठ होते तसा कर्मठ होता; पण गांधी जसे बदलत गेले तसा तोही बदलत गेला ही वस्तुस्थिती आहे. गांधी हे बहुजन समाजाला समजून घेण्याचे उत्कृष्ट मॉडेल आहे (दुसरे अर्थात फुले आहेत). बहुजन समाज हा अस्पृश्यांशी वागताना गांधींच्यासारखा वागतो, फुल्यांच्यासारखा नाही हा आमचा अनुभव आहे. त्याला फुल्यांसारखे वागावयास लावणे म्हणजेच परिवर्तनवादाची चळवळ चालवणे. थोडक्यात, फुल्यांकडे त्याला न्हेताना आपणास व्हाया गांधी जावे लागते. त्यामुळेच गांधींच्या काँग्रेसशी आपणास वारंवार वाटाघाटी करावयास लागतात. काँग्रेस ही एका अर्थाने 'बनीया' झालेल्या बहुजन समाजाची पार्टी आहे. कम्युनिस्टांनी जर त्यांच्या साम्यवादाची सुरवात फुल्यांपासून केली असती आणि फुल्यांना आत्मसात केले असते तर त्यांची पुढे जी वाताहात झाली ती झाली नसती आणि त्यांना आंबेडकरांनाही आत्मसात करता आले असते. ह्यासंदर्भात बंगालकडे नजर टाकली, तर आमचे म्हणणे स्पष्ट होईल. भारतात सर्वात जास्त कर्मठ व्यवस्था कुठल्या प्रांतात होती, तर प. बंगाल हे उत्तर सहज मिळेल. इथे ब्राह्मण इतके कर्मठ होते की, त्यांनी क्षत्रिय व वैश्यांना शूद्रात ढकललेच, पण कायस्थ ब्राह्मणांनाही शूद्र मानले. ह्याच कायस्थ ब्राह्मणातून पुढे स्वामी विवेकानंद आले आणि त्यांनी ह्यापुढे जगावर शूद्र राज्य करतील अशी उघड भूमिका घेतली. ह्याचा न कळत परिणाम शूद्र म्हणजेच कम्युनिस्ट असे समीकरण दृढ होण्यात झाला. कारण बंगालमध्ये ब्राह्मण ब्राह्मण व शूद्र असे दोनच वर्ण मानत होते (महाराष्ट्रात शिवाजीच्या शिवशाहीमुळे क्षत्रियांचे कम बॅक झाले आणि क्षत्रिय हा तिसरा वर्ण रिस्टोअर झाला. शिवाय होळकर वगैरेंच्या मुळे शूद्रही राज्यकर्ते म्हणून उदयाला आले. ज्यामुळे शूद्र हे क्षत्रिय होते हे समीकरण मांडणेही फुल्यांना फार सोपे गेले. कारण शिवाजीच्या राज्याभिषेकामुळे शिवाजी शूद्र की क्षत्रिय असा प्रश्न निर्माण होऊन गागाभट्टामुळे तो क्षत्रिय झाला होता). त्यामुळे बंगालमध्ये सगळ्या शूद्र जनतेला साम्यवादी झेंड्याखाली आणणे सोपे गेले. इतत्र जिथे जिथे क्षत्रिय व स्वतःला क्षत्रिय समजणारे शूद्र उदयाला आले त्यांनी हे साम्यवादीकरण घडू दिले नाही. कारण साम्यवादामुळे ब्राह्मणांच्या हाती सत्ता जाण्याची शक्यता होती. कारण बहुतेक ठिकाणी साम्यवादाचे नेतृत्व ब्राह्मण करताहेत अशी समजूत होती व काही ठिकाणी ही समजूत खरी होती. अशावेळी फुल्यांना पहिला कम्युनिस्ट असा मान देऊन साम्यवादाची बाराखडी सुरू केली गेली असती, तर बऱ्याच गोष्टी वेगळ्या घडल्या असत्या. म. गांधींनी ह्या क्षत्रिय व क्षत्रियसम जातींशी नाते जोडून त्यांच्याद्वारे सगळा बहुजन समाज काँग्रेसच्या झेंड्याखाली आणला. काँग्रेसमधील ब्राह्मणही असे हुशार की त्यांनी भारताचे राष्ट्रीय नेतृत्व हे ब्राह्मणेतराने करणेच फायद्याचे आहे हे ओळखून म. गांधींच्यासारखा ब्राह्मणेतर नेता केंद्रस्थानी येऊ दिला. खुद्द म. गांधींही त्यांच्या काळातल्या कुठल्याही ब्राह्मणांपेक्षा 'उपनिषदीय ऋषी'च्या प्रतिमेशी अधिक जुळणारे असे ऋषिमान व्यक्तिमत्त्व होते. त्यामुळे ब्राह्मणांना विशेषतः प्रगतीशील ब्राह्मणांना ते वंद्य होते. एककाळ असा होता की, क्षत्रियांना बहुजन समाजातील राज्यकर्त्यांना कुणीतरी ब्राह्मण आचार्य गुरुदेव म्हणून लागायचा. गांधीजींच्या काळात परिस्थिती नेमकी उलटी झाली. ब्राह्मण राज्यकर्त्यांना ब्राह्मणेतर आचार्य व गुरुदेव लाभला. त्याचा परिणाम म्हणून काही ठिकाणी मुख्य नेता ब्राह्मण आला व आसपास ब्राह्मणेतर नेत्यांचे प्रभामंडल तयार झाले.

कम्युनिस्टांना काँग्रेसमध्ये नेमके काय चालले आहे हे कधीच कळाले नाही आणि त्यामुळे अनेक ठिकाणी त्यांना काँग्रेसकडून पराजित व्हावे लागले. गांधींना मात्र कम्युनिस्ट काय करताहेत ह्याचे फार चांगले भान होते. त्यामुळेच कम्युनिस्टांना नामोहरण करण्याची एकही संधी त्यांनी सोडली नाही. गांधीजींचे राजकारण हे नेहमीच ब्रिटिश व कम्युनिस्ट ह्या दोघांच्या विरोधातून साकारले. ब्रिटिशांना ह्या देशात 'देशी' व्हायचेच नव्हते, तर कम्युनिस्टांना स्वतःचे देशीकरण घडवून आणणे कधीच जमले नाही. ह्याबाबत माओ त्से तुंगला चीनमध्ये जे देशीकरण घडवता आले ते नीट न पाहता त्यालाच आदर्श मानून आणखी एक परदेशी नमुना कम्युनिस्टांनी आयात केला. भारतीय कम्युनिस्टांच्या ह्या अतिरेकी मार्गीकरणामुळे कम्युनिझमचा 'भारतीय' नमुना तयारच झाला नाही आणि कम्युनिझम हा कायम 'उपऱ्या'सारखा भारतीय खेड्याच्या गावकुसाबाहेर वावरला. देशीकरण होण्यासाठी तुमची स्त्रैणता जागृत आणि उघडी असणे फार गरजेचे असते; पण भारतीय कम्युनिस्टांनी स्त्रैणतेचा कायम विटाळ पाळला (अपवाद काहीसा बंगाल व केरळ) आणि मग 'अस्पर्श' राहण्याची किंमत चुकवली. कम्युनिस्ट पक्षातून राष्ट्रीय पातळीवरून एकही स्त्री नेतृत्व का उदयाला आले नाही त्याचे मूळ ह्या विटाळात आहे. काँग्रेसला इंदिरा गांधी लाभल्या आणि काँग्रेस अधिकच मजबूत झाली. जर सोनया गांधी राजकारणात पूर्ण उतरल्या तर काँग्रेस अधिकच मजबूत होईल. फक्त त्यांचे 'परदेशी'पण हाच मोठा अडथळा आहे. कारण परदेशीयता आणि स्त्रैणता ह्या दोन परस्परविरोधी गोष्टी आहेत. सोनिया गांधी ह्यातून कसा मार्ग काढतात ते पाहण्यासारखे असेल. कारण भारतीय इतिहासात प्रथमच हा विरोध इतक्या सर्वोच्च पातळीवर एकत्र येऊ घातलाय.

ह्या सर्व विवेचनाचे कारण एकच आहे ते म्हणजे लोकनाथ द. बनसोड हे त्यांच्या पत्रात दाखवतात तितका हा मुद्दा सोपा व सपाट नाहीये. आंबेडकरांनी कधीच आपले समाजकारण सपाट पद्धतीने केले नाही; पण त्यांचे राजकारण हे नेहमीच सपाट पद्धतीने झाले आहे. त्यामुळेच गांधींची नुस्ती अवतरणे देऊन किंवा त्या अवतरणांचा बौद्धिक मुकाबला करून बौद्धिक कंड विझला की आपले राजकारण झाले असे बहुधा त्यांना वाटत असावे.

गांधीजी कसे बदलत जातात हे त्यांच्या वेळोवेळी बदलत गेलेल्या अवतरणावरून स्पष्ट व्हावे विषय सहभोजन व आंतरजातीय विवाह हा आहे.

### 4. INTERDINING AND INTERMARRIAGE

Personally I am not sure that interdining is a necessary reform. At the same time I recongnize the tendency towards breaking down the restriction altogether. I can find reasons for and against the restriction. I would not force the pace. I do not regard it as a sin for a person not to dine with another, nor do I regard it as sinful if one advocates and practises interdining. I should, however, resist the attempt to break down the restriction in disregard of the feelings of others. On the contrary I would respect their scruples in the matter.

***Younge India. 19-3'25, p. 94***

Interdining and inter-caste marriage are in no way essential for the romotion of the spirit of brotherhood or for the removal of untouchability.

***Harijan, 29-4' 33, p.2***

Marrying and dining are matters of individual concern. No one has a right to ask another to choose a girl for wife or to dine with anybody against his will. But if a person refuses to take food touched by another person on the ground of untouch-ability or inferiority, he is observing untouchability. In other words, untouchability cannot constitute any ground for restraint on interdining or marriage.

***Harijan, 23-3-'34, p. 44***

Though there is in Varnasharama no prohibition againest intermarriage and interdining, there can be no compulsion. It must be left to the unfettered choice of the individual as to where he or she will marryor dine.

***Harijan, 16-11-'35, p. 316***

At one time I did say that interdining was not an essential part of the campaign for the removal of untouchability. Personally, I was for it. Today I encourage it. In fact, today I even go further.

***Harijan, 28-7-'46, p. 234***

वरील गोष्टीवरून स्पष्टच दिसते की, गांधींना आडवा अक्ष सुरवातीला मान्य होता, पण नंतर तो पूर्णमणे अमान्य झाला आणि स्वातंत्र्य दृष्टिक्षेपात आल्यावर तर ब्राह्मणांना सांभाळून घेण्याची गरज संपली आणि त्यांनी आंतरजातीयतेला सरळ सरळ उत्तेजन देण्याची घोषणा केली.

गांधींना ब्रिटिशांच्या भांडवलशाहीला पर्याय म्हणून एक नवा वर्णाश्रम अभिप्रेत होता. ज्यात सर्व वर्णांना सर्व गोष्टी शिकण्याची व करण्याची अनुमती होती (त्यांनी सर्व अवर्णांना शूद्रात घातले होते, म्हणजे भंगी वर्णीय काम करून राष्ट्रपती होणार असेल तर त्यांना चालणारहोते त्यांची अपेक्षा होती ह्या कामाचे त्याने उत्पन्न न घेता ते श्रम फुकट करावेत ह्या वर्णाश्रमात सर्व वर्ण समान पण जन्माधिष्ठित होते. सर्वांना हक्क होते, अपवाद फक्त आर्थिक कामांचा. ती मात्र प्रत्येकाने जन्माधिष्ठित करावीत वा फुकट करावीत म्हणजे ब्राह्मणाने व्यापार करावा, पण त्यातून उत्पन्न कमवू नये. वैश्याने सत्ताकारण राजकारण करावे, पण त्यातून उत्पन्न कमवू नये, हा एक अत्यंत विचित्र आणि विक्षिप्त पद्धतीचा समाजवाद होता आणि तो अत्यंत मूर्खपणाचा होता, असेच आमचे मत आहे. गांधीजींना भांडवलवाद व साम्यवाद ह्या दोन्ही संकल्पना परदेशी वाटत होत्या व त्याला पर्याय म्हणून त्यांनी हा देशी पर्याय शोधला. गांधीजींचा देशीवाद हा किती मूर्ख टोकाला जात असे त्याचा हा नमुना आहे. हा मूर्ख पर्याय त्यांना कसा सुचला ह्याची आपण नीट चौकशी केली तर आपल्या लक्ष्यात येईल की, भारतात प्राचीन काळापासून दोन विचारप्रवाह चालले होते.

पहिला गुणकर्मवादी होता. त्यांच्या मते जाती व वर्ण जन्माधिष्ठित नसून त्या गुणकर्मानुसार असाव्यात.

दुसरा जन्मवादी होता. त्याच्या मते जाती व वर्ण जन्माधिष्ठित असून प्रत्येकाने आपण ज्या जातीत जन्माला आलो त्या जातीप्रमाणे व्यवसाय करावा.

गांधींनी ह्या दोन्हींचा समन्वय केला म्हणजे एखाद्याने जन्मानुसार व्यवसाय करावा व त्याच्या गुणकर्मानुसारही करावा. फक्त जो जन्मानुसार व्यवसाय आहे त्यातून उत्पन्न मिळवावे व गुणकर्मानुसार जो व्यवसाय तो करेल त्यातून मात्र त्याने उत्पन्न मिळवू नये आणि मिळालेच तर ते समाजासाठी खर्च करावे. वास्तविक ही तारेवरची कसरत करण्याची गांधींना काही गरजच नव्हती. त्यांनी ही पर्यायी मांडणी पुढीलप्रमाणे करायला हवी होती.

''प्रत्येकाने जर त्याची इच्छा असेल तर वडिलापार्जित कर्म वा व्यवसाय करावे, पण त्याच्याकडे वेगळे गुण असतील, तर आपल्या इच्छेनुसार व्यवसाय वा कर्म करून त्यातून उत्पन्न बिनधास्त मिळवावे.''

ह्यामुळे कर्मस्वातंत्र्य व व्यवसाय स्वातंत्र्य प्राप्त झाले असते आणि जातव्यवस्थेचा जो खोलीचा अक्ष आहे तो कोसळला असता.

गांधींना उभा अक्ष मान्य नव्हताच. वैयक्तिक आयुष्यातही परदेशातून आल्यावर त्यांनी ब्राह्मणांना धुडकावून प्रायश्चित घ्यायला नकार दिला होता.

It has always been a mystery to me how men can feel themselves honoured by the humiliation of their fellow-beings [39-127]

I do want to attain moksha. I do not want to be reborn. But If I have to be reborn. I should be born an untouchable, so that I may share their sorrows, sufferings, and the affronts levelled at them, in order that I may endeavour to free myself and them from that miserable condition

It is wrong, it is sinful, to consider some people lower than ourselves. On God's earth nobody is low and nobody is high. We are all His creatures, and just as in the eyes of parents all their children are absolutely equal, so also in God's eyes all His creatures must be equal....There is no sanction in religion for untouchability. I would, therefore, ask you to give a place in your hearts to all Harijans around you. [56-409]

Everyone, whatever his caste, should have the qualities of all the four castes. The distrinctive quality of one's own may redominate in one, but a person altogether devoid of the qualities associated with castes other than his own is no man. The mother who knows how to die for the sake of her child is a Kshatriya [warrior class] woman and the husband who gives up his life to save his wife is a kshatriya [211-426]

The idea of superiority and inferiority has to be demolished. The fourdivisions are not a vertical section, but a horizontal plane on which all stand on a footing of equality, doing the same services respectively assigned to the.....In the book of God the same number of marks are assigned to the Brahman that has done his task well as to the Bhangi.

गांधी सुरुवातीला आडव्या पक्षाच्या विरोधात नव्हते. पण ते बदलत गेले, तर उभ्या अक्षाच्या ते पूर्णपणे सुरवातीपासूनच विरोधात होते हे वरील अवतरणावरून स्पष्ट व्हावे.

अस्पृश्यांना बाबासाहेब हळूहळू बदलत शेवटी बौद्ध धर्म स्वीकारापर्यंत पोहोचले हे मान्य असते, पण असाच विकास गांधींचा होत गेला हे मात्र मान्य होत नाही. गांधींच्या बाबतीत १९२५ पूर्वीची अवतरणे देऊन त्यांना नामोहरण करण्यात आता काही अर्थ उरलाय असे आम्हांस वाटत नाही.

सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे क्षत्रिय आणि वैश्य ह्या दोन्ही वर्णांना आता सोबत घेऊन जाणे गरजेचे आहे. ब्राह्मणांनी केवळ दोन्ही वर्णांना नेहमी शूद्र आणि अतिशूद्रांच्या विरोधात झुंजवले आहे, असे नाही तर ह्या दोन्ही वर्णांनाही आपापसांत झुंजवले आहे. ऐतरेय ब्राह्मणात क्षत्रिय वर्णाद्वारे वैश्य वर्णाचा नाश करण्याचे व वैश्य वर्णाद्वारे क्षत्रिय वर्ण नाहीसे करण्याचे मंत्रही देण्यात आलेत ही परखड वस्तुस्थिती आहे. हे दोन्ही वर्ण त्याला बळीही पडले आहेत; पण ह्यापुढे अवर्णांना व्यापार करावा लागणार आहे. अनेक अवर्ण व्यापारात प्रत्यक्ष उतरलेले आहेत. अशा अवर्ण व्यापाऱ्यांना दुकान चालवताना 'गिऱ्हाईकाशी कसे वागावे' ह्याबाबत महात्मा गांधींनी केलेला उपदेश हा लाख मोलाचा आहे. एक बनियाच असा उपदेश करू शकतो हे लक्षात घेतल्यास म. गांधी पचवणे सोपे जाईल. मराठी माणसाला वैश्य संस्कृतीविषयी कसलीच माहिती नाही. कारण मुसलमानानी संपूर्ण मराठी वैश्य समाज हा कापून काढल्याने तो ह्याबाबत मार्गदर्शन करायला जिवंत नाही. त्याचा परिणाम असा झाला की, मराठी समाजात वैश्य संस्कृती कधी निर्माणच झाली नाही. वैश्यांचा आणि त्यांच्या दुकानदारीचा द्वेष करण्यात मराठी माणसाने आपला काळ आणि वेळ नेहमीच खर्ची घातलाय. परिणामी वैश्य काही नष्ट झाले नाहीत. उलट सगळा व्यापार अमराठी लोकांच्या ताब्यात गेला. मेलेला मराठी वैश्य काही जिवंत होऊन परतणार नाही; पण जो अमराठी मनुष्य आता इथली मराठी भाषा स्वीकारून मराठी झालाय. निदान त्याला तरी थोडी प्रतिष्ठा द्यायला हरकत नाही (कोकणात कर्नाटकातून स्थलांतरित झालेला वैश्य हा आता जवळ जवळ मराठी होत आलाय, पण मराठी संस्कृतीने ह्या मराठी झालेल्या वैश्यांना स्वीकारून त्यांना प्रतिष्ठा दिल्याचे काही दिसत नाही). ह्याशिवाय जो वैश्य आता भारतभरातून इथे येतोय त्याच्या यशाचे रहस्य समजून घ्यायचे असेल तर म. गांधींची 'गिऱ्हाईकांशी कसे वागावे' ही शिकवणूक समजून घ्यावी लागेल. व्यापार करणाऱ्या आणि करू पाहणाऱ्या सर्व शूद्र, अतिशूद्र अवर्ण लोकांना कुठल्याही तत्त्वज्ञानापेक्षा ही शिकवणूकच उपयोगी ठरेल. एक गोष्ट सांगावीशी

वाटते. ह्या जगातील ग्रीक संस्कृती असो किंवा सिंधू संस्कृती ह्या मूलत व्यापारी संस्कृती होत्या. आजचे जे जग निर्माण झाले आहे ते ग्रीक आणि सिंधू संस्कृतीच्या आधारे निर्माण झाले आहे. वैश्य संस्कृती ही व्यापारी असल्याने तिचा परक्या संस्कृतीशी आणि परक्या लोकांशी वारंवार संबंध येतो. त्यामुळेच वैज्ञानिक गोष्टी व सहिष्णुता इथे क्षत्रिय संस्कृती व ब्राह्मणी संस्कृतीच्या तुलनेत जास्त आढळतात. ह्या देशातल्या सगळ्या सुधारणा ज्यांच्या पायावर आंबेडकर उभे आहेत त्या इंग्रज वैश्यांनी घडवून आणल्या आहेत ह्याचा विसर अनेकांना पडला आहे. अगदी पहिल्यांदा मुलींना शिक्षण देणारे लोकही हे इंग्रज होते हे परखड ऐतिहासिक सत्य आहे. इंग्रजी वैश्य इथे आले नसते तर आंबेडकरही झाले नसते.

प्रश्न असा आहे की, उभ्या आणि आडव्या अक्षाबाबत क्रांतिकारक असणारे गांधीजी खोल अक्षाबाबत मात्र कर्मठ का राहिले. एकतर खोल अक्ष धुडकावला तर वर्णसंघर्ष निर्माण होऊन भारतीय समाजात विशेषतः गावात फूट पडेल व त्यातून प्रचंड हिंसा होईल अशी त्यांना भीती होती. दुसरे कारण 'माझेपणात' आहे ते समजायचे असेल तर आपणाला जरा खोलात जावे लागेल. हे माझे माझे नेमके काय आहे ह्यासाठी आपणास पुन्हा वर्णव्यवस्थेकडे जावे लागेल. ह्या वर्णव्यवस्थेत सवर्णाकडे पाहिले तर काय दिसते? प्रत्येक सवर्णाकडे

१) ब्राह्मण : ज्ञान, धर्मस्थाने

२) क्षत्रिय : सत्ता, सत्तास्थाने

३) वैश्य : व्यापार, अर्थस्थाने

४) शूद्र : शेती, शेतजमीन अशी व्यवसाय व व्यवसाय स्थाने आहेत आणि अवर्णांना ज्या वर्णाकडे जे आहे ते द्यायची कुणाचीच तयारी नाही. ब्राह्मणांना शूद्र राजा झाला तरी चालेल. त्याला ते क्षत्रिय म्हणून मान्यता द्यावयास तयार आहेत, पण वेद, वेदज्ञान मात्र द्यावयास तयार नाहीत. आपले धर्मस्थान द्यायचे नाही. त्यामुळे ज्ञान आणि शासकीय जागाही द्यायच्या नाहीत. क्षत्रियांना इतरांनी ज्ञान मिळवले तरी चालेल, शिक्षण घेतले, व्यापार शेती केली तरी चालेल, पण राजकीय सत्ता आणि सत्तास्थाने मात्र इतरांना देताना त्यांच्याही जीवावर येते. अगदी अत्यंत सुधारक असणाऱ्या एखाद्या महाराजाची गादी एखाद्या अस्पृश्याने मागितली असती तर आम्हाला खात्री आहे त्या महाराजाने त्या अस्पृश्याला मारले तरी असते किंवा संस्थानातून हाकलून तरी लावले असते. ब्रिटिशांनी बाबासाहेब आंबेडकरांना नेहमीच स्वागतशील नजरेने एन्टरटेन केले. कारण आंबेडकर त्यांच्या राजकीय सत्तेला धक्का लावत नव्हते. तसा धक्का लागला असता तर त्यांनाही गांधींच्याप्रमाणे ब्रिटिशांनी तुरुंगाचा रस्ता दाखवला असता. वैश्यांना आपली व्यापारावरची मक्तेदारी सोडायची नव्हती. विशेषतः कर्मठ वैश्यांना परिणाम गांधीजींनाही वैश्यांचा जन्माधिष्ठित व्यापार शाबूत राहावा व त्यांचा धनसंचय वाढतच राहावा असे वाटले म्हणूनच त्यांनी हा असा मूर्ख देशी समन्वयवादी पर्याय शोधला. म्हणजे इतरांनी व्यापार करावा, पण भांडवल संचय करू नये हाच त्यामागचा उद्देश. शूद्रांनाही जमिनीची मालकी अस्पृश्यांना मिळूच नये असे वाटते, म्हणून गावात अतिशूद्रांनी घरे बांधली किंवा शेतजमीन खरेदी केली की त्यांच्या पोटात दुखायला लगेच सुरवात. एखादा अस्पृश्य शूद्राचे व्यवसाय करायला लागला (उदा. सुतार काम, लोहारकाम) की त्याला गावात शूद्रांचा विरोध त्वरित सुरू.

ह्या पार्श्वभूमीवर अवर्णाकडे पाहिले तर काय दिसते? तर त्यांच्याकडे गमवायला काहीच नाही असे दिसते. खऱ्या अर्थाने त्याला कंगाल म्हणावा असा हा वर्ण पण समजा उद्या ह्याच्याकडे काही आले तर हा कसा वागेल? तर जसे सवर्ण वागतात तसाच. ह्याची चुणूक थोडीथोडीशी साहित्य व राखीव जागा ह्यांच्याबाबत दिसते. हळूहळू अवर्णही ह्याबाबत पझेसिव होताना दिसतायत. त्यामुळेच दलित साहित्यांत इतरांना प्रवेश करण्यास मनाई करण्याकडे कल.

हे असे का होते ह्याचे उत्तर स्पष्ट आहे. सर्वसाधारणपणे पुरुषता ही 'मी' 'मी' करते, तर स्त्रैणता 'माझे' 'माझे' 'माझे' करते. सवर्ण ह्या घडीला मी ब्राह्मण मी क्षत्रिय ह्यातला 'मी'त्वाचा अहंकार सोडायला काही प्रमाणात तयार झालेत. उदाहरणार्थ गांधींच्याकडे पाहिले तर 'मी' वैश्य हा अहंकार कुठेच आढळत नाही. वास्तविक वैश्य हा असा वर्ण आहे की, दक्षिणेत मुसलमानांनी ह्या वर्णाचा समूळ उच्छेद केला. हा उच्छेद महाराष्ट्रात इतका होता की, आज महाराष्ट्रातले जे वैश्य आहेत ते एकतर कर्नाटकातून जीव वाचवून पळून आलेले आणि त्यामुळे वाचलेले वैश्य आहेत किंवा शिवशाहीत छ. शिवाजींनी आणलेले गुजराती व मारवाडी आहेत. महाराष्ट्रात मराठी वैश्य हा प्रकार जवळ जवळ अस्तित्वातच नाही. ह्यातील भीषणता इतकी दारूण आहे की, मराठी लोकांना मराठी वैश्यांना त्यांची संपत्ती बळकावून मुसलमानांनी सरसकट कापून टाकले ह्याची जाणीवही नाही. हमारी दास्तानभी नही रही महाराष्ट्र में हे म्हणायलाही मराठी वैश्य जिवंत नाहीत. मुस्लिमांचे आक्रमण सर्वाधिक किंमत देऊन सोसलेला हा वर्ण. दलितांच्या आधी सर्वाधिक धर्मांतर हे ह्या वर्णाने केले आणि जैन धर्म स्वीकारला व नंतर इस्लाम (बोहरी समाज हा हिंदू वैश्यांनी केलेल्या धर्मांतराचा परिणाम आहे). त्यामुळेच अनेक धर्मीय होण्याचे विचित्र भाग्य ही ह्याला लाभले. पारसी, ज्यू, जैन हे तिन्ही धर्म प्रामुख्याने व्यापारी आहेत. वैश्यांची सरसकट कत्तल झाल्यानेच पारसी व ज्यू ह्यांना काही प्रमाणात व्यापाराची संधी मिळाली. हा सगळा कडवट भूतकाळ असूनही गांधींनी कधीही हिंदू-मुस्लि प्रश्नात हा कडवट भूतकाळ आणला नाही. मी वैश्य आहे ह्यापेक्षा आपण भारतीय आहोत हे लक्षात ठेवून त्यांनी नेहमीच हिंदू-मुस्लिम ऐक्याचा प्रयत्न केला.

त्याउलट ह्या 'मी'त्वाचा लोपच झालेला समाज फुले व आंबेडकरांच्यापुढे होता. मी शूद्र आणि मी अतिशूद्र ह्यात अहंकार बाळगावे असे काहीच नव्हते. ह्यांनी ह्यावर मानसशास्त्रीय मार्ग शोधला. ब्राह्मण सामावून घेणे शक्यच नव्हते आणि वैश्य महाराष्ट्रात अस्तित्वात नव्हते. त्यामुळे एकच वर्ण होता तो म्हणजे क्षत्रिय. फुल्यांनी त्यामुळेच शूद्र हे पूर्वीचे अनार्य क्षत्रिय होते अशी मांडणी केली आणि आंबेडकरांनीही तोच कित्ता गिरवून शूद्र हे क्षत्रियच होते असे प्रतिपादन केले. वास्तविक शूद्रांची संख्या पाहता ते केवळ क्षत्रियांपासून निर्माण झाले ह्यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. मुळातच कुठल्याही गोष्टीसाठी कुठले तरी एक कारण जबाबदार मानणे हे विज्ञानात काही प्रमाणात ठीक असेल ही, पण समाज विज्ञानात हा एककारणवाद परवडणारा नाही. सामाजिक, राजकीय, आर्थिक अशा सामूहिक समस्यांचा उलगडा करायवयाचा असेल तर 'अनेक कारणवाद' स्वीकारणे हे गरजेचे आहे. इथे फुले, आंबेडकराचे प्रमेय पूर्ण चुकीचे आहे असे सुचवायचे नाही, पण शूद्र व अतिशूद्राची निर्मिती ही १) बहिष्कृत केले गेलेले ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र २) क्षत्रिय व वैश्यापासून च्युत केले गेले क्षत्रिय व वैश्य ३) मूळचे स्थानिक लोक जे जिंकले गेले ४) बाहेरून आलेले उपरे लोक ज्यांना शूद्र अतिशूद्रात सामावून घेतले गेले ५) सामान्य जनता जिने स्वतःला कुठेही ढकलले तरी फिकीर केली नाही ६) गुन्हेगार ७) संकरित अशा अनेकविध लोकांतून झाली हे सत्य आपण स्वीकारावे हे उत्तम 'मी' क्षत्रिय 'मी' क्षत्रिय ह्या अहंकारासाठी फक्त क्षत्रियांपासून निर्मिती झाली हे प्रमेय ठीक आहे हा मुद्दा इथे आणण्याचे कारण म्हणजे गांधी आणि आंबेडकर ह्या दोघांत 'मी अस्पृश्यांचा एकमेव पुढारी' हा प्रकार प्रचंड आढळतोआणि दोघेही इथे प्रचंड पुरुषी झालेले दिसतात. वास्तविक गांधी हे अस्पृश्यांचे बहिर्गत पण राष्ट्रीय पुढारी होते आणि त्यांच्या ह्या राष्ट्रीयपणाचा फायदा म्हणूनच काँग्रेसने अस्पृश्यांविषयी राष्ट्रीय धोरण अंमलात आणून तशी घटना आणली. सवर्णाची गांधीजींनी जागृत केलेली न्यायबुद्धी व आंबेडकरवादी चळवळ ह्यांच्यामुळेच स्वतंत्र भारतात अस्पृश्यांवषयीचे धोरण प्रागतिक झाले; अन्यथा बाबासाहेबांचे कार्य हे महाराष्ट्राबाहेर १९४७ पर्यंत तरी काहीसे मर्यादित होते ही वस्तुस्थिती आहे. बाबासाहेबांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला असता आणि संख्येच्या बळाचा वापर करून २०% जागा काँग्रेसअंतर्गतच पदरात पाडून घेतल्या असत्या तर दलितांचे राजकारण अधिक वेगवान झाले असते, पण मुळात बाबासाहेब हे एकदम संपूर्ण परिवर्तन व तेही तातडीने मागत होते. त्यांना गांधींचा स्टेप बाय स्टेप जाण्याचा मार्ग पसंत नव्हता, पण त्यामुळे एकदम संपूर्ण परिवर्तन तर झालेच

नाही; पण जी तातडी त्यांना खुणावत होती तीही निबर कातडीच्या पुढाऱ्यांनी पार धंडगार करून टाकली. ह्याबाबत मार्क्स, लेनिन, स्टालिन ह्यांचा जसा पराभव झाला नेमका तोच पराभव बाबासाहेबांच्या वाट्याला आला आणि पुढे दलित पँथरच्या नेत्यांचेही तेच झाले. गांधीजींनी १९२० साली अस्पृश्यतेसंदर्भात तातडीने काम करण्यासाठी चरखा आणि अस्पृश्यता निर्मूलनासंदर्भात एक ठराव जेव्हा काँग्रेसमध्ये आणला तेव्हा एकजात सगळ्या काँग्रेस पुढाऱ्यांनी त्या तातडीला वाटाण्याच्या अक्षता लावल्या. गांधीजी ह्या एकाच अनुभवाने शहाणे झाले आणि आपण इथे स्टेप बाय स्टेप काम केले पाहिजे हे त्यांच्या लक्षात आले. पुढे काँग्रेसनेही हेच धोरण स्वीकारले. गांधीजींची स्रैणता ह्याकामी त्यांना साहाय्यक ठरली. आंबेडकर हे मात्र अस्पृश्यतेच्या अत्यंत दाहक अनुभवातून स्वतः गेलेले असल्याने आणि त्यांची प्रवृत्ती पुरुषी व जिला खऱ्या अर्थाने मर्द का बच्चा अशी असल्याने कायम धगधगणारे क्रांतिकारक राहिले. अगदी मरणाआधीही बौद्ध धर्म स्वीकारून त्यांनी चातुर्वर्ण्याच्या कानाखाली काढलीच. तिचा आवाज दुर्दैवाने स्टेप बाय स्टेप जाणाऱ्या व ऐकणाऱ्या हिंदू कानापर्यंत तितक्या प्रमाणात पोहचला नाही. आम्ही भारतीय समाज स्रैण आहे म्हणतो तो ह्यामुळेच. स्रैणता ही हळूहळू परिवर्तन घडवते व घडू देते. तिला क्रांत्या एकदम पचत नाही त्यामुळेच ती त्यांनाही रवंथ करत पचवते. त्यामुळेच गांधींना पूर्ण वगळून ह्या देशाचा विचार करता येत नाही असे आम्हास वाटते. तरीही गांधींना पूर्ण वगळून कुणाला जायाचे असेल त्यांनी जावे. शेवटी गांधीजींनीच म्हटल्याप्रमाणे व्यक्तीचे आत्मस्वातंत्र्य सर्वात महत्त्वाचे आहे.

आता मुद्दा स्रैण 'माझे' माझे हा तर प्रत्येक वर्ण जोपर्यंत हे 'माझे' अधिकार (वर्णदत्त व जातीदत्त म्हणजे वर्ण व जातीमुळे प्राप्त झालेले) सोडत नाही तोवर समाज वर्णजातीमुक्त होणे शक्य नाही. काही दशकांनी अवर्णानांही प्राप्त झालेल्या जातीदत्त व वर्णदत्त राखीव जागा सोडाव्याच लागणार आहेत, अन्यथा उलटी वर्णव्यवस्था सुरू होऊन संघर्ष अटळ होईल. थोडक्यात, अस्पृश्यांचे प्रश्न सोडवायचे असतील तर ह्यापुढेही गांधी, शाहू, फुले ह्यांच्याशी सहकार्य करतच वाटचाल करावी लागेल.

आपले विश्वासू,
**काळे / सरनोबत / परब**

मा. संपादक,
स. न. वि. वि.

गेले काही दिवस कांबळे, मेश्राम, डोईफोडे व आयु लोकनाथ दे. बनसोड ह्यांच्यात चाललेला वाद वाचला. तो वाचून माझे मत जे झाले ते पुढीलप्रमाणे

गांधी हे कल्पितानुसार वरल्या स्थानावर होते, पण ते स्रैण असल्याने ते खालच्याकडे सुधारणेच्या, करूणेच्या भावाने बघू शकले. ते पुरुषी असते तर कदाचित त्यांनी परंपरेने चालत आलेली ताकद वापरून अत्याचारच केले असते. ह्याउलट आंबेडकर खालच्या स्थानावर होते ते जर स्रैण असते तर कदाचित अत्याचार सहन करत वरचे लोक कधी बदलतात त्याची वाट पाहत अर्ज विनंत्याचे राजकाण करत बसले असते; पण ते पुरुषी असल्यानेच त्यांनी अत्याचाराला प्राणपणाने विरोध केला. दलितांना अस्मिता दिली. एकंदर दोघांचीही वृत्ती स्त्रैणता आणि पुरुषता एकमेकाला पूरकच ठरली व सवर्ण-अवर्ण ह्यांच्यात होऊ घातलेला रक्तरंजित संघर्ष विशेषतः गावात होऊ शकला असता असा टळला. असो.

जाता जाता दोन्ही पत्रलेखकांना ते कल्पित खालच्या स्थानावर असल्याने प्रश्न ! त्यांनी आपल्या विवेचनात आंतरजातीय विवाहावर खूप गप्पा मारल्यात म्हणून विचारतोय. त्यांच्या समाजातील किती लोकांनी आपल्यापेक्षा खालच्या जाती जमातीत मुली दिल्यात किंवा सुना करून आणल्या? दलितांच्यात किती आंतरजातीय विवाह झाले? जर त्यांना आपल्यापेक्षा खालच्या जाती जमातीतील लोकांशी लग्न करणे पचनी पडत नसेल त्यावेळी त्यांची तथाकथित उच्च जात आडवी येत असेल, तर बहुजन व सवर्ण लोकांनी मात्र त्यांच्याशी लग्न करावे अशी अपेक्षा का? गांधीजींनी अस्पृश्यांसाठी काहीतरी केले भले ते खूप कमी असेल, तर ह्या लोकांनी असे आपल्यापेक्षा खालच्या लोकांसाठी काय केले? गांधीजींनी ऊठसूठ अस्पृश्यांसाठी काय केले म्हणून विचारणाऱ्या बाबासाहेब आंबेडकरांनी त्यांच्यापेक्षाही खाली असणाऱ्या भटक्या, गुन्हेगार मानल्या गेलेल्या वा आदिवासी जाती जमातींसाठी नेमके काय केले, किती संस्थात्मक काम केले ह्या अस्पृश्य जाती जमातीतील किती लोक त्यांच्यात कार्यकर्ते म्हणून गेले, त्यांनी त्यांच्यात किती सुधारणा केल्या, किती संघटना स्थापन केल्या आणि हे सर्व केव्हा केले ह्याचा लेखाजोखा आम्हा बहुजन समाजातील लोकांना देतील काय?

मी हे प्रश्न विचारून उंगल्या करतो असे काहींना वाटेल, पण इतरांच्याकडे उंगल्या करणाऱ्यांनी जराकधी स्वतःकडे उंगल्या करून स्वतःला तपासावे की? शेवटी इतिहास सर्वांचाच फैसला करत असतो आणि मला खात्री आहे की, येणाऱ्या नवीन पिढ्या त्या बहुजन समाजातील असोत किंवा भटक्या, गुन्हेगार मानल्या गेलेल्या वा आदिवासी जमातीतील कधी ना कधी हे सगळे प्रश्न विचारणारच की ! इतरांच्याकडून उत्तरे मागणाऱ्यांना कधी ना कधी स्वतःलाही उत्तरे द्यावी लागतात.

आंतरजातीय विवाह सवर्णांशीच होतात असे नाही, तर ते आपापसांत भिन्न जातीत होऊ शकतात आणि जे आपल्यापेक्षा खालील जाती जमातीत आहेत त्यांच्याशीही होऊ शकतात ह्याचे भान अस्पृश्यांनीही बाळगावे. पूर्वी ब्राह्मणांची ब्राह्मण वर / वधू पाहिजे अशी विवाहाची जाहिरात यायची. आजकाल बहुजन समाजाच्या विवाहविषयक जाहिरातीत हटकून S.C., S. T. नको असा मजकूर येतोय आणि अस्पृश्यही आपल्या जातीतच विवाह करू पाहतायत. फक्त बौद्धांचे भरणारे विवाहविषयक मेळावे पाहिले की सगळे स्पष्ट होते.

आपला विश्वासू,
**चन्द्रशेखर जाधव**

काही अपरिहार्य कारणामुळे हा वाद इथेच थांबवण्यात येत आहे. खरे तर हा वाद पुढेही चालू ठेवणे आम्हाला आवडले असते; पण आपल्या देशात आणखीही काही प्रश्न आहेत. त्यांच्यावर असे वाद होऊ शकतात. त्यांनाही जागा द्यावी लागणे अपरिहार्य आहे.

**-संपादक**

अप्सरा सगळा भविष्यकाळ श्रीधरपुढे उभा करत होती आणि श्रीधर चकित होऊन पाहात होता. हा एक काल्पनिक भविष्यकाळ आहे ह्याची त्याला कल्पना होती; पण हा खराही होऊ शकतो हे त्याला माहीत होते.

अप्सरेने सगळा भविष्यकाळ ऑफ केला. तो काहीतरी प्रतिक्रिया देईल अशी तिला अपेक्षा होती, पण तो गप्प होता. आता आपणच बोलायला सुरुवात करायला हवी ह्या विचाराने ती त्याच्याजवळ आली, खाकरली. श्रीधरला अप्सराही खाकरतात हे पाहून गंमत वाटली. ती त्याच्या जवळ येत हलक्या आवाजात पुटपुटली

"तर जे भविष्यात होणाराय ते सगळं असं आहे ज्या समस्येचा फैसला विसाव्या शतकातही होणार नाहीये तिच्यासाठी तू ह्या शतकात भांडतोय कशाला?" अप्सरेनं जणू काय मी तुझ्या हितासाठीच विचारतीय असा आव आणत त्याला विचारलं होतं.

"पण हे सगळं फ्यूचर कुणी डिझाईन केलं?"

"अर्थात नारदानं आणखी कोणं हे काम करणार? नारदमुनी त्रिकालदर्शी आहेत. त्यामुळे ते कधीही भविष्यकाळात जाऊ शकतात. नाहीतरी ह्या विश्वात प्रत्येक काळ हा कुणाचा तरी भूतकाळ आणि कुणाचा तरी भविष्यकाळ असतोच. काळ तू समजतोस तितका सरळ जात नाही किंवा वर्तुळ पूर्ण करून पुन्हा पुन्हा त्याच जागी येत नाही."

"तू फेक आहेस मग तुझा काळाशी काय संबंध?"

"मी कदाचित भविष्यकाळ असेन."

"कुणाचा?"

"ते मला नाही माहीत....स्वर्गाकडं सगळ्याच प्रश्नांची उत्तर

नसतात....आणि काळ म्हणशील तर ती एक गुंतागुंतीची गोष्ट आहे....माझ्याइतकीच काल्पनिक माझ्याइतकीच खरी.....कदाचित काळ हा अवकाशाचा आरसा आहे. त्यात अवकाश स्वतःच रंगरूप पहात असतो....जाऊ दे तू ह्या सगळ्याची चर्चा करून तुझा का वेळ वाया घालवतोयस? तू तुझ्यापुढे अप्सरा आहेत त्यांचा भोग घे.''

''एलसायबोर्गचं काय झालं?''

''मला माहीत नाही....खरंतर कुणालाच माहीत नाही, पण ज्याअर्थी तू अजून स्वर्गात आहेस त्याअर्थी तो जिवंत आहे. इतका चिवट प्रोग्राम आम्हाला आजवर भेटला नव्हता.''

''मला पृथ्वीवर उडी टाकता येणार नाही काय?''

''तू कैदेत आहेस.''

''मला उत्सुकता आहे.''

''ती ह्या घडीला निरर्थक आहे. तू फक्त मला बघ. ही माझी नितळ त्वचा बघ.....''

श्रीधर तिच्या त्वचेत विरघळायला लागला. स्पर्श ! त्याचं सगळं शरीर तहान झालं. गेले कित्येक दिवस त्याचं स्पर्शपाणी बंद करण्यात आलं होतं. गेले कित्येक दिवस त्याला फक्त अस्पृश्यतेविषयीची भूतरूपे व भविष्यरूपे दाखवण्यात येत होती. ती दाखवण्यामागचा हेतू स्पष्ट होत नव्हता.

फक्त पाहणे
पाहणे
पाहणे

पाहून पाहून पाहून माणूस पाहणार किती? ह्या अप्सरा त्याला पाहण्यातून मुक्त करायच्या. हा एक विचित्र स्वर्ग होता जिथे भिंती कितीही मैल पुढे सरकायच्या, पण नाहीशा व्हायच्या नाहीत. छत कितीही उंच जायाचे, पण गायब व्हायचे नाही. पण तरीही तो माघार घ्यायला तयार नव्हता. एलसायबोर्ग जिंकला तर हे सगळंच कोसळून पडणार होतं. मग त्याला सगळ्या अस्पृश्यांना घेऊन संपूर्ण भारतवर्ष बदलून टाकायचा होता. सनातन धर्माचे सगळे माठ फोडून टाकायचे होते. अस्पृश्यता टिकवू पाहणारा त्यांचा प्रत्येक प्रोग्राम उद्ध्वस्त करायचा होता. ह्या अप्सरांचे स्पर्श त्याला शाबूत ठेवायचे. त्या डिजिटल असल्या तरी अस्पृश्यता नष्ट झालेला आठवा स्वर्ग ह्यांच्यामुळेच त्याच्या आवाक्यात होता. त्या ह्या शक्यतेच्या मातृका होत्या. अस्पृश्यता पाळणारे सनातन धर्माचे सातही स्वर्ग अस्पृश्यता न पाळणाऱ्या ह्या आठव्या स्वर्गाला उपरा समजत. स्वर्गकुसाबाहेरचा समजत. त्यांच्या स्वर्गातील सगळी घाण साफ करून ती पचवण्याचे काम हा आठवा स्वर्ग करी. ह्या स्वर्गातल्या अप्सराही अस्पृश्य समाजातून आलेल्या देवदासी होत्या. त्या सनातन धर्माच्या दासी होत्या आणि श्रीधर यशस्वी झाला तर आपणही मुक्त होऊ ह्याची त्यांना खात्री होती. त्यामुळेच त्या एकीकडे इंद्राची आज्ञा पाळत होत्या आणि इंद्राला धुडकावून लावणाऱ्या ह्या अजीबोगरीब माणसावर प्रेमही करत होत्या. त्यांना ह्या युद्धाचं स्वरूपच कळत नव्हतं आणि त्या ते युद्ध करणाऱ्यांनाही कळतंय की नाही ह्याविषयी संशयी होत्या. एकंदरच लढणारे दोघेही त्वचेवरच रेंगाळत होते.

॥३॥

जे सामावून घेतले जात नाही त्वचेत अडेल
ते अस्पृश्य
जे सामावून घेऊन विरघळवले जाते त्वचेत पडेल
ते स्पृश्य
त्वचा
जी खिळवून ठेवतिये इंद्रियांचे त्रैलोक्य
आणि मेंदूला खेळवतिये पाताळघरात
त्वचा
जी हृदयापर्यंत पोहचू देत नाहीये माझा लंगडा पाय
पण जी हृदयाचे सांगोपांग फाटक बनतीये
त्वचा
ती सरड्याप्रमाणे रंग बदलतीय सरपटणारा
आणि तरीही ओळखपत्र बनतीये फरफटणारं
ज्याला कळंतय त्याचं जळतंय
ज्याला कळत नाहीये त्याचं जळजळतंय

सत्य
जे अनिश्चितता मागणाऱ्यांना अनिश्चितता देतंय
निश्चितता मागणाऱ्यांना निश्चितता
माझ्या आसपास त्वचेचा ॲपोफोनिया
जो फॉल्स अलार्म वाजवून
मीनिंगलेस डाटातही पॅटर्न दाखवतोय

पॅटर्न
जे ठरवतायत काय स्पृश्य आणि काय अस्पृश्य

सिडक्शन
जे रिडक्शन घडवयत आणि एनलार्जमेंटही
ही त्वचा जी मला गुंडाळता येत नाहीये
जिनं मलाच गुंडाळून ठेवलंय
माझ्या शरीरात
एक गुंडाला सव्वागुण्ड होतीये

त्वचा
जी साम्यवादी होईल असं वाटलं होतं
आणि जी बघता बघता कॅपिटॅलिस्टीक झाली
जिला कळत नाहीये
आपली डेमोक्रसी कशी साजरी करावी ते
आणि जी आसपासच्या माजोरड्या हुकूमशाह्यांतून
स्वतःचं कोमलांगी स्वातंत्र्य मिरवत न्हेतिये
त्वचा
जी भौचक्की झालीये
इन्टरॅनशनल चक्कीतला
स्वतःचाच चकचकीतपणा बघून - सगळतीये
सगळंच त्वचाळतय
आणि कुणालाच माहीत नाही
तिच्यातून कुठलं पादत्राण तयार होणारय
आणि ते घालून
कोण
कुठं जाणारयं?

॥४॥

कंडोम
हस्तमैथुन करतोय
कपडे
ब्ल्यू फिल्म पाहतायत
आणि मी
ह्या सगळ्यातून होत पसार
फुलवतोय पिसारा
आख्ख्या पसाऱ्याचा
आख्खी त्वचा ब्रह्मचर्यावर उगाळत

॥५॥

अभिव्यक्ती - जी तुझ्यासाठी आहे हिंडत - खोलवर
दमन जे तुझ्यासाठी आहे - भिवत - अंगभर
माझ्यामधून निघतंय - त्वचा त्वचा वाचेत वाजवत

मी कुठाय

स्रोत
जो पतंगासारखा गोते खातोय - इंद्रियाच्या आभाळात
कुठाय?

उर्जा
जी उठण्याआधीच दाबली जातीये - निद्रेत
पंगा
जो दंगा घालण्याआधीच लफंगा होतोय - भाषेत कुठाय?
जे फुदकणाऱ्या त्वचेत दाबलं गेलं ते
फतफतणाऱ्या शब्दात उतरतय
जे वखवखणाऱ्या शब्दात दाबलं गेलं
ते नखनखणाऱ्या त्वचेत उतरतंय
वर जे राजवंशात आडवल जातंय
ते राजरोस खालून फुटतंय

वर डोकं खाली लिंग
पंद्रह आनेकी मगजमारी एक आनेकी झिंग
तू वारंवारअनवाणी येत डिवचतीयेस माझी वाणी
आणि मी क्रोधात बसून
तुझ्या पायात असलेल्या बोधाची प्रतीक्षा करतोय अनवाणी

योद्धा
जो सप्तरंगी कामवासनेत दाबला गेला
तिला रक्तरंजित शस्त्रात उतरवतोय

सभ्यता
जी अभिव्यक्तीच्या अहिंसक शिखरावर होती
रानटीपणाकडून कापली जाऊन नपुंसकत्वात गडगडतीये
मी बर्फाळ लिंग वहातं करत
पाणीदार शस्त्र काबूत ठेवतोय

एक निर्भौपिक मूल
जे संसारात वहात अभिनेता झालं
बुद्धत्वात परततंय

ह्या ढक्कन गर्दीपासून तुटले की रोगी
ह्या रोबाट गर्दीशी जोडले की निरोगी
एक मानसिक तर्कशास्त्र अंगावर येणारे - त्वचाही लावून न घेता
मी फेटाळून लावतोय

मी फेटाळून लावतोय ती गर्दी
जी स्वतःच रुग्ण आहे तृष्णांच्या खाटांवर
मन
जे स्वतःच आजार आहे गतीच्या मजबूर लाटांवर

सामाजी होऊन सुखी होण्याचं बीळ
बंद केलंय माणूसपणाच्या बुचानं
आता फक्त दैवी होण्याची खिडकी खुली
जी मागतीय माझ्या घरादारावर फुली

खेळणी
राष्ट्रीय खेळणी, राजकीय खेळणी, सामाजिक खेळणी,
प्रतिष्ठेची खेळणी, जातीय खेळणी, धार्मिक खेळणी
लोण्यासारखी वितळतायत परिपक्वतेच्या अग्नीत.

मी आहे
मी आहे
मी आहे

कृती जी माझ्यासाठी सुरू झाली
आणि माझ्यापेक्षा मोठी झाली - मी पाहतोय
मी आहे ही माझी निवड नाही - आपोआपता आहे
मी करतोय ती माझी निवड आहे
मी निवडणारा आहे
काही करण्याआधीच मी थांबतोय
माझ्यात कोणीतरी ओरडतोय मेलो मेलो मेलो
आणि मी जिवंत आहे

कंटाळवाण्या तालमी उबाऊ प्रयोग
मला हवाय एक अकस्मात धक्का
जो मुखवट्यासकट भूमिकाच फाडेल

मला संभोगाची शिंक येतीये
आणि मी शिंकेत थांबतोय

ऊर्जा एकतर येतीये किंवा जातीये
मी स्तब्धतेत मधोमध थांबतोय

मला तुझा ह्या क्षणी प्रचंड संताप येतोय
आणि मी तुला थंडगार मिठी मारतोय
मी थांबतोय

समाज जो फक्त खोटारडा उरलाय
मला संन्यास घ्यायला विवश करतोय
मी संन्यासात माझा प्रामाणिकपणा शाबूत ठेवत थांबतोय

कामवासना
जी ना प्रायोजित आईबापानी दिली ना प्रायोजित शिक्षकांनी
ना पुस्तकांनी ना मस्तकांनी ना संस्कारानी

कामवासना
जी साऱ्या संहितांच्या बाहेर
भाषेच्या बाहेर
प्रयोजनशून्य कामवासनाच आहे
मला कामवासनेतून बोलवतीये
मी माझ्या कामकोशिकात थांबतोय

माझ्यात एक माझंच प्रेत आहे
जे कागदाइतकंच हलकं आहे
आणि तरीही जे मला सोडून देता येत नाहीये
फरफरतय
आणि मी त्या फरफरण्यात थांबतोय

मी माझ्यातच थकवा येईपर्यंत फिरतोय
तुझ्यात कोसळतोय - पूर्ण
माझं नाक स्ववासाचा चस्का लागलेलं
तुझ्या श्वासातूनही घेतंय वास माझा
मी माझा अदमास घेत तुझ्या श्वासात थांबतोय
मनुष्य बनणं
जे एक आवश्यक पाप होतं - जनावरतंय
मी जनावरात थांबतोय
माझ्यात जे जनावर आहे ज्याला भाषाच येत नाही
त्याला खोटं काय बोलता येणार खोटं बोलण्यासाठी माणसाळतंय
मी माणसात थांबतोय
अप्रामाणिक समाजात प्रामाणिकता ही व्यक्तिगत निवड असते
मी प्रामाणिकपणात व्यक्तिगततोय

विद्रोह जो पशुत्वाकडे न्हेतोय मी टाळतोय
विद्रोह जो बुद्धत्वाकडे न्हेतोय मी निवडतोय

तथ्ये जी बदलली जाऊ शकतात
सत्य - जे शोधलं जाऊ शकतं

ह्यांच्या दरम्यान कल्पना - ज्या बदलल्या जाऊ शकतनाहीत
ज्यांच्याविषयी फक्त जागृती करता येते
एकमेकांत मिसळत माझं रक्त कालवतायत
एक कालवा होतोय काळाचा -
मृत्यूचा दरवाजा किलकिल करणारा
ब्रह्मदेव लॅंपटॉपतोय
माझे क्लोन मांगतायत सत्यनारायणाची महापूजा
माझ्या पेजरवरून अकबर, अशोकाला मेसेज पाठवतोय
एकनाथाचं गाढव आर्यांची मुळे शोधण्यासाठी एस्कीमोजकडे सिलीकॉन पाणी मागतंय
टीव्हीवरच्या डॉल्स थेट स्टुडिओतील स्वर्गात जे डिजीटल नाचतायत
मी वर्तमान शतकात त्यात माझ्या आख्ख्या तोंडाचंच मृतवत बर्फ. स्वत:वरच तोंडघशी पडलेलं
मी मागील शतकात त्यात माझ्या पुढील तोंडाचं पाणी - पळालेलं
मी विसाव्या शतकात त्यात माझ्या मागील तोंडाची वाफ -दवडलेली
मी धांवतोय

मी मला महान वाटतोय - मी स्वत:शी खोटं बोलतोय
मी इतरांना झुरळ वाटतोय - ते माझ्याशी खोटं बोलतायत
परस्परांत हितसंबंधाचा खोटेदार समजुतदारपणा
एकमेकाची खोट न काढणारा - टोकतोय
मी खोट्या मैत्रीस टोचत मैत्रीत थांबतोय

मी कितीजणांना नैतिकतेतून ताप दिला
मी कितीजणांच्या अपराध भावांचा बाप झालो

ज्ञान शिळी करणारी माहिती सर्वत्र
आणि पाटी कोरी करणारी विद्या गायब

ज्याला ताजी सुरवात करायचीये त्यानं करावं काय?
तू मातृका
तू आजी
तू आई
तू मूळ
जे झाड खांद्यावर टाकून फांद्यात हिंडतय
जे आख्ख्या पृथ्वीचं चरित्र
बिचित्रविर्यात वाजवत
वंशावंशानी अंश अंश दंशत मला मृत्यूनं बोलवतंय
हे नागकुळातील सागवान आगबये
माझा माग काढत
मला कुणाच्या मागोमाग न्हेतीयेस?

माझी लंगड्या पायांची छलांग - बीज शोधणारी
तुझा अंगबाज पलंग काबीज करेल काय

तू भूतकाळात मरून गेलीयेस
मी वर्तमानकाळात तुला शोधतोय
भेटशील का
मी ह्या इथे मरतोय
तू त्या तिथे जिवंत होतीयेस
भेटशील का
तू निखळ प्रेम आहेस
माझ्याजवळ ते औषधापुरतेही नाही
भेटशील का

अलग अलग बसलेली
विलग विलग करणारी
ही कापूस कोंडी लगबग - कधी सलग वस्त्र होईल काय?

जिथे मनच स्वयंपूर्ण रोग आहे
तिथे मनोचिकित्सा काय कामाची
जिथे पाणीच श्रम करायला तयार नाही
तिथे काय बिशाद घामाची

इथे राम राम करणाराच
मरा मरा करतोय
इथे मज्या मज्या मारणाराच
ज्याम होत मरतोय

ज्यांना प्रतिभा रोग
आणि बुद्ध विक्षिप्त वाटतात
त्यांना मी संक्षिप्त टीपेच्या नालासोपाऱ्यात
सोडून द्यावे का?
जीवन आणि मृत्यू
मी दोन पायात दोन वेगवेगळ्या नंबराच्या वहाणा चढवून
स्वत:त फिरतोय

मन
जे मृण्मय आहे चिन्मयही आहे
मन
जे दृश्य आहे अदृश्यही आहे
मन
जे तनाव आहे नावही आहे

शवयात्रा चाललीये
हे काय आहे
अमूक ठमूक मेलाय
सगळेच लोक असे मरतात? मीही असाच मरणार आहे?
मीही असाच मरणाच आहे

भूतकाळाचं असह्य ओझं पेलता येत नाही म्हणून
भविष्यात गतिमान - तणावग्रस्त होत
मस्त होता येत नाही म्हणून व्यस्त
ईझी होता येत नाही म्हणून बिझी
पळापळ पळापळ

मनानं वाघ फाडून खाल्ला
मनानं जंगलं जाळून टाकली
मनानं हवा शिजवून टाकली
पळता पळता

मन जे सुरवंटाचा मुखवटा घालून
उंटासारखं बाहेरून आलं
वाळवंट बळकावून बसलंय

गरमी वाढतीये
आणि मन आख्ख्या वाळवंटात एसी लावण्याचा
युटोपिया रचतंय

उकाड्यानं मेलेले प्रेत स्पष्ट दिसतंय
आणि मन त्यात अजरामर होण्यासाठी
एकेक कळ दाबतंय
जीवाला लागतायत कळा
जीव अवकळा होतोय

मी ह्या वाळवंटातून सुरवंटातून उंटातून शोधतोय
बाहेर जाण्याचा दरवाजा
माझ्या प्रेतासकट पळून जाण्यासाठी
मी घुसमटतोय ह्या वाळवंटाच्या सेटवर

माझी सगळी तडफ तडफडतीये स्टुडिओत
आख्खा श्वास कोंडला जाऊन
मी तुझ्या शरीरात मरत दीन आहे
हा अभिनय नाही हा कुणासाठी तरी दिलेला खर्राखुरा स्टण्टसीन आहे
ओठाला ओठ भिडवून चुंबनात
वक्षाला वक्ष भिडवून दुधात
मेंदुला मेंदू लावून चेंद्यामेंद्यात
काळजाला काळीज लावून काळात
मी मरतोय
माझं प्रेत स्फटिकाप्रमाणं दिसतंय स्वच्छ
आणि मी नाळेशिवाय जन्मून
आख्या स्टुडिओ हाकलून
सर्वत्र

आपल्या ह्या कैदेचं स्वरूप भिन्न आहे ह्याची त्याला कल्पना होती. कैद त्याच्यासाठी नवीन नव्हती. पाटलीपुत्राच्या लढाईनंतर कैद प्रथम वाट्याला आली होती. नंतर बौद्ध धर्माचा प्रचार करताना एका सनातन राज्यातही तो सहा महिने कैदेत होता. तिथे त्याने आर्यदेव, कम्बलपाद, तन्त्रीपाद, सरहपाद ह्यांची पदे म्हणत कैद सुसह्य केली होती. इथेच त्याची कवी क्षेमेन्द्रशी भेट झाली होती. क्षेमेन्द्र हिंदू होता, पण धर्माच्या बाबतीत उदार होता. तो त्यावेळी अवदानकल्पलता नावाचा एक ग्रंथ रचत होता. एका हिंदू कवीने भगवान तथागतावर ग्रंथ रचावा हे त्याला आश्चर्यकारक वाटले होते. क्षेमेन्द्राच्या प्रयत्नानेच त्याची पुढे सुटका झाली.

बराच प्रवास करून तो करवीरनगरीत आला तेव्हाआपण करवीरनगरी बौद्ध करू असा त्याला विश्वास होता, पण तो यथार्थ होणे दूर उलट सनातन धर्मियाशी त्याचे खटके उडायला लागले. एलसायबोर्ग प्रत्यक्ष आला आणि ह्या खटक्याचे रूपांतर लढाईत झाले.

इथे ह्या डिजीटल कैदेत तो पडेपर्यंत त्याचा पृथ्वी ह्या एकाच ग्रहावरील स्त्रियांशी संबंध होता. एलसायबोर्गमुळे आपल्या ह्या जगापेक्षाही एक वेगळं जग अस्तित्वात आहे हे त्याला कळाले होते. खरे तर पहिल्याच कैदेत त्याच्या आतील प्रोग्राम जागा व्हायला सुरुवात झाली होती. तो बौद्ध भिक्षु बनायला तो प्रोग्रामच जबावदार होता. हा स्वर्गही धर्मग्रंथातला स्वर्ग आहे की एक ग्रह आहे ह्याची त्याला कल्पना येत नव्हती. तो वैश्यांच्यात वाढला होता आणि तरीही त्याला एलसायबोर्गचे फंक्शनिंग कळत नव्हते.

तो विचार करत होता तोच नवी अप्सरा उगवली. ती कुठून आली तेही त्याला कळाले नव्हते.

''हे कसला विचार करतोयस?'' तिची पृच्छा.

''हा स्वर्ग पृथ्वीसारखाच ग्रह आहे की....देव नेमके काय आहेत?''

ती थोडावेळ शांत मग म्हणाली,

''देव म्हणजे परग्रहावरचे अंतराळवीर.....''

''म्हणजे......''

''ह्या पृथ्वीसारखे करोडो ग्रह आहेत त्यात एक आर्य नावाचा ग्रह आहे. तिथे ऑक्सिजन कमी पडला किंबहुना हळूहळू नाहीसा झाला....''

''ऑक्सिन....''

''श्वास....श्वास घेऊन जिवंत राहतोना? तर ह्या देवांना तसा ऑक्सिजन लागतो....तर त्यांच्या ग्रहावरचा ऑक्सिजन तिथल्या हवेला भोकं पडून पडून नाहीसा झाला म्हणून ते लोक इथे वसुधरेभर जिवंत राहण्यासाठी त्यांचे विमान घेऊन आले. त्यांच्याकडे तंत्रज्ञानच असे होती की ते जे करत त्याला पृथ्वीवासी चमत्कार समजू लागले. त्यांनी त्या अंतराळवीरांची देव म्हणून पूजा करायला सुरुवात केली. कुठल्याही ग्रहावर तुम्ही जन्मला तरी अहंकार असतोच. त्यांनीही देव म्हणून इथे जगायला सुरवात केली. त्यांच्याच नादाने काहीजण स्वतःला आर्य समजू लागले. ह्या आर्य समजणाऱ्या लोकांनीच मग आर्य संस्कृती रचली. जे आर्य मूळचे आले होते ते मरून गेले, पण त्यांनी निर्माण केलेले डिजीटल मात्र अजून जिवंत आहेत आणि ते ब्राह्मणांचे ऐकतात. त्यांचा अस्पृश्यतेवर विश्वास आहे आणि म्हणूनच त्यांचे एलसायबोर्गशी युद्ध सुरू आहे. दोन प्रोग्राम आपापसांत लढतायत. हा स्वर्ग हाही एक प्रोग्राम आहे. ज्यात तू कैद आहेस. ह्या प्रोग्राममध्ये कुणालाच भूक लागत नाही, म्हणून तुलाही लागत नाही. मात्र, हा प्रोग्राम अखंड चालण्यासाठी संभोग मात्र आवश्यक आहे. सेक्स हे ह्या प्रोग्रामचे फ्युएल आहे, म्हणूनच इथे अस्पृश्यता नाहीये.''

''पण देवाविषयी पृथ्वीवर वेगळेच मत आहे.''

''मत शेवटी डिजीटलच असते.''

''पण मी रिअल आहे.''

''हा तुझा भ्रम असू शकतो.''

''नाही हा भ्रम नाही मी आहे.''

''ठीकयं तू आहेस पण त्याने काय फरक पडतो शेवटी तू जिथे आहेस ती कैदच आहे.''

''पण मी विचार करू शकतो....''

''विचाराहून दुसरी मोठी कैद तर कुठलीच नाही. विचारच माणसाला बौद्ध करतो, शैव करतो, वैष्णव करतो, अस्पृश्य करतो, ब्राह्म करतो. विचारच फूट पाडतो.''

''पण विचारच माणसाला माणूस बनवतो.''

''मी कुठं नाही म्हणतीये माणूस विचारांमुळेच जनावरांपेक्षा उन्नत होतो, पण विचाराने तो बुद्ध होऊ शकत नाही. पैलतीरावरून पैलतीरी जाताना जनावरापासून बुद्धत्वापर्यंत पोहोचण्यासाठी ही विचाराची नाव लागतेच; पण एकदा ती किनाऱ्याला लागली पैलतीरी पोहचली की सोडूनच द्यावी लागते, अन्यथा बुद्धत्वात उतरताच येत नाही....''

ती काहीतरी असं बोलली की ते अप्सरेला मुळीचं साजेस नव्हतं. त्यानं प्रेमानं पाहिल ती अप्रतिम होती ती 'स्त्री' होती.

**अप्सरा**

स्त्री

जब रॅशनल बिकना बन्द हो जाता है तो मार्केट इमोशनल बेचना शुरू करता है और जब इमोशनलभी नही बिकता तो मार्केट फिजीकल बेचना शुरू करता है इसलिये कसीभी नये मार्केटमे पहले बिकनेके लिए आयडीयालॉजी आती है फिर मजहब फिर सेक्स और ये सब थ्रू डिजीटल होता है ।

**-डॉ. मर्त्य सनकी**

Thought is the waste of energy it is best only when it's used without any image.

**-Bu-lao**

It is alway interesting when you say something about time as it always changes with time.

**-Time - Machine**

There are times and unfortunately we know only one.

**-Post-verb**

When untouchability speaks
it speaks in volumes
about total humanity

**-Dr. Mango day Manav**

जेव्हा तुम्ही लिहीत असता किंवा चित्रत सौष्ठवत गात असता तेव्हा ते ह्या जन्माविषयी तरी असतं किंवा मागील जन्माविषयी तरी असतं.

विसाव्या शतकात अस्पृश्यतेचा अर्थही बदलला आहे. वर्तमानकाळात अस्पृश्यता ही सर्वव्यापी सांस्कृतिक गोष्ट झाली आहे ती स्पर्श होण्याचा, संभोग होण्याचा, एकमेकात मिसळण्याचा धोका न पत्करता स्वतःची तथाकथित शुद्धी राखण्यासाठी केलेले पलायन आहे. ती शुद्धीला चटावलेल्या लोकांचा सैतानी खेळ आहे आणि जो ते खेळतायत ते लोक खरे तर संकटाला, मिश्रणाला घाबरलेले दुबळे, पळपुटे, भयग्रस्त लोक आहेत. ते जे जे 'पर'

आहे 'दुसरे' आहे 'इतर' आहे त्याला स्वतःच्याही नकळत 'अस्पृश्य' करतायत 'अस्पृश्य' मानतायत आणि नकळत संपूर्ण मानवजात खंडाखंडात विभागतायत, म्हणूनच मी 'सगळ्याच अस्पृश्यतेच्या विरोधात आहे.'

-श्रीधर तिळवे

**काळ** **बुद्ध**

॥१॥

सूर्य सरकतोय
काळ पुढे चाललाय त्याच्या उन्हातानातून
घटिकापात्रातील वाळू सरकतीये
काळ पुढे चाललाय तिच्या थेंबाथेंबातून तेल काढत
माझी सावली बदलतीये
काळ पुढे चाललाय तिच्या चंचल आकारातून जी कधीच हुबहू देहासारखी नसतीये
काळ ह्या स्वर्गातही बदल मोजत अवकाशातील
टिपतोय हालचाली डोळ्यातून टिपूस न काढता
जगणं म्हणजे काळात बदलत जाऊन
तो बदल काळात व्यक्त करत राहणं

मी पुढे जातोय मागे येतोय
मी तिथे येतोय
जिथे माझा काळ
मी जन्मण्यापूर्वीच अस्तित्वात आला होता
मी अस्पृश्य होणार माझा विटाळ ब्राह्मणांना होणार
हे ज्याने आधीच ठरवलं होतं
ज्यानं मी कसा नाचणार
मी कोणते कपडे घालणार
हे आधीच ठरवलं होतं माझ्या आईनं तिच्या इच्छात
मी बोलण्याआधीच
निश्चित झालं होतं
माझ्या भाषेच व्याकरण
माझा व्यवसाय, माझे रस्ते माझी नसलेली भाषा
माझ्या आधीच माझ्या काळानं निश्चित केलं होतं माझं मूळ
माझे सूळ
माझे वाचन

मला जन्मायचं होतं
एखाद्या पिल्लासारखं
जे जन्मजातच नाचायला लागतं
जे जन्मजातच मागील सगळे जन्म गर्भाशयातच विसरून
थेट ह्या जन्मात दाखल होतं

पण भाषा शिकायला हवी म्हणून
मी जन्मलो असहाय्य
पाच वर्षे आधीच

माझ्या मातेच्या शरीराच्या भिंती कोसळल्या
मी वाढण्याआधीच
आणि माझे मागील जन्म गाडले गेले भाषेत
मी ते विसरण्याआधीच

आता ह्या भाषेत बसून मी स्मरतोय काळ
माझ्या वंशसूत्रानी मागील पिढ्यात घेतलेले जन्म
गंगेसारखे बघतायत पोटात घेऊन त्याचा गाळ

आठवणी पाण्यात धुऊन मोकळे होता येत नाही
म्हणून माझे हात
आठवणीत खिळून

काळ पुरवतोय विविधता
विविध कामांसाठी लागणाऱ्या विविध वेळात
विविध माणसांना मिळणाऱ्या विविध आयुष्यात

सगळे सारख्याच वयात मेले असते तर
सगळ्याच कामांना सारखाच वेळ लागला असता तर

माझ्या बालपणाच्या एका फेऱ्यात
थेट आकाशाला भिडतं होतं एक झाडं
बाप बनत होतं एक मांजर उनाड

प्रत्येकात ससे वाढीने झपाटलेले
आणि मी खास शर्यत जिंकण्यासाठी
कासवाच्या वेगात
भाषा आत्मसात करत
स्वतःच्या अंतःप्रेरणा शब्दांनी विस्थापित करत

शेवटही न सापडलेल्या कित्येक गोष्टी
सुरवातही न गवसलेल्या कित्येक कथा
पाण्यात भिजूनही वाचलेल्या कित्येक गाथा
पोहण्याचा सराव असूनही बुडालेल्या कित्येक बाता

अनेक देशांत पाडत राहिली पावसासारखा अर्थ
माझी शाब्दिक ढगफुटी
विराम घेतला की अर्थ बदलायचा आधीच्या रामाचा
हत्ती घेतला की सापडायची नुस्तीच सोंड
आणि विष्ठेत सुगावा लागायचा आख्ख्या कळपाच्या भटकंतीचा
दहा तोंडांनी बोलायचा प्रत्येक शब्दातला रावण
आणि सीता म्हणजे जमीन
हे तर मी जमिनीवर रांगता रांगताच शिकलो

आता नुस्ते आयुष्याचे तुकडे
अर्धवट शहाणे
पूर्ण शहाणे व्हावे म्हणून दीडशहाण्या बाईच्या शोधात
सुईच्या अग्रावरच आख्खी सुई

घटिका आणि घटक
घटाघटात येऊन घातलेले घाट
ज्याची ह्या क्षणी गरज ते युग युग दूर
आणि जे म्हातारपणात खाऊ म्हणून ठेवलेलं
ते ह्या क्षणी फळासकट समोर
एक वेगळाच काळ आपल्या आत वहात
जो फक्त आपल्या आपल्यासाठी
आपल्यातून आपल्याकडेच येणारा

शब्द
जे त्यांना दिलेल्या वेळेनुसार अर्थ बदलतायत
शब्द
जे हास्य विनोदात अखेरच्या क्षणी फुटतायत
क्षणापूर्वीचे गृहीत धरलेले अर्थ बदलतायत
शब्द
जे निश्चिततेविषयी साशंक होतायत
शब्द
ज्यांचा नेहमी काळ येतोय पण वेळ येत नाहीये
पेलत पेलत पेलत
स्वतःच्या भाषेने थकून गेलेत जीभा
आणि मी नवीन अर्थ शोधून त्यांच्यात फुंकतोय प्राण
थरावर थर

थरावर थर
उलगडत
प्रत्येकवेळी शोधतोय एक नवीनच शहर त्यांचा नवीनच प्रहर त्याचा नवीनच पदर

जागेत होतायत बदल
बदल जागेत योजले जातायत
काळ जो मोजतोय त्याची जागा कुठाय
काळ जो मोजतोय त्याचा काळ कुठाय
जग, जागा, जाग, जगणं
काळात सगळ गोंदवल जातंय
आणि काळ
प्रत्येक बदलानं आश्चर्यचकित होत
स्वतःची बोटं तोंडात घालतोय
डोळ्यातून हास्य न सांडता
काळ
जो जीभेइतकाच लवचिक आहे
सुई आणि चाक
ह्यांना सपाटकरून मोजतोय एकाच भोकात
काळ
ज्याला त्रिकोण नाही चौकोन नाही
कुठलेही रूप विद्रूप करतोय तद्रूप करतोय
माझ्या डोळ्यात

बुद्ध बोलतोय एका शतकात
मी एका शतकात ऐकतोय
क्षेमेन्द्र लिहितोय हिमालयात
मी करवीरनगरीत त्याला वाचतोय

काळ आम्हाला बांधतोय
एका जागतिक गठ्ठ्यात
शब्दांच्यात अंतर नसते
त्याचा गलेलठ्ठ फायदा उठवत
मी बुद्धास ऐकताना बुद्धाबरोबर आहे
मी क्षेमेन्द्रचं वाचताना क्षेमेन्द्रबरोबर आहे
मी सर्वत्र आहे
कारण मी भाषा आहे
भाषा जिनं सगळं जग केलंय सपाट
मला तिथंच घेऊन येतिये
जिथं तिनं माझ्या अंतःप्रेरणा विस्थापित केल्या होत्या

मी पुन्हा पुन्हा तेच तेच बोलतोय
वेगवेगळ्या काळात
आणि काळ जो वेगवेगळा आहे
माझ्यात एकसारखा दिसतोय

अंतःप्रेरणा
स्वातंत्र्याच्या, निर्वाणाच्या, स्पर्शाच्या
भाषेने सपाट केलेल्या

मी माझ्या जनुकात होतोय जागा
जनुकं जी रेप्लीकाज होती कुठल्यातरी ग्रहावर
माझ्या शरीरात तारे तोडतायत
एलसायबोर्ग किंचाळत जागा होतोय एका दुःस्वप्नात

आम्ही बोलतोय
एका अशा भाषेत
जी ह्या पृथ्वीवर नाहीये
एलसायबोर्ग माझ्या आख्ख्या घराण्याचा
काळ सांगतोय

एक शतक होत उन्हात तापत
एक शतक होतं थंडीत कुडकुडत
सारी शतकं तुडवत सारा काळ तुडवत
शब्द आदळतायत अंतराळातून थेट काळजात
काळ होतोय नष्ट
आणि स्पष्टही होतोय

मला कळत नाहीये
काय चांगलं काय वाईट
मला जाणून घ्यायचीये
माझी इच्छा तिच्याखालची वीट
जी चांगल्या वाईटाच्याही आधी होती

ज्यांना स्वतःच खून करण्याची इच्छा होती
तेच माझ्यावर खुनाचा खटला चालवतायत
ज्यांना स्वतःच संग करण्याची इच्छा होती
तेच अस्पृश्यतेला त्यांचं सर्वात मोठं अंग मानतायत
झोपता येत नाही
म्हणून नपुंसक झालेले लोक

स्वतःच्या बायका शाबूत ठेवून
इतरांच्या बायका काबूत ठेवण्याची युक्ती

एका परस्परविरोधात चालून येतायत माझ्यावर स्मृती
लादतायत इच्छा थोपवतायत विकृती

माझा माहितीचा स्फटिक होतोय स्वच्छ
मला माझ्या इच्छा दिसतायत अगदीच स्पष्ट
मी इच्छांना बोलू देतोय त्यांची भाषा

'सर्वत्र स्पर्शाला जाण्यास अनुमती हवी'
कुणासाठी?
ज्यांना अस्पृश्यता पाळून पाळून त्वचारोग झाले
ज्यांच्या जिभेलागतानुगतिकतेचं कोड फुटलं
ज्यांच्या मंत्रपठणात वेडगळ यांत्रिकता आली

अस्पृश्यता हे एका अशा भिंतीचं नाव आहे
जी शब्दांनी कुणालाही कुठेही बांधता येते
कुठल्याही शतकात कुठल्याही त्वचेत
आणि जी बांधणाऱ्यांनाच कैदेत ठेवते
अस्पृश्यता पाळणे म्हणजे स्वतःच्या स्पर्श कैदेत ठेवणे
अस्पृश्यता पाळणे म्हणजे संकटाला घाबरणे

इच्छा बोलतायत
आणि मी आत्ता एका नव्या स्वातंत्र्ययुद्धाची तयारी करतोय

एका बंदिस्त कैदेतून वेगळ्या कोठडीत स्थलांतर
भिंती बांधणारे जाणत नाहीत स्वातंत्र्याचा अर्थ
जे स्वातंत्र्य देत नाहीत
त्यांना स्वातंत्र्य मिळत नाही

स्वातंत्र्य निवडा पुरवतंय
लढा आणि वाढा
किंवा गप्प बसा आणि ढुंगण सोसा
मी लढा निवडतोय

इच्छेच्या शेवटी फुलेच असतात असं नाही
ज्वालाही असतात

मी लहानपणी एकदा ब्राह्मणसभेपुढे जाऊन पचापच थुंकलो. अस्पृश्याचे असे थुंकणे हा त्यांचा धडधडीत अपमान होता. त्यांनी मला बहिष्कृत करून तीन दिवस उपाशी ठेवलं आणि मग मी वयानं लहान कोवळा, अजाण असल्यानं मला क्षमा केली आणि मला विचारलं, "का थुंकलास बाबा?" मला माहीत नव्हतं बाप म्हणाला, "अहो, पोरांना मोठ्यांच्या गोष्टी समजतात का देवांनो? त्याला काय कळतं ? मोठा झाला की कळेल." मग मला मोठा होण्यासाठी सोडून देण्यात आलं. मी पुन्हा पुन्हा प्रश्न विचारत राहिलो सगळ्यांची त्वचा एकच असेल तर हा भेदभाव का?

मग मी काही वर्षांनी पुन्हा एकदा ब्राम्हण सभेपुढे जाऊन पचापच थुंकलो. ब्राम्हणांनी विचारलं का रे का थुंकलास ? मी म्हणालो मला त्यावेळी मी का थुंकलो हे माहीत नव्हतं पण आता मला मी का थुंकलो हे पूर्ण माहीत आहे. आणि मी पन्हा थुंकलो ब्राम्हणांनी मला जीवे मारण्याची धमकी दिली मी पळून गावकू सात लपलो तिथून मग बापाने मला वाचवण्यासाठी 'जप्सी' ताण्डयाच्या प्रमुखाकडे हवाली के लं

इच्छेच्या शेवटी स्वातंत्र्यंच असतं असं नाही
पलायनही असू शकतं

स्वातंत्र्याकडे पोहचवण्याचे अनेक मार्ग असतात
मी कवी झालो - स्वातंत्र्य झालो
भिक्खु झालो - स्वातंत्र्य झालो
ह्या भल्यामोठ्या आयुष्याचा अर्थ काय?
अर्थ भाषेला असतो. ह्या भल्यामोठ्या आयुष्याची भाषा काय?
मी पुन्हा पुन्हा भिंतीवर लिहीतोय माझी भाषा
माझी स्पर्शेच्छा
ह्या काळकोठडीतही माझं लिहिण्याचं बोलण्याचं
स्वातंत्र्य मी ठेवतोय अबाधित
आणि भाषेसकट सर्वत्र उगवण्याच्या संधीची वाट पहात
नांगरतोय माझी कै द धातुसाधित

॥२॥

प्रथम विचारसरण्या मैदानात उतरल्या
मग आमची विचारसरणी अस्पृश्य झाली
मग योध्देच होऊन शरीरं मैदानात उतरली
मग आमचे शरीरच अस्पृश्य झाले
शेवटी आमच्याजवळ काहीच उरले नाही
आणि ते 'काही नाही' ला
कायमचे वंचित झाले

॥३॥

१. पुनर्जन्म ,ईश्वर, स्वर्ग, नरक आणि जग ही अस्तित्वाच नाहीत.

२. सर्व पारंपारीक धार्मिक वाङ्मय हे गर्विष्ठ मूर्खांनी निर्माण केले आहे.

३. सर्व गोष्टीची निर्मिती निसर्ग करतो आणिकाळ त्यांचा संहार करतो . हे दोघेच सर्वांवर अधिराज्य चालवतात आणि माणसात सुख आणि दुःख ह्यांची वाटणी करताना ते पुण्य आणि पाप यांची दखल घेत नाहीत.

४. आलंकारीक भाषेने फसगत झालेले लोक देव, मंदिर आणि पुरोहित यांना चिकटून बसतात; परंतु खरे पाहिले तर विष्णू आणि कुत्रे यांच्यात काहीही फरक नाही.

-'स्वसंवेद्योपनिषद'

(भारतीय संस्कृती-विल ड्युरान्ट अनु. मा. प. शिखरे पा. क्र. १३७ पॉप्युलर प्रकाशन, The Story of Civilization Will Durant चा अनुवाद )

॥४॥

पुनर्जन्म म्हणजे तुमच्या पूर्वजांचा त्यांच्या काळांचा तुमच्या जनुकात होणारा जन्म आणि स्वर्ग म्हणजे त्या काळांनी त्या जन्मांनी दुःखातून मुक्त होण्यासाठी उभा केलेला आशेचा डोलारा.

**SHRIDHAR TILVE**
Personal Dictionary

॥५॥

अस्पृश्य आणि ब्राह्मणांच्या विधवा ह्या एकाच नाण्याच्या एकाच मेन्टॅलिटीच्या दोन बाजू आहेत. कुठलंही पाप दोन बाजूंनी खुलं असतं. एक बाह्य, एक आत. अस्पृश्यता हे बाह्य पाप कधी ना कधी ब्राह्मणांच्या स्वतःच्या घरात खुलं होणं अटळच होत. ब्राह्मणांच्या विधवा ही ती अस्पृश्यतेची ब्राह्मणांवर उलटलेली बाजू होय.

॥६॥

प्रेम स्वातंत्र्य आहे. प्रेमाशिवाय आकाशाखालीही कैदेच्या साखळ्या वाजतायत उडणाऱ्या पक्ष्यात पण ते ऐकण्याइतके त्यांचे कान सूक्ष्म नाहीत. पंख स्वातंत्र्य नाही. ती एक तांत्रिक सोय आहे. मला पंख नाहीत; पण सूक्ष्म कान आहेत, जे ऐकतायत अदृश्य साखळ्यांचे मुलायम आवाज.

तू येतीयेस आखखा स्वर्ग तुडवत माझ्या दिशेनं
आणि प्रेमात माझं डोकं
पडतय
गळून
उरतंय काळीज
ते तू आहेस
प्रेम फैलतय प्रार्थना होतंय
श्वास होतंय
श्वास जो शत्रुच्या सोबतही सहज घेतला जातो
जो जाणतच नाही मित्र आणि शत्रू
ह्यांच्यातला फरक
सत्य आणि कल्पित ह्यांच्यातला भेद
तू आहेस की नाहीयेस तू खरी की खोटी स्वर्ग खरा की खोटा
प्रेम प्रश्नात थांबत नाहीये उत्तर होतंय
प्रेम काळाला बेतुका बनवतंय
प्रेम काळाच्या कल्पितांना बेतुका बनवतंय
प्रेम
क्षणक्षण जगतंय
पण काळ जाणत नाही
खरं तर काळ सरत नाहीये
आपणच खर्ची पडतोय
काळ विचार आहे
फेकला जातोय
विचार अनुपस्थिती आहे
हवालदिल आहे
ह्या क्षणाची ना खिडकी उघडली जातीये
ना दरवाजा
स्वतःच्या मिटण्याचं भय नाहीसं होतंय
सुरक्षा जी सभ्यपणाने चालून आली होती
गायब होतीये
मी अमर आहे
मिटण्याच्या पलीकडे
माझी कुणालाच गरज नाही
आईलाही
म्हणून किंचाळणारं मूल
हसतंय
त्यानं गरज वाटावी म्हणून

तयार केलेली आणि मोडलेली खेळणी
हसतायत
आमंत्रण नसताना मी ह्या जगात जन्माला आलो म्हणून व्याकुळलेला पाहुणा
यजमानतोय
"सूर्य उदासीन, चंद्र उदासीन, समुद्र उदासीन
आपण नसलो तरी काय फरक पडणारय ह्या अस्तित्वाला ?"
स्वतःलाच विचारणारा गणिती
स्वतःच अनंत झालेला पाहून डोलतोय
सर्वत्र मला स्पर्श होतोय
मी वहात चाललोय स्पर्शाच्या नदीतून
मी समस्त स्पर्श होतोय
आणि काळ जो यजमान ब्राह्मणासारखा आला होता
एखाद्या प्रासंगिक पाहुण्यासारखा
संसाराकडे निघून चाललाय

अलविदा दोस्त
सफर अच्छा रहा !

रिअल श्रीधर निर्वाणाला उपलब्ध झाला त्याला आता स्वर्गातून बाहेर पडायचं होतं. अप्सरांनी त्याला खूप आग्रह केला; पण तो थांबायला तयार नव्हता. अप्सरांना त्याने स्वर्ग सोडावा असे वाटत नव्हते, पण त्याने स्वर्ग सोडावा असे वाटत नव्हते, पण त्याने स्वर्ग सोडल्याखेरीज आपल्याला मुक्ती मिळणार नाही ह्याची त्यांना खात्री होती. स्वतःचे देवदासीपण त्यांना कंटाळा आणत होतं. त्यांना देवदासी करणाऱ्या सर्व देवांबद्दल आणि पुरोहितांबद्दल त्यांच्या मनात तिरस्कारच होता. आपले अस्तित्व त्यांना एक ओझं वाटत होतं. आपल्याशी रत होऊन कुणाला निर्वाण मिळेल असं त्यांना वाटलंही नव्हतं. त्या सगळ्याच त्याच्याभोवती जमल्या.

श्रीधर म्हणाला, "अप्सरांनो, मी तुम्हाला धन्यवाद देतो. तुमच्यामुळेच मी सत्य जाणले आहे. तुम्ही माझ्या साधनेत मला साथ दिली नसती तर मी कदाचित एक भिक्खु होऊनच राहिलो असतो. पुरुषाचे दोन्ही पाय संसारात असतात, पण स्त्रियांचा एकच पाय संसारात असतो. त्यांचा दुसरा पाय निर्वाणाशी जोडला गेलेला असतो. म्हणूनच त्या जन्म देऊ शकतात. स्त्रियांना त्यामुळेच अधिक सहजपणे निर्वाणात जाता येते. माझा एक मित्र म्हणायचा, मी सत्यावर विश्वास ठेवतो कारण ते तर्कदृष्ट्या सिद्ध करता येत नाही. स्त्रिया हे वाक्य सहज समजू शकतात. कारण प्रेम तर्कदृष्ट्या सिद्ध करता येत नाही हे त्या जाणतात. त्यामुळेच त्या पुरुषांना अनाकलनीय होतात." मग श्रीधर म्हणाला, "सर्वत्र दुःख आहे. कारण सर्वत्र दुःखाने भरलेले प्रोग्राम्स आहेत. ह्या प्रोग्राम्सच्या मुळाशी गरजा, इच्छा, निकडी, तृष्णा, भुका आहेत. त्या नाहीशा केल्या की, हे दुःखाने भरलेले प्रोग्राम्स नष्ट होतात. त्यासाठी अष्टांग मार्गानेच जावे लागते."

ते ऐकून अप्सरा साधना करू लागल्या. एक दिवस एक अप्सरा श्रीधर जवळ आली आणि म्हणाली, "आत्ता तुम्हाला स्वर्गाविषयी काय वाटते?"

श्रीधर म्हणाला, "ही एक छानशी कैदच आहे. तिला स्वर्ग असे नाव दिल्याने तिचे तुरुंगवास हे स्वरूप बदलत नाही. ब्राह्मण नेहमीच तुरुंगांना सुंदर विशेष नामं देतात."

मग काही दिवसांनी दुसरी एक अप्सरा आली आणि म्हणाली, "आता तरी अस्पृश्य असण्याविषयीचा तुमचा राग गेला का?"

श्रीधर म्हणाला, "ज्याला सत्याचा स्पर्श झाला नाही तो सत्याचा अस्पृश्य होय. माणसाचा नव्हे. ज्याला निर्वाणाचा स्पर्श झाला नाही तो अस्पृश्य होय, ज्याला निर्वाण प्राप्त होते तोच खरा स्पृश्य. उरलेले सर्वच अस्पृश्य होतं. म्हणून ज्याला निर्वाण प्राप्त होत तो इतरांची अस्पृश्यता घालवण्यासाठी त्यांना आपला स्पर्श देतो. जे अस्पृश्यता पाळतात त्यांनी सत्य जाणलेले नाही. कारण सत्य अस्पृश्यता पाळत नाही. आपणच सत्याला स्पर्शाच्या अंतरावर ठेवतो. तेव्हा मानव समाजातील प्राण्यातील अस्पृश्यता ही महाबकवास गोष्ट आहे. ह्या जगात जे जे जगते आहे ते ते स्पृश्य आहे. कारण सत्य सर्वत्र आहे."

"सत्याचा विटाळ होतो का?"

"नाही. सत्याला कशाचाच विटाळ नसतो. कारण सत्य सर्वत्रच आहे. मग सत्याच्या एका भागाचा दुसऱ्या भागाला विटाळ होतो असे मानणे म्हणजे सत्याचाच सत्याला विटाळ होतो असे मानणे नव्हे काय?"

"तुम्ही ईश्वर मानता काय?"

"कुणी जर सत्यालाच ईश्वर म्हणत असेल तर ईश्वर मानतो; पण जग निर्माण करणारा असा कुणी वेगळा परम पुरुष वा बाप वा नियंता वा निर्माता म्हणून ईश्वर म्हणून कुणी विचारत असेल तर मी ईश्वर नाही असे म्हणतो."

"तुमचा धम्म म्हणजे काय?"

"सत्यापासून वंचित झालेले म्हणून आपण सर्व अस्पृश्य आहोत. ह्या सर्वच अस्पृश्यांनी मग ते ब्राह्मण असोत वा क्षत्रिय वा वैश्य वा शूद्र स्पृश्यपणाची केलेली साधना म्हणजे धम्म होय. सर्वच प्रकारची स्पृश्यता पाळणे हे ह्या साधनामार्गावरचे पहिले पाऊल आहे."

"तुमचे निर्वाण म्हणजे काय?"

"समग्र सत्याचा समग्र स्पर्श जो आत्मा वा मन शून्य झाल्यावर प्राप्त होतो. हा स्पर्श जोवर होत नाही तोवर वैश्विक पातळीवर आपण सर्वच अस्पृश्य आहोत; म्हणूनच सर्व समान आहोत."

"मग ज्याला तो प्राप्त होतो तो इतरांपेक्षा महान आहे का?"

"नाही. ज्याला महानता सतावते त्याला समग्र सत्याचा समग्र स्पर्श होतंच नाही आणि ज्याला तो होतो तो जाणतो की हा फक्त फरक आहे आणि हा फरक मिटावा म्हणून तो करूणेने धडपडतो."

"तुम्ही म्हणता त्याप्रमाणे माणसाच्या दोनच जाती होतात. पहिली अस्पृश्य आणि दुसरी बुद्ध...."

"जो बुद्ध होतो त्याला जाती दिसत नाहीत. ज्याला जाती दिसतात तो बुद्ध होऊच शकत नाही."

"पण फरक तर उरतोच ना?"

"हो, पण तो फरक असा आहे हे आसरे जो बुद्ध झालाय तो आणि जे बुद्ध होऊ शकतात ते."

"म्हणजे बुद्ध आणि निर्बुद्ध...."

".......नाही जे निर्बुद्ध आहेत त्यांच्यातही बुद्ध आहेच; पण त्यांनी तो कधी खोदून काढला नाही काढलेला नाही एवढेच."

"मग तुम्ही ह्या 'स्वर्ग' नावाच्या कोठडीत कैद का?"

"माझे शरीर कैदेत आहे हे अप्सरे बुद्धत्व नाही. बुद्धत्वाला ना जाळता येते ना सुळावर चढवता येते, ना मारता येते, ना कापता येते, बुद्धत्व कालातित आहे."

"असे आहे तर मग जगात सत्याविषयीचा इतका गलबला का?"

"गलबला सत्याचा नाही हे अप्सरे तो सत्यविषयक मतांचा आहे किंवा क्वचित सत्याकडे जाणाऱ्या मार्गाविषयीचा. खरे तर मार्गही आपापसांत भांडत नाहीत; पण मार्गाविषयीची मते व भ्रम मात्र एकमेकांशी भांडत असतात."

"मग ही मते मिटत का नाहीत?"

"जितकी माणसे तितकी मते, जितकी मते तितकी प्रक्षेपणे, त्यातील जी मते फक्कड भाषेत मांडली जातात ती पकड घेतात. उरलेली विरून जातात; मात्र, एक गोष्ट लक्षात घे सत्याविषयीची मते म्हणजे सत्य नव्हे. सत्याकडे जाण्याचे मार्ग म्हणजेही सत्य नव्हे. हां मार्ग सत्याग्रही असू शकतो; पण सत्य फक्त सत्यच असते."

"मग हा मतांचा गलबला असाच चालू राहणार काय?"

"माहीत नाही. तो राहील किंवा राहणार नाही, पण तुला जर सत्य शोधायचं असेल तर तू ते शोध. तुझा शोध हा जर ह्या गलबल्यामुळे व्यत्यय येत असेल तर तो शोध शोधच नव्हे."

"पण मग ह्या सगळ्या गलबल्यात काहीच स्थिर नाही काय ज्याला पकडून आम्ही साधना करावी?"

"आहे. सत्य, अहिंसा, अपरिग्रह, सर्व व्यसनांपासून मुक्तता, सर्व जगतावर, माणसांवर, प्राणीमात्रांवर प्रेम व त्यांची सेवा, नम्रता, दया, क्षमा, शांती आणि एकाग्रता व अभ्यास ह्या दहा गोष्टी कुठल्याही मार्गावर कुठलीही साधना करताना स्थायी आहेत. ह्यातील एकापासूनही सुरवात केली तरी हळूहळू इतर साध्य व्हायला लागतात. नदीत आंघोळ करताना जसे पाण्यात कुठेही पाय ठेवून आंघोळ सुरू करता येते तसेच ह्या दहांपैकी कुठल्याही विधीत पाय ठेवून साधना सुरू करता येते."

हे सर्व ऐकून अप्सरांनी पुन्हा साधना सुरू केली.

इकडे मात्र श्रीधर बुद्धत्वाला पोहचल्याची वार्ता बृहस्पतीजवळ पोहचली. एखादा माणूस स्वर्गात कैद झाल्यानंतरही बुद्धत्वास पोहोचतो ह्यावर त्यांचा विश्वास बसेना, ही श्रीधरची चाल आहे असे त्यांना वाटले. त्यांनी स्वर्गावरचा पहारा अधिकच सक्त केला आणि इकडे एलसायबोर्गशी सुरू असलेली लढाई अधिक तीव्र केली. खरे देव शतकापूर्वीच मरून गेले होते. त्यांचा मृत्यू हा ह्या प्रोग्राम्ससाठी गूढ होता. ह्या पृथ्वीवरील प्राणवायू सोसण्याची त्यांची जनेटीक ताकद प्रचंड कमी पडली होती. मरण्यापूर्वी त्यांनी पृथ्वीवरील प्राणवायू आणि आपल्या ग्रहावरील प्राणवायू ह्यांच्यातील आण्विक फरक विश्लेषित करण्याचा खूप प्रयत्न केला होता, पण अ‍ॅटोमिक स्ट्रक्चर्समध्ये काहीच फरक आढळला नव्हता. सब अ‍ॅटोमिक स्ट्रक्चर्समध्ये डेड मॅटरच्या अंगाने काही फरक होता; पण त्याचे स्वरूप स्पष्ट होण्याआधीच परग्रहावरून आलेले देव मरून गेले होते. वाचले होते ते फक्त प्रोग्राम आणि देवांच्या डिजीटल प्रतिकृती. त्याउलट एलसायबोर्ग हा सर्वायव्हल ऑफ द फिटेस्टच्या तत्त्वाला जणू पूरक असल्यासारखा त्याच्या प्लानेटवर सेव्ह झाला होता. सहस्रकभर एखाद्या प्रोग्रामने स्वतःला टिकवणे हे काही सोपे काम नव्हते. असा प्रोग्राम ह्यापूर्वी देवांना कधी भेटलाच नव्हता. हे दोन प्रोग्राममधील युद्ध होते आणि त्याचा निर्णय होत नव्हता. ह्यातील एका प्रोग्रामच्या जडणघडणीत ब्राह्मणांचा हात होता आणि क्षत्रियांचाही ! क्षत्रियांनी राज्याच्या गादीवर कुणाला बसवायचे ह्या प्रश्नाचे उत्तर स्वतःच्या मुलांना असे शोधले होते. एकदा स्वतःच्या मुलांनाच गादीचा वारस नेमायचा नियम पक्का झाल्यावर अपरिहार्यपणे जन्माप्रमाणे व्यवसाय पक्का झाला. प्रथम क्षत्रिय जन्मानुसार क्षत्रिय होऊ लागले. मग ब्राह्मण मग शेवटी इतर सगळ्यांनीच ह्या प्रथेचा स्वीकार केला. लोकशाही पद्धतीने राजा निवडणारे गण नाहीसे झाल्यावर राजेशाही पद्धतीत हे अटळ होते. भारतातल्या जाती-जमाती अत्यंत चिवट आणि चिकट. त्यांना एकात्म करण्यासाठी, त्यांच्या प्रथा मोडून काढणारा, एका धर्मात त्यांना बांधणारा धर्म आवश्यक होता, पण इथल्या सगळ्याच धर्मांची प्रवृत्ती सहिष्णु. त्यामुळे आदिम जाती-जमातीचे रिवाज मोडून काढण्याऐवजी ते शाबूत ठेवण्याकडे कल. परिणामी प्रत्येक जात व जमात स्वतःचे अस्तित्व शाबूत ठेवण्यात यशस्वी झाली. त्यांचे मार्गीकरण झालेच नाही. ह्या सगळ्या घडामोडीमुळे आडवा अक्ष कधी फारसा हललाच नाही आणि ब्राह्मण क्षत्रियांनी उभा केलेला उभा अक्ष हळूहळू मजबूत होत गेला आणि जातीव्यवस्था अधिकाधिक कर्मठ झाली. जातीव्यवस्था हे एक असं पाप होतं जे सगळ्यांनी मिळून केलं. चिवट देशीयता आणि स्वार्थी, भोंगळ व कर्मठ मार्गीयता ह्या सगळ्यांचा तो परिणाम होता. एलसायबोर्गला त्यामुळे ती नीट कळत नव्हती, तो फक्त लढत होता. जर श्रीधर नीट वाचला तर आपण व्यवस्थित डाऊनलोड होऊन जगू शकू ही त्याला खात्री होती, अन्यथा आपल्या प्लानेटवर आपण आज ना उद्या मरणार हे त्याला स्पष्ट दिसत होते. श्रीधरचा प्रश्न वेगळा होता. त्याच्या जीन्समध्ये डाऊनलोड केलेला प्रोग्राम थेट एलसायबोर्गशी जोडला गेला होता. त्यामुळे मुक्तहोऊनही त्याला स्वर्गाच्या बाहेर पडता येत नव्हते. बरं त्या डाऊनलोड झालेल्या पूर्वजांच्या प्रोग्राममुळेच त्याला लहानपणी अस्पृश्यतेविरुद्ध लढण्याच्या प्रेरणा मिळाल्या होत्या. त्यातूनच जगात आजवर कधीही न घडलेली गोष्ट घडली होती. तो चक्क प्रोग्राममध्ये कैद झाला होता आणि प्रोग्राममध्ये बसून साधना करून तो बुद्ध झाला होता. एखाद्या प्रोग्राममध्ये निर्वाण प्राप्त करणारा तो कदाचित पहिला बुद्ध होता. त्यामुळे जी मुक्ती एरव्ही सर्वांना पृथ्वीवर प्राप्त होत होती ती त्याला 'स्वर्ग' नावाचा एक प्रोग्राममध्ये प्राप्त झाली होती. त्याला पृथ्वीवर जाऊन आता सर्वांना धम्म मार्ग सांगायचा होता. सर्व अस्पृश्यांचा लढा लढायचा होता, पण ते शक्य होत नव्हते.

पृथ्वीला मात्र पृथ्वीवर काय चाललंय ह्याची तेव्हा कल्पनाच नव्हती. कणादने अ‍ॅटोमिक सिद्धांत मांडला होता खरे; पण तो धड ०.००००१% लोकांनाही धड माहीत नव्हता. युरोप तर जवळ जवळ अंधारातच होता आणि हे दोन्ही प्रोग्राम ज्या आधारे लढत होते तो आधार डार्क मॅटर आणि डार्क एनर्जी होता. ही डार्क एनर्जी जवळ जवळ ७४% होती, तर डार्क मॅटर २२% पृथ्वीवासी ज्या मॅटरची चर्चा करत होते ते केवळ चार टक्के होते. ह्या चार टक्केच्या आधारे मेटरियॅलिस्टीक लोक त्यांचा मटेरियॅलिझम मांडत होते. कारण तेच मॅटर त्यांना दिसत होते. तोच त्याचा अनुभव होता. जिथे धड ग्रॅव्हीटेशनल फोर्सही माहीत नव्हता तिथे ह्या विश्वाच्या फैलावाला जबाबदार असणाऱ्या अ‍ॅन्टीग्रॅव्हिटेशनल फोर्सची कोण काय चर्चा करणार? जे लढत होते ते फक्त ऑपरेट होत होते. कारण तसा फीडबॅक त्यांच्या स्टोरेजमध्ये देऊन टाकला गेला होता. त्यांना आपला प्रोग्राम नष्ट होईल एवढीच शक्यता दिसत होती आणि ते टिकण्यासाठी लढत होते. योगायोगाने देव ब्राह्मणांपर्यंत पोहचणे आणि ब्लडरनर्स भारत वर्षात पोहचणे आणि अस्पृश्य होणे ह्यामुळे हे डिजीटल युद्ध निर्माण झाले होते आणि जे मरून गेले होते त्यांनी कधी कल्पनाही केली नव्हती की भविष्यात असं एखादं युद्ध लढलं जाणार आहे. ते आणि त्यांच्या ई-सिम्रेचर्स नाहीशा झाल्या होत्या.

ब्राह्मणांना मात्र काहीच माहीत नव्हते. ते आपले ह्या प्रोग्रामांनी स्पॉन्सर झालेले होते आणि आपण जरा ओरड केली की, देव ऐकतात हे त्यांना माहीत झालं होतं. अस्पृश्यतेचा प्रोग्राम देवांनी आपल्याला स्पर्श होऊ नये म्हणून ब्राह्मणांना दिला होता. कारण देवांना इथल्या लोकांच्या स्पर्शाचं भय वाटत असे. त्या स्पर्शातून इनफेक्शन होतंय हे त्यांच्या लक्षात आल्याने ते घाबरून जात. पण ते भय ब्राह्मणांना नव्हतं. पण गाढवावर एखादा मोठा माणूस बसला व त्याला नमस्कार मिळू लागला की, गाढवाला जसं ते नमस्कार आपल्यालाच मिळतायत असं वाटायला लागतं. तसं काहीसं ब्राह्मणांचं झालं होतं. देवाला मिळणारे नमस्कार त्यांना आपले वाटायला लागले होते. मग देवाला स्पर्श नको असतो म्हणून हेही स्पर्श टाळायला लागले आणि नंतर मग त्यांनी एक अस्पृश्यतेचा प्रोग्रामच तयार केला आणि देव लोकाने तो शोषून घेतला. पुढे देव मरून गेले. देवांना पुजणारे मरून गेले, पण प्रोग्राम टिकला. त्या प्रोग्रामातून निर्माण झालेले संस्कार आपले काम करायला लागले. पृथ्वीवरचे लोक पुरोहितांना देवासारखे पुजू लागले. एखाद्या ओरिजनलपेक्षा त्याची झेरॉक्स जास्त महत्त्वाची व्हावी तशी ही देवांची झेरॉक्स महत्त्वाची झाली. ही झेरॉक्स स्वतःला भूदेव म्हणवून घ्यायला लागली. कारण मूळचे देव हे अंतराळवीर होते. त्यामुळे आकाशातून आलेले होते. ह्या सर्वात विचित्र गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे सन्नी ग्रहावरचे ब्लड रनर्स व ब्लेडरनर्समध्ये वाचलेला एलसायबोर्ग जो ब्लड रनर्सचा वफादार होतो. हे दोघे आणि आर्य ग्रहावरचे देव जे मरून गेले होते आणि त्यांचे उरलेले प्रोग्राम्स जे ब्राह्मण त्यांच्याही नकळत ऑपरेट करत होते हे एका 'पृथ्वी'नामक तिसऱ्याच ग्रहावर एकमेकांशी लढत होते, एकमेकाला स्पर्श करीत होते आणि तेही 'अस्पृश्यता' ह्या विषयावर! त्यातील श्रीधर जो मूळचा ब्लड रनर होता स्वर्गात देवांनी निर्माण केलेल्या प्रोग्रामात अडकून पडला होता तो ही एका एलसायबोर्ग ह्या ब्लेड रनरसाठी. तो कधीही पृथ्वीवर पोहोचू शकत नव्हता; पण त्याच्या जनेटिक कोडमधून मेसेजच येत नव्हता आणि तो त्याची प्रतीक्षा करीत होता. आपण बाहेर पडल्यामुळे एलसायबोर्गला काही इजा होणार नाही ह्याची खात्री त्याला हवी होती.

इकडे युद्धभूमीवर सर्वात मोठा गोंधळ डिजीटल श्रीधरचा उडाला होता. एकतर त्याला त्याची आई सापडत नव्हती, बाप आठवत नव्हता आणि त्याला जिथे बांधले होते ती युद्धभूमीची तरंगणारी मुख्य डाईस होती. आपण का बांधले गेलोय हेच त्याला कळत नव्हते. मध्येच एलसायबोर्गचा ऑक्टोपसी पाय त्याला सोडवायला येई; पण बृहस्पतीच्या दाढीतला केस अंगावर पडला की जळल्याचा

वास येऊन नाहीसा होई.

इकडे इंद्राने मग नेहमीप्रमाणे धावा सुरू केला तेव्हा एक ढगफुटी झाली आणि तिने सांगितले की, एलसायबोर्गला आफ्रिकेच्या घनदाट जंगलात न्हे, तिथे काळ्यांचे राज्य आहे. कदाचित ह्या राक्षसाची डार्क एनर्जी त्यांच्या डार्क स्कीनमुळे विरघळून जाईल. त्याबरोबर इंद्र आफ्रिकेत घुसला, तर तिथे डार्क स्कीन स्वतःला वाळत घालत होती. इंद्राने तिच्यापुढे हात जोडले. म्हणाला, ''तू आम्हाला मदत कर'' पण डार्क स्कीन शहाणी होती. ती म्हणाली, ''तुम्ही तर अस्पृश्यता पाळणारे देव. तुमचे ह्या आफ्रिकेत आम्ही का ऐकू?'' मग तिने तिच्या बारा शिष्यांना इंद्रालाच कैद करण्याचा हुकूम सोडला. तसा इंद्र सावध झाला. त्याने डार्क स्कीन उचलून एका बाटलीत घातली आणि बूच मारून तिला पळवले, पण डार्क स्कीन मजबूत होती. तिने स्वतःचे रूपांतर भारतीय वाघात केले आणि ती बाटली फोडून बाहेर आली. देवांनी तिला पकडण्याचा खूप प्रयत्न केला; पण ती आवाक्यात आली असं वाटलं की, वाघ बनायची आणि गायब व्हायची. बरेच दिवस असेच गेले. इंद्र तर तिला शोधता शोधता आफ्रिकेच्या जंगलात वाट चुकला आणि अचानक मग अंधारात त्याला एक कृष्ण सुंदरी एका झाडाखाली दिसली. तिचे डोळे हरणासारखे होते, तर नाक काळ्या मांजरी सारखे. तिनं इंद्राला तिच्या घरी येण्याचे आमंत्रण दिले. इंद्राला जाण्याची इच्छा होती; पण ते शक्य झाले नाही. त्याने मोह टाळला. त्याने पाठ केली आणि समोर पाहिले तर समोरच्या चंद्रात त्या स्त्रीचे प्रतिबिंब पडले होते आणि ते कधी तिच्यासारखे तर कधी डार्क स्कीनसारखे दिसत होते. ही डार्क स्कीन आहे हे लक्षात येताच तो वळला. जवळ जवळ तीन दिवस तीन रात्र दोघेही एकमेकाला ओळखत असून अनोळखी वागत होते. तीन दिवसातच ती गर्भवती झाली आणि इंद्राने तिला आपल्याबरोबर येण्यास सांगितले; पण तिने नकार दिला. त्याबरोबर इंद्राने तिला पुन्हा पकडले आणि बाटलीत टाकले. ती गर्भवती असल्याने आता बाटली फोडून ती येणार नाही हा त्याचा अंदाज होता. इकडे एलसायबोर्गला लक्षात आले की इंद्र आफ्रिकेत घुसलाय. त्याने ताबडतोब डार्क मॅटरची एक प्रचंड शिळा संपूर्ण आफ्रिका खंडावर तोलून धरली. त्यामुळे इंद्र गोंधळला. इकडे डार्क स्कीनने त्या डार्क मॅटरला पाहिले. डार्क मॅटरमुळे तिच्या बाळाच्या वाढीचा वेग अचानक वाढला आणि ती नऊ दिवस नऊ तासातच प्रसुत झाली. तिच्या पोटी जन्मलेला कृष्ण पुत्र सेकंदाच्या वेगाने वाढला आणि इंद्राएवढा झाला. त्याच्यामुळे इंद्राची दुसरी बाटली तर फुटलीच, पण आपल्याला जन्मतः कैदेत टाकणाऱ्या बापाविरोधात त्याने युद्ध सुरू केले. इंद्र आणि कृष्णपुत्र ह्यांची लढाई जुंपली. तसे एलसायबोर्गने डार्क मॅटर काढून घेतले. इंद्र मुलाशी लढण्यात कायमचा विझी झाला. हा कृष्ण हुबेहूब इंद्रासारखा होता. फक्त त्याची त्वचा डार्क स्कीनवर गेली होती. दोघांच्या युद्धात काय खरं काय खोटं काहीच कळत नव्हतं.

बृहस्पती मात्र एकीकडे लढत असतानाच चिंतनही करत होते. त्यांना डिजीटल श्रीधरचा वापर करण्याची वेळ जवळ आलीये असं आता वाटत होतं. खाली सनातन धर्माचा ब्रह्मवृंद बोंबा मारत होता. त्यांना डिजीटल श्रीधर स्पष्ट दिसत होता आणि बृहस्पती त्याला का मारत नाहीत हा प्रश्न पडला होता. त्यांनी बळी देण्याचे मंत्र म्हणण्यास खालून सुरवात केली.

यादृशो धर्मो
बलिर अप्यू अस्य तादृशः
यादृशो भक्ष्यो
बलिर् अप्यू अस्य तादृशः
ॐ वेदाय नमः
ॐ ऋग्वेदाय नमः
ॐ सामवेदाय नमः
ॐ अथर्ववेदाय नमः

ते ऐकून बृहस्पती वैतागले. त्यांनी ब्राह्मणांना मंत्र थांबवण्याचे आदेश दिले, पण ह्या नवीन राक्षसाने ब्राह्मण इतके घाबरले होते की, त्यांनी ''श्रीधरचा बळी घ्या'', असा घोष सुरू केला. बृहस्पतींना क्षणभर ब्राह्मणांना हा श्रीधर रिअल श्रीधर नाही असं सांगावसं वाटलं; पण ते गप्प राहिले. त्यांना स्वतःला सगळे देव हे मूळ देवांचे झेरॉक्स आहेत हे माहीत होतं आणि आपणही झेरॉक्स असल्याची शंका होती. गेली काही वर्षे ते आपण मूळ आहोत की झेरॉक्स आहोत ह्यावर संशोधन करत होते. देवांचा मृत्यू हा त्यांना जितका गूढ वाटे तितकंच देवांच्या झेरॉक्स प्रतिचं अमर होणं त्यांना रहस्य वाटे. अमृत पिताना तर हे रहस्य अधिकच गूढ होई. मूळ देवांच्याकडे अमृत होते; पण तरीही ते मेले होते, पण झेरॉक्स मात्र अमृत पिऊन अमर होत. समुद्राच्या एका पोटात देवांनी हे अमृत ठेवलं होतं आणि पृथ्वीवरील कुठल्याही माणसाच्या हाती ते लागू नये ह्याची ते दक्षता घेत.

सुरवातीला देव त्यांच्याकडे गुरू म्हणून येत तेव्हा त्यांना आश्चर्य वाटे; पण नंतर जेव्हा ह्या देवांच्या मूर्ती त्यांनी पृथ्वीवर पूजल्या जाताना पाहिल्या तेव्हा त्यांना एकंदरच नैसर्गिक वाटायला लागले. माणसे महामाणसे देवाकडे आणि देव त्यांच्या राजाकडे आणि त्यांचा राजा इंद्र आपल्याकडे. एकंदरच केवळ शस्त्रे असून चालत नाही, तर ज्ञानही लागते. नुस्ती ताकद असूनही चालत नाही आपल्यापेक्षा अधिक ताकद असणाऱ्याचा आशीर्वाद लागतो ह्यावर पृथ्वीवरील माणसांप्रमाणे देवांचा विश्वास होता; मात्र, आपला गुरू कोण हे मात्र त्यांना प्रश्न पडे. अंतिमतः कुणाला तरी नास्तिक होऊन अस्तित्वासंबंधात अंतिम निर्णय घ्यावे लागतात आणि आर्यावर्तात ही जबाबदारी आपल्यावर आहे ह्याचे त्यांना ओझे वाटे. अमर असूनही आपलीदाढी व केस सफेद का असेही प्रश्न त्यांना पडत. एकदा देव अमर हे ठरल्यानंतर सर्वच देव तरुण दिसायला हवेत, पण तसं नव्हतं. ते स्वतः आणि काही देव विनाकारण पिकलेले म्हातारे असे दिसत. एकंदरच देवानांही अमृत पिऊनसुद्धा आपला गुरू पोक्त, अनुभवी व प्रबुद्धच वाटला पाहिजे असे वाटत असे.

सर्वसाधारणपणे युद्ध सुरू झाले की देव हमखास त्यांचे पाय धरायचे. एरव्ही अनेकदा त्यांची आठवणही देवांना यायची नाही कारणे तर नेहमीचीच असत. स्त्री किंवा सत्ता. देवांना आपण पृथ्वीतलावरून नाहीसे होऊ ह्याचे सतत भय असे. मग स्वतःला टिकवण्यासाठी देव अनेक युक्त्या करत. भाकड चमत्कार करत आणि ते चमत्कार ब्राह्मणांच्या तोंडून वदवून घेत. अनेकदा युद्धे त्यांना अपेक्षित असलेला शेवट गाठत नसत आणि तरीही देव युद्धे करत. अनेकदा युद्ध करताना देवांना 'दानव' ही त्यांची स्वतःची कल्पना आहे, असा भास होई, तर काहीवेळा खुद्द देवांनाच आपण ब्राह्मणांची निर्मिती आहोत अशी शंका येई. 'परग्रहवासी' हीसुद्धा कदाचित देवांनी आपली मुळे थोर दाखवण्याची युक्ती होती. नाहीतरी माणसे आपला संबंध उगाच एखाद्या थोर गोष्टीशी जोडत तसे देवांचेही आहे की काय अशी देवांना शंका येई; पण ती फार पुढे कुणी रेटत नसे. कारण देवांच्या भूतकाळाचे पुराण विशेषतः अंतरिक्षातील ब्राह्मणांनी रचले नव्हते. ब्राह्मणांनी देव ह्या पृथ्वीलोकात आल्यावर काय झाले तेवढेच लिहिले होते. देवांच्यात इंद्र हा देव थोडासा युद्धखोरच होता. त्याला ऊटसूठ लढायला आवडे. मग ब्राह्मणांनी साथ दिली की हळहळू युद्धाच्या बाजूने बहुमत होई आणि इंद्राचे प्रमुखपद त्यामुळे सशक्त होई.

ब्राह्मण स्वतःला श्रेष्ठ समजत. आपण ईश्वराच्या डोक्यापासून बनलो आहोत ह्यावर त्यांची श्रद्धा होती. पुढे त्यांनी शाकाहार स्वीकारून अन्नाबाबतही आपण श्रेष्ठ आहोत हा अहंकार वाढवला. त्यांची संस्कृत भाषाही त्यांना श्रेष्ठ वाटे. अनेक वाटांनी स्वतःला श्रेष्ठ समजण्याचा अपप्रचार त्यांनी स्वतःच्याच डोक्यात केल्याने त्यांचे डोके हवेतच राही. हे एकप्रकारे आत्मसंमोहन होते आणि पिढी दर पिढी अधिकच पट्ट होत चालले होते. त्यांचीही आत्मसंमोहनताच अनेक युद्धांना निमंत्रण देई. प्रत्यक्ष युद्धात मात्र त्यांना मरायची इच्छा नव्हती. त्यासाठी त्यांना क्षत्रिय लागत, म्हणजे एका अर्थाने त्यांना श्रेष्ठत्व हवे होते; पण त्यासाठी प्राण मोजण्याची तयारी नसे. हीच गोष्ट संपत्तीबाबत! जगभर वणवण भटकून व्यापार करण्याइतकी मेहनत करण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यापेक्षा वैश्यांना यज्ञ करायला लावून त्यांच्याकडून संपत्ती उकळणे सोपे होते. अंगाला कसलाही त्रास होऊ न देता कसलीही सामाजिक जबाबदारी

न घेता केवळ वेदश्रुतीस्मृती आत्मसात करून संरक्षण, संपत्ती व दास पदरात पाडून घेण्याचे हे ब्राह्मणी कसब अद्भूत होते. केवळ काही प्रोग्रामांची निर्मिती करून आणि ते ब्राह्मणेतरांच्या मनावर ठसवून त्यांनी हे साध्य केले होते. ह्या युद्धात नेमके हे प्रोग्रामच पणाला लागले होते. एकदा का लोकांचा देवावरचा, स्वर्गावरचा विश्वास उडाला, तर लोक सनातन धर्म बुडवणार हे स्पष्ट होते.

पूर्वी ब्राह्मणांना खरोखरच सत्य शोधण्याची व ज्ञानप्राप्तीची पिपासा होती. त्यामुळे त्यांचा अहंगंड एखाद्या नवीन ज्ञानप्राप्तीने सुखावत असे; पण पुढे सगळे ज्ञान वेदात आहे, अशी गैरसमजूत पसरली. परिणामी ब्राह्मण ऐदी आणि आळशी झाले. हल्ली हल्ली तर आपल्या रिकामपणाचे काय करायचे हेच त्यांना समजायचे नाही. मग त्यांची रिकामपणाची कामगिरी सुरू झाली. ''लोकांना लढवा आणि तमाशा बघत बसा'' ''फालतूचे तपशील वाढवा याद्या वाढवा निर्बंध वाढवा आणि स्वतःचे महत्त्व वाढवा'' ''सर्व गोष्टींच्या स्पष्टीकरणासाठी नवीन नवीन कथा रचा आणि त्या खऱ्या असल्याचा आभास निर्माण करा'' असे अनेक कार्यक्रम ब्राह्मणांनी हाती घेतले. त्यांना एक गोष्ट कळून चुकली होती त म्हणजे माणसाची अमर होण्याची इच्छा ही कालातित आहे. मेल्यानंतरही त्याला जिवंत राहण्याची इच्छा असल्याने कुठल्याही काळात माणसाला स्वर्ग आणि नरक, ईश्वर आणि देव अशा अजरामर गोष्टी लागणारच. त्यामुळे एकदा ह्यांचे प्रोग्राम रचले की, ते प्रोग्राम अमर होणे अटळ. ह्या प्रोग्रामांच्या साहाय्याने आपण लोकांना हवे तसे झुलवू शकतो. त्यामुळे देव असोत अगर नसोत. ते कुठून आले असोत वा आपल्या कथातून निर्माण झालेले असोत. त्यांच्यासाठी ते अस्तित्वात होते; किंबहुना ते अस्तित्वात राहणे ही त्यांची गरज होती. त्यांची भाजीभाकरी त्यावरच अवलंबून होती. एखादी गोष्ट अस्तित्वात आहे की नाही ह्यापेक्षा तिच्या अस्तित्वाला गृहीत धरल्यामुळे किती फायदा होतो हेच त्यांना महत्त्वाचे वाटत होते. देवांची, स्वर्गाची, परमेश्वरांची रिअल व्हॅल्यू कदाचित शून्य असेल; पण त्यांची एक्सचेंज व्हॅल्यू प्रचंड होती. लोक प्रसंगी प्राणाचे मोल देऊन त्यांचे रक्षण करीत होते आणि ब्राह्मणांना त्यांची सर्वात मोठी फलप्राप्ती हीच वाटे. क्षत्रियांनी 'मातृभूमी', 'माझे राज्य', 'माझे राष्ट्र' असे काही नवीन स्वर्ग, नवीन देवदेवता निर्माण केल्या होत्या. लोक त्यासाठीही प्राण वगैरे देत. मात्र, ह्या क्षत्रिय देवदेवता अतिकाल्पनिक नव्हत्या. त्यांना स्वतःची भूमी ही एक आधार होता. परकीय लोक आक्रमण करून आपली भूमी, आपली संपत्ती, आपल्या स्त्रिया लुटू शकतात, असे भय लोकांना वाटेआणि त्यात थोडे तथ्य होतेच. अनेकदा देव आणि मग त्यांच्या पूजा लोकांना एकत्र आणायला आणि त्यांचा संघ बांधायला उपयोगी पडत. क्षत्रिय त्यामुळेच देवांना पाठिंबा देत. कारण समाज संघटित करणारे कुठलेही तत्त्व त्यांना फायद्याचे वाटे. अधुनमधून युद्धाची खुमखुमी जिरवायलाही देव उपयोगी पडत. प्रत्येकाच्या आतला जंगली माणूस अशावेळी पेटून उठे आणि मग सगळ्यांनाच युद्धाचा ज्वर चढे. युद्धाच्या कथा अशावेळी लोकप्रिय होत. देव दानवांशी लढताना पाहून माणसांनाही आपण जे युद्ध करतोय ते सत्कृत्य आहे असे वाटे. लढणाऱ्या दोन्ही पक्षांना देव आपल्या बाजूला आहेत ह्याची खात्री असे. देव मात्र शक्यतो माणसांच्या लढाया स्वतःहून लढत नसत. त्यापेक्षा माणसांच्यात संचार करून भविष्यवाणी वगैरे सांगणे त्यांना परवडत असे. माणसांच्या अंगात देव आले की माणसांनाही ज्वर चढे.

देवांचे खरे प्रतिस्पर्धी भुते होती. भुते हीही देवांप्रमाणेच अमृत न पिताही अमर असत. भुते ही आपले पूर्वज व पितर अमर असल्याची खात्री पटवत. मात्र, देव दानवांच्या युद्धात भुते क्वचितच येत. त्यांचे प्रोग्राम्स वेगळेच होते. देव आणि माणूस, परलोक आणि इहलोक ह्यांच्या दरम्यानच्या प्रदेशात ती लोंबकळत आणि उलट्या पावलांनी चालत. भुते ही एका अर्थाने माणसांची उलट्या पावलांनी चालणारी कंटीन्युटी होती.

बृहस्पती चिंतन करत होते.

युद्ध म्हणजे कुणाच्या तरी दुखावल्या गेलेल्या अहंकाराचा उभा राहिलेला लंड आणि तो शांत करण्यासाठी त्या धारकाने केलेली आडवी घाई.

बृहस्पती चिंतन करत होते. चिंतन करता करता त्यांना चिंता वाटायला लागली. या चिंतेमुळे त्यांचे चित्त थाऱ्यावर न राहता त्यांची चित्ता जळू लागली. तोच एलसायबोर्गचा एक फटका चित्त्यासारखा त्यांना येताना दिसला. त्याने एकदम त्यांना क्षणभरासाठी चितपट मारले आणि ते थेट एका स्मृतीत पोहचले तिथे एक टायटल लटकत होते.

अस्पृश्य

(सर्व स्मृतींचा सारांश)

(खालील लोक अस्पृश्य आहेत)

चांडाल, बौद्ध, पशुपत, जैन, लोकायतिक, कापिल (सांख्य), शैव, नास्तिक, जातीधर्म सोडून वागणारे व बहिष्कृत झालेले ब्राह्मण, मृतप, श्वपाक, इवपचा, म्लेंच्छ, पुळकस, भिल्ल, चांभार, कोळी, मृगयु, व्याध, खाटिक, परीट, गोहारी.....

किती जाती किती जमाती किती मिश्रणे किती डिंक
व्यवस्था काय डोंबलाची लावणार तरीही आम्ही ब्राह्मण चिकट
म्हणून न थकता ही व्यवस्था लावत आहोत.

सुदैवाने ह्या यादीत देवांचे नाव दिसत नव्हते. एकंदरच आपली भक्ती करणारी ब्राह्मण ही जमात भलतीच आडमुठी आहे, असे त्यांच्या लक्ष्यात आले. क्षणभर त्यांच्या अंगावर काटा आला. आपण नेमके कोणासाठी लढत आहोत? देवांना खरोखरच हे अपेक्षित होते का? त्यांचे खांदे जड झाले. क्षणभरच सर्व देवांनी आत्महत्या केलेली बरी असे त्यांना वाटले; पण आपण सर्व नाहीसे झालो तरी ब्राह्मण नवे देव निर्माण केल्याशिवाय राहणार नाहीत. म्हणजे इंद्र गेला तरी दुसरा कुणी नवा देव जन्मेल आणि मीच वर्णव्यवस्था निर्माण केली असे सांगेलच. त्यांना एकदम उदास वाटले. आपलाही मृत्यू होऊ शकतो ह्या विचारानेच ते अवघडले. ब्राह्मण आपले गुलाम आहेत की आपण ब्राह्मणांचे गुलाम आहोत हेच त्यांना कळेना. एका गुंतागुंतीच्या कोलाहलात एलसायबोर्ग-विरुद्ध लढणे त्यांना थकवणारे होते. आपण जर एलसायबोर्ग विरुद्ध हरलो तर ब्राह्मण ताबडतोब नवे देव शोधतील ह्याची त्यांना खात्री होती. माणसाच्या चंचल भक्तीचा नमुना त्यांनी ह्यापूर्वी कैक वेळा पाहिला होता. वेदातील काही देव केवळ पराभूत झाल्याने नाहीसे झाले हे त्यांना माहीत होते. अनार्यांचे कित्येक देव अनार्य पराभूत झाल्यावर नाहीसे झाले जिथे जय तिथे जग (मनुष्य) हे एक त्रिकलाबाधित सत्य होते.

बृहस्पतीचे चिंतन चालू असताना काही देवांना मात्र युद्ध चालू झाल्याचा आनंद झाला. देवाचे व माणसाचे खरे वैभव हे कृती करण्यात आहे. केवळ इतर काय करतात ते बघण्यात नाही, अशी त्यांची धारणा होती. आता ह्या युद्धात निश्चितपणे काही ना काही नवे तंत्र, नवे शस्त्र शोधले जाईल ह्याचाच त्यांना थरार वाटू लागला होता. युद्ध करणारेच विज्ञानातही आघाडीवर असतात हा त्यांचा सिद्धांत होता. आळशी लोक व आळशी देव युद्धे करीत नाहीत आणि नवीन कुठल्या गोष्टीचा शोधही लावत नाहीत असा भूतकाळ होता. त्यांच्या मते त्यांच्या अंगी जी ताकद जो जोम होता त्याला वाटा करून देणे गरजेचे होते.

एलसायबोर्ग मात्र चिंतन न करता फक्त लढत होता. देव अनेक आणि आपण एक आहोत ह्याची त्याला कल्पना होती. जिथे जिथे अनेकता असते तिथे तिथे लढणे अवघडच असते. कारण कोणते डावपेच आखले जातील ह्याची कल्पना करता येणे अशक्य बनते. अशावेळी आपापसांत मतभेद होऊन शत्रूत फूट पाडण्याची वाट पहावी लागते. देवांच्यात अशी फूट पडत नव्हती. अस्पृश्यतेच्या प्रश्नावर ब्राह्मणही एक होते. श्रीधर तर डाईसलाच लटकलेला होता. तो सुटून जर फूट पाडण्यात यशस्वी झाला, तर आपण लढाई जिंकू असे त्याला वाटत होते. त्यामुळे श्रीधरला सोडवण्याची तो ग्रॅण्ड कोशिश करत होता. पण देवांनी रचलेल्या चक्रव्युहामुळे त्याची फारशी प्रगती होत नव्हती. एखाद्या मेटॅनॅरेटीवशी एखादे मायक्रोनॅरेटीव्ह लढावे तशी त्याची लढाई चालली होती; मात्र, हे मेटॅनॅरेटीव ब्राह्मण धर्माप्रमाणे बहुतोंडी होते आणि त्याचा चक्रव्यूह भक्कम होता. अवकाशात जातीव्यवस्था निश्चित झाल्यावर प्रत्येक जातीला जशी निश्चित अशी जागा मिळाली होती तसेच चक्रव्युहात सारे देव आपापल्या

जागी पक्के होते. एलसायबोर्गला आतापर्यंत जे महाप्रोग्राम भेटायचे ते एकतोंडी असायचे आणि त्यांची रचना एखाद्या चौकोन, त्रिकोण वा वर्तुळानुसार असायची इथे मात्र चक्रव्युहाला निश्चित असा आकार नव्हता. त्याची तोंडेही अनेक होती, असा प्रोग्राम डिकोड करून उद्ध्वस्त करणे हे सोपे काम नव्हतेच. ०/१ चे बायनरी फॉर्म्युले काम करत नव्हते. त्यामुळे एकाच तोंडाची निवड करणे कठीण जात होते. एकाच वेळेला अनेक कथा समोर होत्या आणि त्यांचा आपापसांत काही संबंधच दिसत नव्हता. एक इंटरकनेक्टीव्हिटी दिसत होती; पण ती तोडल्यानंतरही जाळे तुटण्याची गॅरंटी वाटत नव्हती. देवाजवळ असणारी शस्त्रेही विविध होती. ह्या चक्रव्युहात जे सात स्वर्ग होते ते देखणे होते. त्यांच्यात कुठली कुठली शस्त्रे लपली होती ते सांगणे कठीण होते.एलसायबोर्ग ते पहात होता तोच एक देव आला आणि म्हणाला.

"Everything is in head"

मग दुसरा देव आला आणि म्हणाला,

"Everything is in heart"

तिसरा देव आला आणि म्हणाला,

"Everything is in stomach"

चौथा देव आला आणि म्हणाला,

"Everything is in Sexual organ"

पाचवा देव आला आणि म्हणाला,

"Everything depend on your feet as everything is relative"

एलसायबोर्गमधून आवाज आला

"But look at it carefully"

Is it real

or

Is it fake"

एलसायबोर्गने न्याहाळायला सुरवात केली खरी; पण नंतर त्याला स्वतःचे हसू आले. कारण तो स्वतः कुठे रिअल होता तो होता एक प्रोग्राम.

तोच त्याच्यातून दुसरा आवाज आला

''तुला जिवंत राहण्याची टिकण्याची इच्छा आहे

ह्याचा अर्थ तू रिअल आहेस.''

त्या आवाजाने त्याला धीर आला. त्याने न्याहाळायला सुरुवात केली.

पहिला स्वर्ग अगदीच मृण्मय होता. सगळी घरे मातीची आणि साधी होती. इथला रंगमंचही लाकडाचा होता. सगळ्या घरांना छत होते. सगळ्या रचना छोट्या छोट्या होत्या. फक्त धर्मसंसदेची आणि राजवाड्याची रचना मोठी होती.

दुसऱ्या स्वर्गात फक्त गुहा, जंगले आणि वेदी होत्या. सगळं कसं गूढ आणि अद्भूत होतें. सर्वत्र संमोहन झाल्यासारखे वातावरण होते.

बघता बघता एलसायबोर्गच्या लक्ष्यात आले की, प्रत्यक्षात जो दुसरा आहे तो पहिला आहे आणि जो पहिला आहे तो दुसरा.

तिसरा मात्र धातू आणि वाळूंनी उभ्या राहिलेल्या उंच उंच धाब्यांनी बनलेल्या घरांनी बनलेला होता. ही घरे एकसारखी आणि बहुमजली होती. ह्या स्वर्गाला माती निषिद्ध होती की काय असे वाटत होते. इथे प्रत्येक गोष्ट भव्य आणि विशाल करण्याचा प्रयत्न जाणवत होता.

चौथा मात्र पहिल्या तीन स्वर्गाचा अजीबोगरीब संकर होता. 'स्वर्गसंकर'! धातूची घरे आणि त्यांना मातीचे छत काही घरे एकदम छोटी तर काही इतकी मोठी की, त्यात शंभर दोनशे घरे सहज बसली असती असे वाटावे. तिसऱ्या स्वर्गात बागा अतिशय नेटक्या होत्या. इथे मात्र त्या कधी नीटनेटक्या व रेखीव तर कधी जंगलासारख्या अस्ताव्यस्त वाढलेल्या होत्या. हा स्वर्ग जणू आधीच असलेल्या पहिल्या दोन स्वर्गावर तिसऱ्या स्वर्गाचे रोपण करून बनला होता. आकाराशी, सातत्याशी जणू त्याचं शत्रुत्व होतं, पण तरीही प्रत्येक वस्तू कशी आसपासच्या वस्तूत ठेवल्यासारखी दिसत होती. सगळ्या इमारतींना एक प्रकारचा उथळपणा होता. जणू त्यांना पाया नव्हता, पण प्रत्येक इमारत इतर इमारतीमुळे सांभाळली जात होती.

पाचवा स्वर्ग निव्वळ भिंतीचा आणि पडद्यांचा होता. पडद्यांवर वेगवेगळी चित्रे उमटत होती आणि नाहीशी होत होती. झाडेदेखील सपाट केल्यासारखी अंग आकसून भिंतीसारखी उभी होती. सर्वत्र सपाटीकरण होते. फक्त उडणाऱ्या गोष्टीच सपाट नव्हत्या. ह्या उडणाऱ्या गोष्टी सतत सगळ सपाट आणि निर्मूळ आहे, अशी घोषणा करत वरून जे खाली सपाट झालेत त्यांच्यावर जणू नियंत्रण असल्यासारख्या कैफात उडत होत्या. सपाट असणे आणि समान असणे ह्यांच्यातला फरक जणू त्यांन ा कळत नव्हता किंवा तो त्यांना कळूनच घ्यायचा नव्हता. ह्या सगळ्या गोष्टींनी मूळ त्वचेचे संरक्षण व्हावे म्हणून अंगावर दुसरी त्वचा बसवून घेतली होती.

सहाव्या स्वर्गात पुन्हा संकर झाला होता. भिंतींना मध्येच छते होती. सपाटीकरण नाहीसे झाले होते; मात्र,जे फुगवटे होते ते कधी भूछत्रासारखे दिसत होते, तर कधी अर्धचंद्रासारखे हा स्वर्ग पुन्हा पहिल्या पाचांचा संकर होता. झाडे कुठल्याही आकारात उभी होती. बागा आणि जंगले मध्येच ओसाड तर मध्येच वृक्षारोपण केल्यासारखी गच्च. काही गोष्टी तर निष्कारण जळत असल्यासारख्या दिसत होत्या, तर काही उडत होत्या. त्या उडत होत्या त्या निष्कारण श्रीमंत वाटत होत्या. सपाट झालेल्या मात्र जणू सपाटीकरणाची प्रचंड किंमत चुकवत असल्यासारख्या गरीब चेहरा करून पहात होत्या. माणसांच्या इतकेच रोबोजही आढवत होते आणि दोहोंत नेमका फरक सांगणे सहज पाहणाऱ्यांना कळणे कठीण झाले होते. अनेक माणसे रोबोंना ओळखण्यासाठी रोबोज चष्मे घालून फिरत होती. अचानक एलसायबोर्गच्या लक्ष्यात आले की, ही माणसे माणसे नाहीत तीही रोबोज आहेत.

सातव्या स्वर्गाला पाहून मात्र एलसायबोर्ग दचकला. कारण तो ज्या सन्नी ग्रहावरून आला होता त्याच्याशी हा बराच मिळता जुळता होता. इथे जवळ जवळ सर्वच घरे उडत होती. ज्या गोष्टी जमिनीवर होत्या त्या विश्रांतीसाठी जणू जमिनीवर उतरल्यासारख्या दिसत होत्या; पण ही माणसेही विविध रंगाची विविध त्वचांची होती. जणू त्यांचे चेहरेही चेहरे नव्हते. कारखान्यात तयार झालेले मेकअप होते. इथे प्रचंड आकाराचे विविध प्रोग्राम बिनधास्त हिंडत होते. काहीच स्थिर नसल्याने आख्खा स्वर्ग हवेत उडणाऱ्या कलरफूल सेटसारखा दिसत होता. जी माणसे हिंडत होती, त्यात अनेकदा एकाच पद्धतीची शंभर माणसे दिसत होती आणि त्यांच्यातला खरा कोण आणि क्लोन कुठला तेच कळत नव्हते. अनेक प्राणीही क्लोनसारखेच दिसत होते आणि खऱ्या खोट्याचा एकच गोंधळ उडून गेला होता.

आठवा स्वर्ग मात्र एलसायबोर्गला दिसत नव्हता आणि श्रीधर नेमका तिथेच होता आणि जो डिजीटल श्रीधर टांगला गेला होता तो पाचव्या, सहाव्या, सातव्या स्वर्गावर फिरत असलेल्या डायसला लटकलेला होता. एलसायबोर्गला काहीही करून हा स्वर्गीय चक्रव्यूह फोडायचा होता. त्याच्या प्रकृतीशी सातवा स्वर्ग अधिक जुळत होता. आपण जर तिथे घुसलो तर आपणाला निश्चितपणे चक्रव्यूह फोडता येईल असे त्याला वाटू लागले. घरे उडत होती. तबकड्या उडत होत्या. ब्राह्मणांचा वृंद पहिल्या स्वर्गाखालून मारत असलेल्या बोंबा इथे तितक्या ताकदीने पोहचत नव्हत्या. सायबोर्गने प्रथमच आपले शरीर आत ओढून घेतले आणि तो सातव्या स्वर्गात झेपावला. अचानक झालेल्या ह्या हल्ल्याने वायूमंडल गडबडले. बृहस्पतींना अचानक लढाईला खऱ्या अर्थाने तोंड फुटल्याचे जाणवले. काहीतरी करणे गरजेचे होते. क्षणभर ते विचारहीन झाले आणि मग त्यांचा मेंदू चमकला त्यांनी एका बिळातून मोठ्याने घोषणा केली.

"SHRIDHAR IS DEAD"

''कृपया लक्ष्य द्या. श्रीधरचा मृत्यू झालाय.''

आपल्या मृत्यूची घोषणा ऐकून डिजीटल श्रीधर गडबडला. त्याला वाटलं आपण खरोखरच मेलोय आणि आपणाला ते माहीत नाही. मग त्याला वाटलं आत्ता काय? मेल्यानंतर काय? त्या प्रश्नानं तो आणखीनच गोंधळला.

तुम्ही मेलाय तुमच्या मृत्यूची घोषणा झालीये आणि तुम्ही मेलाय ही

घोषणा तुम्हाला स्पष्टपणे ऐकू येते. इतकेच नव्हे तर तुम्हाला तिचा अर्थही कळतोय, तर अशा वेळी मेलेल्या माणसाने काय करायचे? त्याने आपण इतर गांगतायत म्हणून आपल्या मृत्यूवर विश्वास ठेवायचा? काय करायचे?

डिजीटल श्रीधरच्या घोषणेने देवांच्यात मात्र चैतन्य आले आफ्रिकेत लढणारा इंद्र त्या घोषणेने आता अधिकच सावध झाला. आपण युद्ध जिंकू शकतो ह्याची त्याला खात्री पटली. "फक्त आता ह्या आफ्रिकेतल्या लढाईपासून पळून जायाला हवं !" तो एकाचवेळी लढू लागला आणि पळून जाण्याची संधीही शोधू लागला. डिजीटल श्रीधरच्या डायसवर आपण जर ह्या कृष्णवर्णीयाला नेले तर त्याला आपण सहज मारू, शकू असा विश्वास त्याला वाटू लागला.

ब्राह्मणांनी मात्र ही घोषणा ऐकून परम आनंद व्यक्त केला. देव आपलं ऐकतात हा त्यांचा विश्वास द्विगुणित झाला. त्यांच्यातील काहीजण श्रीधरचे प्रेत देवांनी फेकले असेल तर ते आपण शोधायला हवं असं म्हणू लागले, तर काहीजण श्रीधरचा मृत्यू म्हणजे त्याच्या ताकदीचा मृत्यू असे म्हणून शक्तिहीन श्रीधरचा शोध घेऊ लागले.

इकडे एलसायबोर्ग व्यस्त होता तो भलत्याच गोष्टीत. त्याला काही गोष्टी दुरून टिपता आल्या नव्हत्या. त्या आता दिसल्या स्वर्गाच्या बाहेर स्वर्गापेक्षा विशाल, पण घनदाट असे बाजार होते. अनेक माणसे बाजारहाट करत होती आणि स्वर्गात मात्र कुणीच प्रवेश करत नव्हते हे आश्चर्यकारक, पण सत्य होते. लोक स्वर्गाच्या बाहेर मुद्रा वा फुले टाकत पायरीला हात लावत नमस्कार करत आणि निघून जात. स्वर्ग एकदम भकास व रितेरिते वाटत होते. केंद्र इतके रिकामे असेल ह्याची सायबोर्गला कल्पनाही आली नव्हती. देवांना बहुधा ह्या दृश्याची सवय असावी. त्यामुळे देव ही गोष्ट मनाला लावून घेत नव्हते. एके ठिकाणी तर एक अप्सरा आपले सगळे अलंकार व वस्त्रे उतरवून पलंगावर निवांत झोपली होती आणि चार पुरुष तिचे सौंदर्य पहायचे सोडून आवाज न करता तिच्या वस्त्रांची व अलंकाराची चोरबाजारात काय किंमत येईल ह्याची चर्चा करत होते. त्यांची बहुधा ती वस्त्रे चोरण्याची योजना आधीच ठरलेली असावी. एके ठिकाणी एक साधू भगव्या वस्त्रासाठी किंमतीत घासाघीस करत होता आणि दुकानदार धर्माचा दुकानाशी काहीच संबंध नाही असे सांगत किंमत कमी करायला नकार देत होता. एके ठिकाणी एक राजदण्ड हातात घेऊन एक स्त्री नग्न होऊन पळून चालली होती आणि यज्ञाला बसलेले राजपुरुष पळून जाऊ नकोस म्हणून तिची विनवणी करत होते.

एके ठिकाणी वालुकापात्रासारखे एक घर होते आणि त्यात वरून माणसे पडत होती आणि ती खाली पोहचेपर्यंत त्यांची वाळू होत होती. पात्राखाली लाल रंगाचं वाळवंट तयार होत होतं.

एके ठिकाणी अणुबॉम्बचा स्फोट झाला होता आणि त्या स्फोटाच्या प्रकाशात नऊवारी साडी नेसलेली एक स्त्री कमळात उभी राहून आपल्या हातातील बांगड्या अस्सल सोन्याच्या आहेत की नाहीत ते चेक करीत होती.

एके ठिकाणी डायनॉसीस नावाची देवता नित्शे नामक डायनॉसरवर बसून हिमालयावर हिंडत होती आणि एक जापानीज भिक्षु झेनचे किस्से मोठ्याने ओरडून सांगत हत्तीवर बसून त्यांच्या मागे लागला होता आणि जगातले अनेक देव आकाशातून हे दृश्य बघत त्यांच्यावर फुले टाकत होते.

एके ठिकाणी मात्र पांढरी त्वचा प्रचंड मोठी चादर अंथरावी तशी पडली होती आणि तिच्यावर कृष्णवर्णीय अवयवांचे खचच्या खच जे आकाराने लहान मोठे होत होते. हलता येत नसल्याने वळवळवत पडलेले होते. ही चादर जादूच्या गालिच्यासारखी आकाशात उडत होती आणि खाली येऊन बसतही होती.

एलसायबोर्गला ह्या गोष्टी बघून क्षणभर भोवळ आली, पण त्याने स्वतःला सावरले.

इकडे श्रीधर मात्र लटकत असतानाच त्याच्या डोळ्यासमोरून एक वाक्य गेले. त्याने ते वाचायचा प्रयत्न केला, पण शक्य झाले नाही. आपल्याला वाचन शक्य झाले नाही ह्याचा अर्थ आपण निश्चित मेलोय असे डिजीटल श्रीधरला वाटले. शब्दांचा आणि तो जिला लटकला होता त्या डायसचा वेग कदाचित एक नसल्याने वाचन निसटले असेही त्याला वाटले. अनेकदा आपण वाचन करताना आपण आणि संहिता हे दोघेही वेगात आहेत हेच विसरून जातो. अनेकदा संहितेचा आणि आपला वेग एकच असतो. त्यामुळे आपण संहिता स्थिर आहे किंवा आपण स्थिर आहोत किंवा दोघेही स्थिर आहोत असे गृहीत धरतो, पण प्रत्यक्षात तसे नसते. तुम्ही अॅन्टीग्रॅव्हीटेशनल वाचता तेव्हा तर हा वेगाचा फरक तीव्रतेने जाणवतो. त्याउलट तुम्ही जेव्हा ग्रॅव्हीटेशनल वाचता तेव्हा तो तितकासा जाणवत नाही. ह्याचा अर्थ असाही नाही की प्रकाश किरणासारखी तुमची वाचन गती सर्वत्र सारखीच असते. नाही, तुम्ही माणूस असल्याने तुम्ही प्रकाशासारखे निरपेक्ष असू शकत नाहीत. खरेतर प्रकाशही पूर्ण निरपेक्ष नसतोच. त्यामुळेच तुम्ही ज्या प्रकाशात वाचन करता त्या प्रकाशावरही तुमचे वाचन अवलंबून असते. अंधुक प्रकाशात तुमचे वाचनही अंधुक होऊ शकते. काहीवेळा संहितेची गती तुमच्यापेक्षा इतकी जास्त असते की, तुम्हाला ती वाचताच येत नाही. काहीवेळा ती इतकी मंद असते की, तुम्ही वाचनाचा वेग वाढवून ती संपवता किंवा कंटाळा येऊन वाचन सोडून देता. श्रीधर पुढून जे वाक्य गेले त्याचा वेग श्रीधरपेक्षा जास्त होता. त्यामुळे ते त्याला वाचताच आले नाही. त्यामुळे त्याला वाटले की तो खरोखरच मेलाय. एकतर मौखिक घोषणा बृहस्पतींनी केलीच होती आणि जे लिखित होते ते वाचता आले नव्हते.

बृहस्पती मात्र सर्वत्र विखुरून पडलेल्या देवांच्या सत्तेच्या तुकड्यांना पाहून उदास होत होते. खरेतर देवांची एक महासत्ता निर्माण झालेली त्यांना पहायची होती; पण आर्यावर्तात इतके देव होते की, सगळी सत्ता छोट्या छोट्या मंत्रात, निवेदनात, विधीत, मंदिरात विखुरली गेली होती. अनेक ठिकाणी तर ती फक्त तरंगतीये असा भास होत होता, तर काही ठिकाणी ती चक्क मरून पडली होती. त्यांनी लावलेला चक्रव्यूह पक्का होता, पण त्यांची त्यावरची श्रद्धा डळमळती होती. एका राक्षसासाठी एवढा सगळा खटाटोप करणे त्यांच्या जीवावर आले होते. त्यापेक्षा ब्राह्मणांनी वर्णव्यवस्था त्यागावी असे त्यांना वाटायला लागले होते, पण देव आणि ब्राह्मण आपले ऐकणार नाहीत ह्याची त्यांना कल्पना होती.

जैन, शैव, नास्तिक सर्वत्र छोटे छोटे उठाव होत होते; पण तरीही ब्राह्मण काही ऐकत नव्हते. ह्याचा परिणाम मात्र नेमका उलट होत होता. सर्वत्र संकर बोकाळला होता. त्यातून नवीन नवीन जाती शोधून काढल्या जात होत्या. कुणाचा पायपोस कुणात नव्हता. दोन वर्णातून एक पोटजात मग दोन पोटजातीतून एक पोटपोटजात मग दोन पोटपोटजातीतून पोटपोटपोटजात ती लांबड इतकी की प्रत्येक माणूस म्हणजे

पोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटपोटजात झाला होता आणि तरीही ब्राह्मणचिकाटीने लेबल चिकटवत स्वतःला वर ठेवायला धडपडत होते. काही ब्राह्मण तर हल्ली ह्या पोट प्रकरणांना इतके कंटाळले होते की त्यांना त्यांची 'स्मृती' ठेवणे कठीण जात होते. त्यांनी कंटाळून समाजात ब्राह्मण आणि इतर म्हणजे शूद्र असे दोनच वर्ण आहेत, असे सांगायला सुरुवात केली होती. म्हणजे सांगणाऱ्याचा एक आणि न सांगणाऱ्याचा एक असे दोन वर्ण शिल्लक उरले होते. हल्ली हल्ली तर बृहस्पतींना सांगणारे आणि ऐकणारे, करणारे आणि पाहणारे असे दोनच वर्ण अस्तित्वात असतात असे वाटायला लागले होते. अशावेळी मग एकच गोष्ट शिल्लक उरते जिथे हा भेद मिटतो ती गोष्ट म्हणजे संभोग. संगात तुम्ही करता आणि पाहता ऐकता आणि सांगता एकाचवेळी. त्यामुळे सर्वत्रच संग उगवला होता. लोकांना भेद मिटवायचे होते आणि फक्त संगच हे काम करू शकत होता. त्यातून संकर अधिकच वाढत चालला होता. तांत्रिक तर गावागावात दिसायला लागले होते आणि तंत्र सर्वत्र बोकाळत चालले होते.

ह्यात आतून सर्वात जास्त हवालदिल झाले होते ते ब्राह्मण. विचार करणारे तज्ज्ञ-ज्ञानाचे तज्ज्ञ -ज्ञानाचा यज्ञ चालवणारे यज्ञकार-त्यांच्यासाठी काय नव्हते? सर्वोच्च सामाजिक दर्जा - सर्वात सुंदर स्त्रियांचे प्रेम व भोग अगदी राजकन्याचा हात मागण्याचाही हक्क - सार्वजनिक समारंभात विशेष राखून

ठेवलेली जागा - वारा वाहिलाकी वायूविषयी विचार करायचा, पाऊस पडला की इंद्राविषयी - जगात जेवता जेवता विचार करायचा हे जग माया आहे की वास्तव आहे, सत्य आहे की भास?

मग अचानक शंकांचे आक्रमण, हूणांचे आक्रमण काही काळापुरती जाग-मग भाषा भाषा भाषा - ध्वनी - स्फोट - रस - अलंकार- अभिनय अमुक भाव व्यभिचारी की संचारी शांती हा दहावा रस आहे की नाही? भक्ती हा रस आहे की नाही?

गेली कित्येक शतके भारतवर्ष म्हणजे एक कोलाहल होता. एक वैचारिक बजबजपुरी आणि प्रत्येक पुरीचा एक आचार्य खंडन मंडन आणि मग विखंडन. प्रत्येक गोष्टीचे विखंडन, प्रत्येक गोष्टीची खंडाखंडात खांडोळी करायची आणि एकाच शब्दाचे दहा दहा अर्थ एकाचवेळी ऐकायचे. ह्यातून एक विटंबना! प्रत्येक जातीचं एक वर्तुळ! त्यातून जातीतले जातीच्या बाहेरले अशी अनेक वर्तुळे! प्रत्यके वर्तुळ दुसऱ्या वर्तुळाला अस्पृश्य समजणारं! त्यांचा विटाळ समजणारं! बरं ह्या वर्तुळांना काही निश्चित केंद्र असावं तर तेही नाही. ब्राह्मण जे केंद्र म्हणून सांगत ते वेद कुणालाच वाचता येत नव्हते. त्यामुळे सगळा सावळा गोंधळ! वर्तुळं-वर्तुळं-केंद्र नसलेली वर्तुळं! वर्तुळाच्या थाळ्या! त्यात वेद व परब्रह्म हा अदृश्य प्रकार लोणच्यापुरता बाकी. मग त्या थाळीत ज्याला जे मांडावसं वाटेल ते मांडाव. ज्याला जे आवडेल ते खावं. मात्र, आंतरभोजनास बंदी. प्रत्येक वर्तुळाची वेगळी थाळी! त्या वर्तुळाकार थाळीत अनेक पदार्थ! वनभोजनाला प्रत्येकाने आपापले भोजन घेऊन यावे आणि एकमेकाला जेवण न देता एकत्र भोजन करावे तसा हा प्रकार! यदाकदाचित दुसऱ्या थाळीतलं काही आवडल तर दुसऱ्या वनभोजनावेळी तो पदार्थ आपल्या पद्धतीने करून आपल्या थाळीत मांडावा आणि भोजन करावे. सगळ्यांनी एकमेकाला दिसावे, पण एकमेकांच्या वर्तुळात प्रवेश न करता जेवावे. अद्भूत व्यवस्था! केंद्रच नाही! त्यामुळे द्विकेंद्री पद्धत नाही की दोन तट नाहीत. एकमेकांच्या विरुद्ध काही नाही. कारण एकमेकांतच काही नाही. दुसऱ्या विषयीच्या नुस्त्या संकल्पना आणि कल्पना. कारण दुसरा माया कधी कधी आपण शून्य बाहेरही शून्य.

सर्व भौतिक व्यवहार संदिग्ध. एकमेकांविषयी कायम अविश्वास चालवणे आणि चालवून घेणे. ना कुठली मूल्य व्यवस्था ना कशाबद्दल आदर. सगळे नमस्कार दांभिक. जे पाहुणे आहेत त्यांना मात्र मान एक खेळ चाललाय. त्यात कुणाचा जीव गेला तरी दात खिदळतायत. प्रत्येक संबंध दांभिकलेला आणि दुभंगलेला.

उलट्या टांगलेल्या वडाप्रमाणे ह्या प्रदेशाची मुळे आकाशातील कुठल्यातरी अतार्किक सुसंगतीत आणि खाली सूरपारब्यांचा खेळ खेळत हे लोक आनंदात आणि दुःखात. प्रत्येक दुःख हे मागील कर्माचं फळ. त्यामुळे दुःखाविषयी पुरेशी आस्था नाही, आदर नाही.

एकदा मूळंच आकाशात गेल्यावर बाकी सगळ्या गोष्टी आपोआपच आडव्या होतात. त्यामुळे इथल्या सगळ्या परंपरा, तत्त्वज्ञाने आडवी. एकीलाही केंद्र असे नाही. मुळे नाहीत, परस्परांचे मूळ एक आहे ह्याबद्दल एकमेकांबद्दल खात्री. त्यामुळे सर्वच परंपरा व प्रणाल्या सूरपारब्यांसारख्या लटकत झोक घेत. अशावेळी ब्राह्मणांचा वर्णव्यवस्थेचा उभा डोलारा पोकळ वाटायचा. बृहस्पतींनी एकदा त्या डोलाऱ्यावरून उडी टाकून आत्महत्या करायचाही प्रयत्न केला होता, पण प्रोग्राममधली आडवी जाळी इतकी भक्कम होती की, मूळपारंब्यावरच्या चौघांनी झोके घेता घेता त्यांना हवेतल्या हवेत उचललं होतं आणि अमृत पिल्याने त्यांना मरण येणार नाही हे ऐकवलं होतं. त्यानंतर आपल्या आसपासचा माहोल पाहून कितीही उदास वाटलं तरी बृहस्पतींनी आत्महत्येचा प्रयत्न केला नाही. कारण आपण अमृत पिणारा प्रोग्राम आहे हे त्यांना कळून चुकले होते. त्यांना कळून चुकले होते की, देव आणि मानव ह्यांच्यात फरक आहे. देवांना मृत्यू नसल्याने निदान पक्षी माणसाइतका वेगवान मृत्यू नसल्याने मुबलक काळ उपलब्ध होता. इतकेच नव्हे तर तो प्रचंड वेगवान होता. इतका की देव दहा पळात हजारोहातांचे अंतर सहज पार करायचे. माणसाला हे शक्य नव्हते. देवांचा अवकाश हा अत्यंत आकुंचित होता. देव कुठेही कधीही असू शकत. माणसांना हे शक्य नव्हते. देवांच्या ह्या अद्भूत शक्तीमुळे देवाची जीवनशैली सतत गतीमान असे. किंबहुना ही जीवनशैली एका अर्थाने गतीशैलीच होती. देवाचे ज्ञानही आडवे होते. त्याला मुळे नव्हती. देव सगळे जग देव आणि दानव असे विभागून बघू शकत. देव स्वतःची संख्या वाढवत तेहतीस कोटी, सहासष्ट कोटी असे सहज होतं. देवांच्या कित्येक कथांना सुरुवात नसे आणि शेवटही नसे. देव कायम सोमरस आणि सुखरस ह्यांच्यात डुंबत असत. देवांना आत्मा नव्हता. त्यामुळे त्यांना आत्मिक त्रास नसत. देवांच्या त्वचा तेजपुंज आणि रूप देखणे होते. त्यामुळे देवांनी भुरळ घालायचं ठरवलं की, त्यांच्यापासून वाचणे अशक्य होई. देव आकाराने कधी अतिशय मोठे, तर कधी फळात लपून बसण्याइतके छोटे होते. देवांना भाषा वश होती आणि ते स्वतःची जाहिरात करण्यात निपुण होते. देव स्वतः प्रतिकृती होते आणि तरीही त्यांना आपल्या प्रतिकृतीतून आणखी काही प्रतिकृती निर्माण करता येत. बृहस्पतींना देवांची ही ताकद माहीत होती. त्यामुळे आपण देवगुरू आहोत ह्याचा त्यांना अभिमानही वाटे. अपवाद फक्त युद्धांचे प्रसंग असत. एखादा श्रीधर देवांच्या ह्या भुलभुलैय्याला भुलून न जाता त्यांच्या अस्तित्वा-बद्दलच शंका घेई. त्यासाठी संघर्ष करायला तयार होई. अशावेळी बृहस्पतींना त्रास होई. त्यांनी असे अनेक राक्षस नष्ट होताना पाहिले होते. ह्यावेळीच त्यांना जरा विजयाबद्दल साशंकता वाटत होती. कारण श्रीधरने ते प्रोग्राम आहेत हे अचूक ओळखले होते. आतापर्यंतचे राक्षस त्यांना खरे समजतआणि पराभूत होत. इथे मात्र एक असा राक्षस होता जो त्यांना डिजीटल समजत होता आणि स्वतः सोबत देवांच्या इतकाच एलसायबोर्ग नावाचा एक तगडा प्रोग्राम घेऊन उतरला होता.

ही लढाई बृहस्पतींना त्यामुळेच जड जात होती. डिजीटलायझेशन म्हणजे स्पर्शाला वंचित करणे हे त्यांनाही माहीत होते; किंबहुना डिजीटलमध्ये तुम्हाला जे डिजीटल आहे ते पाहता येतं. त्याच्याशी बोलता येतं. त्याला ऐकता येतं. त्याला दाखवता येतं. फक्त एकच गोष्ट करता येत नाही ती म्हणजे स्पर्श! प्रत्यक्ष स्पर्श! इथेच एक अस्पृश्यता निर्माण होते. देवांना ही अस्पृश्यता अत्यंत आवश्यक वाटे. कारण त्यामुळेच ते देव खरेखुरे रहात. एकदा जर स्पर्शाची कसौटी लागली, तर आपण अस्तित्वातनाही आहोत हे सहज सगळ्यांना कळेल ह्याची त्यांना खात्री होती. त्यामुळेच देव अस्पृश्यतेला थांबवत नसत आणि स्वतःला कधीच कुठल्या माणसाचा स्पर्श करून घेत नसत. माणसे देवांच्या मूर्त्यांना स्पर्श करू शकत. प्रत्यक्ष देवांना त्यांना स्पर्श करता येत नसे. त्यामुळे श्रीधरचा अस्पृश्यतेवरचा हल्ला हा देवांवरचा हल्ला आहे हे ओळखून बृहस्पतींनी देवांना लढण्याचा आदेश दिला होता. देव लढत होते.

रिअल श्रीधर मात्र शांत होता. आपण जिथे आहोत तिथूनच देवमंडलाचा बराचसा कार्यक्रम ऑपरेट होतो असं त्याला आता जाणवायला लागलं होतं.ही जागा अस्पृश्य आहेही त्याला कळून चुकलं होतं. फक्त 'स्वर्ग' असं डिजीटल नाव देऊन तिला भासमान करण्यात आलंय हेही त्याच्या लक्षात यायला लागलं होतं. जर एलसायबोर्ग इथे पोहोचला तर हा स्वर्ग सहज नष्ट करता येईल आणि मग इथून निसटून आपणाला आपला धम्म सांगता येईल ह्याची त्याला कल्पना होती. इथून निसटण्यासाठी इथला सगळा कार्यक्रम कळणे आवश्यक होते; पण नेमके तेच कळत नव्हते. बुद्ध होणे आणि प्रोग्राम कळणे ह्या दोन भिन्न क्रिया आहेत हे आता त्याला उमजू लागलं. बुद्ध झालेल्या माणसाला सगळ्या प्रॅक्टिकल गोष्टींचं नॉलेज असतं हा गैरसमज करून घेणाऱ्यांविषयी त्याला आता कीव वाटू लागली होतो. ती कीज चाचपत होता; पण त्या सापडत नव्हत्या. कदाचित त्या इथे नसाव्यात तसे असेल तर एलसायबोर्ग जोपर्यंत सगळा प्रोग्राम उद्ध्वस्त करत नाही तोवर थांबण्याखेरीज पर्याय नव्हता. तो विचार करतानाच

श्रीधर इज डेड

ही घोषणा आठव्या स्वर्गात झाली आणि तो हसला. कारण ती एका अर्थाने खरी होती. कारण श्रीधर ह्या ज्ञात्याचा, कर्त्याचा, भोक्त्याचा खरोखरच मृत्यू झाला तेव्हाच तो बुद्ध झाला होता; किंबहुना अश्या प्रकारचा मृत्यू फक्त

बुद्धातच घडतो हे त्याला कळालं होतं. तरीही आपल्या मृत्यूची घोषणा केली जावी ह्याचे त्याला आश्चर्य वाटले. त्या घोषणेबरोबर सगळ्या अप्सरा धावत त्याच्यापाशी आल्या आणि तो जिवंत असल्याचे पाहून गोंधळल्या. त्यांच्या चेहऱ्यावरचा गोंधळ बघून श्रीधर म्हणाला, ''ही घोषणा एका अर्थाने सत्य आहे. माझ्यातल्या श्रीधरचा माझ्यातल्या 'मी श्रीधर आहे' ह्या अहंकाराचा, ह्या आत्म्याचा मृत्यू झालाय हे सत्य आहे. मात्र ही घोषणा करण्यामागे हे सत्य सांगण्याचा उद्देश असेल असेवाटत नाही. हे काहीतरी वेगळेच आहे; पण ते काय आहे आणि ते का आहे हे सांगणे ह्याक्षणी कठीण आहे. कदाचित देवांना मी बुद्ध झालोय हे सांगण्यापेक्षा श्रीधरचा मृत्यू झालाय असे सांगणे योग्य वाटले असेल. तुही काळजी करू नका. जा तुमची साधना करा.''

अप्सरा साधना करावयास निघून गेल्या. श्रीधर म्हणाला, ''माझ्याप्रमाणेच तुम्हालाही तुमचा मृत्यू ह्याच देही, ह्याच डोळा पहावयास मिळो.''

संस्कृती जितकी एकात्म तितकी कर्मठ. जितकी विश्लेषणात्मक व विखंडित तितकी सहिष्णु. त्यामुळेच जातसंस्कृती एकात्म म्हणून कर्मठ; पण धर्मसंस्कृती विखंडित म्हणून सहिष्णु. एलसायबोर्ग ला सगळीकडे विखंडीतता दिसत होती आणि तरीही अस्पृश्यतेबाबत सगळे देव एकमताचे एकात्म होते आणि त्यामुळेही कर्मठ दिसत होते. ह्या कर्मठतेला कसे मोडावे ह्याचा एलसायबोर्ग विचार करत असतानाच त्याच्या कानावर घोषणा आदळली.

श्रीधर इज डेड

जिथे स्वर्ग इतके रिकामे आहेत तिथे श्रीधर मरू कसा शकतो? त्याने डायस पाहिली श्रीधर तिथेच होता. म्हणजे निदान प्रेत तरी हलले नव्हते. प्रश्न होता श्रीधर मेला कसा? मेला तर बृहस्पतींनी तशी घोषणा का करावी? हा युद्धाचा अंत होता का? बृहस्पतींना युद्धाचा शेवट सुचवायचा आहे? की ही युद्धाची नवी सुरवात आहे? जर श्रीधरच मेला असेल तर आपण मग लढण्यात काय अर्थ आहे? इथून आपण आता निघून जावे का? काय करावे?

एलसायबोर्ग एकदम चिंताक्रांत झाला. आपण श्रीधरला वाचवू शकलो नाही ह्याचे त्याला अचानक खूप दुःख वाटायला लागले. त्याने उगाचच एक मेसेज आपल्या डेथ प्रोग्रामकडे पाठवला. हा प्रोग्राम तीनद्रोण नावाने ओळखला जाई. मेसज होता.

Is Shridhar dead ?

आपण शेवटी प्रश्नचिन्ह टाकलंय हे त्याच्या लक्षात आले नाही; पण त्या प्रश्नाने तीनद्रोण कामाला लागला. त्याला प्रथम श्रीधर मेला का ते तपासायचे होते आणि मेला तो श्रीधर खरा की खोटा हेही तपासायचे होते. त्याच्या सोबत ग्सुफ्रिया नावाची कार्यक्रमा होती. त्याला ती आवडायची; पण ह्या युद्धात त्यांना सायबोर्गने न वापरल्याने त्याला तिला भेटायची संधीच मिळाली नव्हती. दोघे सायबोर्गच्या लिंगातून बाहेर पडले. त्यांच्या प्रवासाने सायबोर्गला एकदम संगाचा फील आला. त्याचं सगळे अंग ताठ झाले. ते बाहेर पडल्यावर तो कित्येक वेळ आनंदाने स्तब्ध झाला.

त्याच्या स्तब्धतेमुळे बृहस्पती गोंधळले. हा राक्षस अचानक स्तब्ध व्हावा हा त्यांना विचित्र प्रकार वाटला. आपण दिलेल्या घोषणेमुळे हा हवालदिल झाला की काय ? तसे असेल तर त्याला मारण्याची ही चांगली संधी होती. त्यांनी देवांना त्याच्या पायावर हल्ले करण्याची आज्ञा दिली.

इकडे हवेत उडता उडता तीनद्रोण ग्सुफियाच्या जवळ आला. तो का जवळ आलाय हे तिच्या लक्षात आलं. ती म्हणाली, ''आत्ता नको. आधी आपले काम करूया....''

तो म्हणाला, ''पण मी तर ह्यासाठीच बाहेर पडलोय.''

ती म्हणाली, ''तुझा हेतू काहीही असला तरी जो हेतू तू सायबोर्गला सांगितलायस तो पूर्ण झाला पाहिजे. नाहीतर तो तुला नाहीसा करेल.''

तो म्हणाला, ''तो म्हातारा आता मला काय नाहीसा करणार? वय झालं त्याचं.

ती म्हणाली, ''त्याचं म्हणजेही आपलंही झालेच.''

तो म्हणाला, ''नाही आपण त्याची मुले आहोत. त्याला आत्ताच झालेली.''

ती म्हणाली, ''मुलं स्वतंत्र असतात?''

तो म्हणाला, ''होऊ.''

ती म्हणाली, ''शक्यच नाही आपण जोवर त्याच्याशी जोडले गेलोय तोवरच जिवंत राहू.''

पण तो ऐकेना. तेव्हा तिने कंटाळून त्याला हवे ते करू दिले आणि मग दोघेही झेपावले.

इकडे सायबोर्गला त्यांच्याकडून एकही मेसेज न आल्याने तो उदासला. त्याच्या पायावर हल्ला झाला तरी त्याने प्रतिकार केला नाही आणि देवांना त्याचा एक पाय कापण्यात यश आलं.

बृहस्पती ह्या यशानं खुश झाले. त्यांनी आपलं लक्ष्य दुसऱ्या पायाकडे वळवलं तर तिथे सगळे देव पडद्यावर दिसणारा तीनद्रोण आणि ग्सुफ्रिया यांचा संग पाहण्यात मग्न. त्यांना क्षणभर वाटले शाप द्यावा, पण शाप खरा होण्याची खात्री हल्ली वाटत नसल्यानं त्यांनी मेसेज पाठवला.

काय करताय?

त्या मेसेजमुळे देव जागे झाले; पण तोपर्यंत सायबोर्गही सावधान झाला. त्याने दोन गोळे फेकले. त्याबरोबर तिथल्या देवांचा फज्जा उडाला. आता हे युद्ध अस्तित्व टिकवण्याचे झाले. अस्पृश्यता नष्ट होईल, न होईल, पण आपण मॅक्झिमम एक्झीस्टंशियल रिसोर्स घेऊन माघार घ्यायला हवी. पण त्यानंतर काय? आधार घेऊनही एक दिवस मरणारच. मग मार्ग काय? श्रीधरच्या प्रेतात आपण डाऊनलोड झालो तर....श्रीधर जगला नाही तरी आपण जगू. ह्या शरीराचा वापर करून आपला प्रोग्राम जनेटिकली ट्रान्स्फर करत राहू; पण आपण प्रेतात उतरलो तर प्रेत जिवंत होईल? संग आणि संगणक ह्या दोनच संख्याशास्त्रीय पर्यायात विचार करणारे त्याचे सायबरमन ह्या विचाराने थरथरले. जर हे शक्य झाले तर.... कदाचित ह्या पृथ्वीवर आपणाला राज्य करता येईल. कारण ही पृथ्वी अजून प्रचंड मागासलेली आहे. आपल्या डिजीटल अस्तित्वाचं विश्लेषण करण्याची प्राथमिक पात्रताही इथल्या कुठल्या मानवात नाही. त्यामुळं आपण पिढ्यानुपिढ्या राज्य करू शकू. फक्त आपल्याला मानवस्त्रीशी शरीरसंबंध ठेवून तिला प्रेग्नंट ठेवता यायला हवं ते जमलं आणि आपल्याला मूलं झाली तर ह्या देवांची राजवट बंद आणि आपली सुरू. प्रश्न फक्त ह्या देवांचा आहे. ते आपल्या मार्गात आडवे आल्याशिवाय राहणार नाहीत.

एलसायबोर्गला नवीन विचाराने टवटवी आली. तुम्ही जेव्हा युद्धात दुसऱ्यासाठी लढता तेव्हा अशी टवटवी प्राप्त होत नाही; पण जेव्हा तुम्ही स्वतःसाठी लढता तेव्हा मात्र विलक्षण ताजे होता.

एलसायबोर्गने तीनद्रोणला सवांदलं. तीनद्रोण अडथळे पार करत होता. त्याला खरेतर एलसायबोर्गशी जोडले जाणे म्हणजे त्याच्या संगणकाच्या अखत्यारीत राहणंच वाटत होतं. पण इलाज नव्हता. ग्सुफिया मात्र स्वतंत्र होण्याच्या मूडमध्ये नव्हती. एकतर तीनद्रोणवर तिचा पूर्ण विश्वास नव्हता. दुसरी गोष्ट दोन पुरुषांच्या लढाईत बाईने कोण विजयी होतोय ह्यांची संयमाने वाट पाहावी ह्या सनातन शहापणावर तिचा विश्वास होता.

डिजीटल श्रीधर मात्र ह्या दोघांना आपल्याकडे येताना पाहून घाबरला. हे आपले प्रेत उचलायला आलेत की काय? तसे असेल तर आपण मेलोच. माणूस खरोखर कधी मरतो. जेव्हा त्याला जिवंत आहोत हेच जाणवत नाही तेव्हा? की जेव्हा तो जिवंत आहे हे त्याला जाणवत असते; पण इतर माणसांना तो मेलाय असे वाटते तेव्हा? की जेव्हा त्याला तो जिवंत आहे हे जाणवत असूनही तो मेलाय असं समजून जनावरं त्याच्या शरीराचा फज्जा उडवतात किंवा माणसे त्याला अधिकृतरीत्या जाळतात किंवा दफन करतात किंवा पाण्यात बुडवतात तेव्हा? माणूस कधी मरतो?

तीनद्रोण डिजीटल श्रीधरकडे जायला लागला; पण त्याला आता कामातच रस वाटेना. त्यापेक्षा एलसायबोर्गला आपण सायबरचोरी करून चकमा दिला तर....त्याला एलसायबोर्ग मगूर, हुकूमशाही वृत्तीचा, मुजोर, स्वतःची

जीवनशैली आपल्यावर लादणारा वाटायचा. एलसायबोर्गचा महाआकार ज्या अवाढव्य पद्धतीने त्याच्या भावाबंधूंना चिरडायचा त्याबद्दल त्याला खुन्नस होती. ती खुन्नस जागी झाली. साला हीच तर संधी आहे. तीच गमावली तर पुन्हा ती मिळेल न मिळेल. ग्सुफियाची साथ मिळणार का हा प्रश्न होता तो मात्र सोडवणं कठीण होतं.

डाईस जवळ आली तशी दोघांनी हालचालींची मंत्रमुग्ध करणारी चित्ताकर्षक जाळी विणायला सुरुवात केली. त्याचा इष्ट तो परिणाम झाला. देवांना वाटले हे देवच आहेत. गांधर्व आणि किन्नर कुळातले जे मनोरंजनासाठी आलेत. एका देवाने त्यांना ओरडून सांगितले, ''गांधर्वकोड!'' त्याबरोबर दोघांनी गांधर्वांचे फक्त देवांना माहीत असलेले पदन्यास करून दाखवले. त्यामुळे देवांचे ते गांधर्व आहेत ह्याबद्दल खात्री पटली. नृत्य संपले तसे दोघांनी डायसबॉल चढायला सुरवात केली. देव पुन्हा आपल्या कामाला लागले.

बृहस्पती ह्या दोघांच्यावर नजर ठेवून होते; पण गांधर्व कोडानंतर त्यांनीही दुर्लक्ष केले. देवांचा सगळा डाटा मंत्रमुग्ध झालाय हे लक्षात येताच तीनद्रोण हसला. ग्सुफिया हसली. त्यांचे निम्मे काम फत्ते झाले होते. ह्यापूर्वी सन्नी ग्रहावर त्यांनी एका महाकार्पोरेट कंपनीच्या विंडोला असेच हातोहात फसवले होते. त्यांची दुक्कल त्यामुळे सन्नीवर फार गाजली होती. खरेतर त्यांना अटकच होणार होती; पण ऐनवेळी एलसायबोर्गने हस्तक्षेपण करून ही अटक थांबवली होती आणि त्या दोघांना स्वतःला जोडून घेतले होते.

इकडे डिजीटल श्रीधर मात्र असहाय्यपणे हे सगळे राक्षसी जाळे अनुभवत आपण जिवंत आहोत की नाही ह्याचा असहाय्य विचार करत लटकला होता. त्याच्या हाताला आणि पायाला देण्यात आलेली टेक्नोग्रॅव्हीटी इतकी वजनदार होती की, त्याला विचार करण्याखेरीज फारशी हालचाल करता येत नव्हती. हा एक टेक्नोक्रूस होता आणि त्याला तो लटकला होता. सर्वात भीषण होती ती डायसची गती. त्या गतीला त्याचे शरीर ॲडजस्ट होत नव्हते आणि भरीस भर म्हणून डायसचा आणि डायसखालच्या स्वर्गाच्या प्रकाशयोजना पळापळाला बदलत होत्या. त्यामुळे एका गोष्टीला अमुक एक रंग आहे असे म्हणणेही अवघड जात होते. स्थिर रंगाचा अभाव डोळ्यांना भोवळ आणत होता आणि आपण जिवंत आहोत ह्याची खात्री वाटत नव्हती.

खरा श्रीधर मात्र बुद्धत्वात होता. त्याच्यासाठी रचले जात असलेले युद्धाचे सायबर ढीग आणि ढग ह्याविषयी तो अनभिज्ञ होता.

तीनद्रोण आणि ग्सुफियाचं डायसक्लायबिंग आता अधिकच जोशानं चाललं होतं. दोघांनाही त्यातून संभोग केल्याचा आनंद मिळत होता. त्यांच्या प्रत्येक हालचालीतून एक न्यूज निर्माण होत होती; मात्र, ती वाचण्यासाठी लागणारा निवांत वेळ युद्धात रममाण असणाऱ्यापैकी कुणालाच नव्हता.

जसजसा श्रीधर डिजीटल नजरेच्या टप्प्यात येऊ लागला तसा तीनद्रोण अधिकाधिक एक्स्टेन्शन फील करायला लागला. सगळी डायस ही आपल्या स्क्रीनचं एक्सटेन्शन असल्यासारखं त्याला वाटायला लागलं. हातातलं हत्यार हाताचं एक्स्टेन्शन वाटायला लागलं. युद्धातला व्हायोलंस स्वतःच्या आयडेयंटी क्रायसीसचा विस्तार वाटायला लागला.

एकाएकी त्याच्यापुढून एक घोडा निघून गेला आणि त्यापाठोपाठ एक कार! घोड्याचा पाठलाग करणारी कार! त्याला हसू आलं. मात्र त्या हास्यामुळेच त्याला तो भास होता हे कळालं. सन्नी ग्रहावर अनेक ठिकाणी मेंदूची नर्व्हस सिस्टीम संगणकाने रिप्लेस केली तेव्हा त्याला असाच भास झाला होता. प्रत्येकाचे दिवस असतात. एकेकाळी सन्नीवर नर्व्हस सिस्टीमने राज्य केलं होतं. ते दिवस आठवून तो नर्व्हस झाला. त्याच्या नर्व्हस होण्याने हात सैल पडला आणि तो सुटला. त्याला सांभाळण्यासाठी ग्सुफियाने हातोडी फेकली; पण त्या नादात तीही निसटली आणि दोघेही जिथून सुरवात केली होती तिथे पोहचले. नेमकी त्याचवेळी ग्सुफियाला हातोडी सापडली आणि तिने ती चिटकवली आणि दुसऱ्या हाताने तीनद्रोणला पकडलं. एकेकाळी अभिनेत्री असताना ती स्वतःचे स्टंट स्वतःच करायची. त्याचा फायदा झाला. त्या स्टंटमुळेच ती फियरलेस ग्सुफिया म्हणून सन्नीवर फेमस झाली होती.

खरेतर तिचे आयुष्य म्हणजे कल्पनेचा खेळखंडोबा होतं. मेकपवर प्रचंड विश्वास आणि फँटसीवर फॅन्टास्टिक भर. ह्यामुळे तिच्या शरीराचे भराव उठून दिसत. ती स्वतःला विभ्रमाचं बांधकाम समजे आणि अभिनयाला भ्रमभ्रमंती तिच्या संपूर्ण आयुष्यात तिला कधी भ्रम आणि सत्य यांच्यातला फरक कळत नसे. अभिनय करताना अनेकदा वेगवेगळ्या प्रकारच्या हॅटस ती वापरे. त्यामुळे तिला सन्नी लोक 'हटके' म्हणत तिचे अलंकार विशेषतः मेटॅलीक ज्युवेलरी ती अशा काही ऐटीने मिरवत नेई की ते तिच्या शरीराचे अवयव वाटत. तिच्या व्हिडिओत स्त्रियांना लिंग आणि पुरुषांना स्तन फुटत. ती बायसेक्सुअल असल्याने एकाच वेळी स्त्री आणि पुरुष अशा दोघांशी ती सेक्स करत असे. ती एका अशा परंपरेतून आली होती जी अंधार प्रकाश स्त्रीपुरुष ह्यांच्यात फरक मानत नसे. ही परंपरा स्वतःला फार बंडखोर समजे; पण प्रत्यक्षात ती सन्नीवरच्या कार्पोरेट कल्चरने विरेचनासाठी योजलेली खास युक्ती होती. बंडखोर लोकांना तिचा अभिनय पाहून आपण बंड केल्याचा भ्रम होई आणि त्यांचा बंडाचा कंड थंड होई.

नंतर एकदा तर एका शूटिंगच्या वेळी ती एकाएकी पूर्ण निखळली आणि तिचे तुकडे तुकडे झाले होते तेव्हा डिरेक्टरने तिच्या तुकड्यांना शूट करून 'ग्सुफियाचे विघटन' नावाचा एक आल्बम तयार केला होता आणि तो रेकॉर्डब्रेक ठरला होता. कुठलाच शॉट स्थिर होऊ द्यायचा नाही ह्या एकाच तंत्राने शूट झालेला तो व्हिडिओ 'सन्नी ग्रहाचे आत्मचरित्र' म्हणूनही गाजला होता. तो तिचा शेवटचा व्हिडिओ होता आणि तिने पुन्हा शूट करू नये म्हणून तिचे सगळे विघटन एका म्युझियममध्ये ठेवण्यात आले होते.

एक दिवस तीनद्रोण केवळ प्रस्थापितांना शह द्यायला म्हणून ह्या म्युझियममध्ये उतरला आणि त्याने तिचे विघटन चोरले. ग्रहभर गोंधळ माजला; पण तीनद्रोण कुणाला सापडला नाही. त्याने ह्या विघटनापासून एक बाहुली बनवली आणि तो रोज तिच्याशी खेळू लागला. मग त्याने त्या बाहुलीतून रोज एक नवी बाहुली निर्माण करायला सुरुवात केली. ग्सुफियालाही रोज नव्या नव्या रूपात मजा यायची; पण मग जे होते तेच झाले. ती तीनद्रोणच्या प्रेमात पडली आणि मला वयात आण म्हणून त्याच्या मागे लागली. तीनद्रोण बावचळला. जिच्याशी बाहुली म्हणून खेळलो तिला एकदम मोठी बनवणे हे नर्व्हस दृष्ट्रा व्हायरसी होतं. त्यात स्वतःचा जीव जाण्याची भीती होती. पण एकदिवस हे करून आपण प्रस्थपिताच्या बाहुल्यांना शह देऊ शकतो असे वाटून त्याने ग्सुफियाला वयात आणलं त्याच्याबरोबर राहून ग्सुफियाही डाटे, डिटेल्स, डील्स, डॉल्स , डेटॉल्स, डॅटलस, डॉटकॉम्स, डॉटस, डिट्टोज, डिटेक्टीवज चोरायला शिकली अभिनयापेक्षा चोरीत जास्त थ्रील आहे असं तिला वाटायला लागलं हे जग आपल्याला समजते की नाही ह्या प्रश्नाने तिला येणारा व्याकूळपणा ह्या जगात चोरी करुन ह्या जगाला चकमा कसा द्यायचा ह्या थराराने नाहीसा झाला जगं कस आहे तर ढोंगी मग इथे ढोंगीच झालेले बरे म्हणून ती ढोंगी व्हायची सत्य काय आहे ह्यापेक्षा कुठले सत्य आपल्याला जास्त उपयोगी आहे हे पहायला आणि अशा उपयुक्त सत्याची निवड करायला ती शिकली आत्ताही हा डायसवरचा श्रीधर सत्य आहे की नाही हा प्रश्न तिला सतावत नव्हता त्यापेक्षा हा श्रीधर किती उपयुक्त आहे हे तिच्या दृष्टीने फार महत्त्वाचे होते ती असा विचार करत असतानाच तीनद्रोण सुटला. त्याला पकडण्यासाठी ती उलटली त्याच्यासकट खाली आली.

मात्र ह्याचा अनपेक्षित परिणाम बृहस्पती च्यावर झाला अचानकपणे गंधर्व कुळातले जोडपे असे डायसक्लायम्बीग करताना फोसळणे त्याना विचित्र वाटले हा एक चुकीचा मेसेज होता आणि तो वाचणे गरजेचे होते

समोरचा पडदा त्या पडद्यातील ॲक्शन त्या ॲक्शनमधील शरीर त्या शरीरातील मन त्या मनातील भाषा त्या भाषेतील विचार त्या विचारातील तृष्णा. त्यांनी वाचन सुरु केले

ते स्वतः च्या वाचनाला भेदी वाचन म्हणत किंबहुना त्यामुळेच ते मिडिया मास्टर झाले होते आणि देवांचे गुरुही म्हणून टिकून होते

तृष्णेनंतर जो स्वयंभू प्रकाश असतो त्या प्रकाशात विचार वाचण्यात ते



Scanned with CamScanner

निपूण होते सगळ्या विचारांचा अंत ह्या प्रकाशात होतो असे त्यांना वाटे .

देवांनी जेव्हा ह्या पृथ्वीवर पाऊल टाकले तेव्हा लोक फक्त बोलत मग देवांनी त्यांना लिहायला शिकवले त्याबरोबर बोली बरोबर असणारी शरीरांगे नाहीशी झाली आणि पृथ्वीवरील लोक निरंद्रीय लेखन वाचायला शिकले लिहायला शिकले मग देवांनी आकाशवाणी आणली ही आकाशवाणी बोली सारखी होती पण बोली नव्हती कारण आकाशवाणीही लेखनासारखी निरंद्रीय होती. देवानी मग काही लोकांच्या डोळ्यात बदल घडवून ढग, आकाश, पाणी पडद्यासारखे वापरुन दूरचित्रवाणी निर्माण केली लोक जे ही दूरचित्रवाणी वाचूपाहू शकत होते त्यांना 'संजय' (सन्नी +जय)समजू लागले हे संजय देवांचे मेसेज बघून इतरांपुढे त्यांचे चित्रण केवळबोलीव्दारे उभे करत.

लोक देवांच्या प्रेमात पडण्याचे सर्वात मोठे कारण देवांनी निर्माण केलेला मिडिया होता ह्या मिडियामुळे तर अनेक संजय मिडियमच्या इतके प्रेमात पडत की मिडियम आणि रिअॅलीटी ह्यांच्यातला फरक त्यांना कळत नसे आणि मग मिडियमला रिअॅलीटी समजून ते देवांचे गुलाम होत. एका अर्थाने ही त्यांच्या आत्म्याची आत्महत्या असे पण त्याना ती कळत नसे देवही अशी मिडियटीक आत्महत्या एन्जॉय करत.

आत्ताही जोडपे कोसळताना बृहस्पतींना वाटले ही त्या जोडप्याची आत्महत्या आहे. पण नंतर त्यांनी ज्या आकांताने एकमेकाला आधार दिला तो बघताना त्यांच्या लक्षात आले की ह्या हालचाली गंधर्वांच्या किंवा अप्सरेच्या नाहीत हे काहीतरी वेगळं कुळ आहे त्यांनी त्याच्या निरीक्षणाचा फोकस वाढवला. ते त्यांच्या बॉडीत उतरले आणि दचकले ही शरीरे पृथ्वीवरची नव्हती म्हणजे... म्हणजे एलसायबोर्गने पाठवलेले सैनिक... हा गनिमि कावा? ... ते त्या विचाराने थरारले आपण समजतो त्याहून शत्रु चाणाक्ष आहे ... त्यांनी तावडतोब देवांना त्यांना प्रत्यक्ष नष्ट करण्याची ऑर्डर दिली.

बृहस्पतीच्या आज्ञेचे सूक्ष्म तरंग एलसायबोर्गवर आदळले तो तीनद्रोण व ग्सुफियाला वाचवावयास पुढे सरकला त्याच्या आवाजाने आफ्रिकेत लढणारा इंद्र एकदम जागा झाला तर त्याचा मुलगा कृष्णइंद्र भ्रमित झाला ह्या संधीचा फायदा इंद्राला झाला तो थेट डायसवर आला त्याच्यामागोमाग कृष्णइंद्र डायसवर पोहचला. एलसायबोर्गचे अनेक पाय देवांना थेट कापू लागले सगळे युध्द जणू डायसवर गोळा झाले. ह्या युध्दाने पृथ्वी डळमळली स्वर्ग हादरले आणि अमृत गुप्त झाले त्यामुळे देव निकराने लढू लागले.

तीन द्रोण आणि ग्सुफियाला कळून चुकले की ही आता अस्तित्वाची लढाई आहे त्यांनी एल सायबोर्गचे लिंगपडदे कापले त्याबरोबर त्यातून करोडोंच्या संख्येने त्यांचे क्लोनस बाहेर पडले शुक्राणू ते क्लोन असा एका क्षणात झालेला प्रवास पाहून बृहस्पती अक्षरश: दिपून गेले हे अद्भूत त्यांनी पूर्वी कधीच पाहिले नव्हते त्यांनी आपले ब्रम्हास्त्र एलसायबोर्गच्या लिंगावर फेकले त्याबरोबर क्लोनस निर्माण करणारा तो कारखाना जळाला पण त्यामुळे त्वेषाने एलसाबोर्गने बृहस्पतीच्यांवर हल्ला चढवला. क्लोनस आणि देव ह्यांच्या लढाईत दोन्ही बाजूंनी वीर मरू लागले हे महामीडीया युद्ध होते.

चौदा दिवस युद्ध सुरू राहिले पंधराव्या दिवशी एलसायबोर्गला बृहस्पतींची मेसेज निर्माण करणारी कळ सापडली त्याने ती चावून चावून मोडून काढली त्याबरोबर देवांची इंटरकनेक्टीवीटीच संपली पहिल्यांदाच इंद्र डीसकनेक्ट झाला आणि कृष्णइंद्राकडून मारला गेला पण इंद्र मरताच इंद्राच्या कनेक्टीवीटीतून जन्मलेला डार्क इंद्रही मरू लागला. आपला प्राण आपल्या बापात लपवून ठेवला गेला होता हे त्याला मरताना जेव्हा कळले तेव्हा तो म्हणाला - ''मीडीया इज द हेल''

बृहस्पतींनीही मरताना शेवटचे माध्यमास्त्र एलसायबोर्गवर फेकले त्याबरोबर तो विघटीत होऊ लागला. दोघांचीही इंटरकनेक्टीवीटी संपल्याने शेवटी करोडो देव आणि करोडो क्लोन डायसार्थी पडले.

ग्सुफिया मरताना तीन द्रोणाला म्हणाली, ''कधीतरी प्रत्येकाला मरावच लागतं मग तो माणूस असो की मशीन.''

तीन द्रोण मरताना ग्सुफियाला म्हणाला, ''मला तुझ्यापासून मूल हव होत'' पण ते ग्सुफियाला ऐकू येण्याआधीच ती वितळून गेली. तीन द्रोण दु:खाने विरघळला डायसवरची प्रेते पडून पडून सगळे स्वर्ग बेचिराख झाले काहीच शिल्लक उरले नाही.

आठव्या स्वर्गातले सगळे अडथळे कोसळले त्यातून श्रीधर आपल्या आसरासह बाहेर पडला तर बाहेर ब्राह्मण उभे होते. श्रीधर बुद्ध असला तरी शेवटी माणूस होता. त्याला ब्राह्मणांनी धम्म किंवा मरण असा चॉईस दिला त्याने धम्म निवडला. ब्राह्मणांनी त्याला धर्मविरोधी ठरवून हत्तीच्या पायाखाली दिले. मरताना श्रीधर म्हणाला, ''मी कधीच मेलो आता तुम्ही जे मारताय तेही शरीर आहे नश्वर आणि नष्ट होणारे''

इकडे एलसायबोर्ग मरताना सर्वस्व पणाला लावून डीजीटल श्रीधरपाशी पोहचला तर त्याच्या डोळ्याच्या जागी खाचा पायाच्या जागी टाचा आणि जिभेच्या जागी वाचा शिल्लक होती. त्याचे डोके म्हणजे मडके झाले होते आणि हात सडके तरीही मरता मरता एलसायबोर्ग त्या शरीरात डाऊनलोड झाला आणि कोमात गेला.

फांद्याचं नॅरेशन संपलं. मेगा सुपर कम्प्युटरने फांद्यात एक दीर्घ पॉज घेतला मग तो थेट म्हणाला, ''तर हे श्रीधरा, ज्या शरीरात एलसायबोर्ग डाऊनलोड झाला व कोमात गेला तो तू आहेस. त्या महामिडीयायुध्दामुळेच तुझे शरीर असे झाले आहे. आणखी चोवीस तासांनी तू नीट होशील आणि मीरा रोड भायंदरमध्ये पुढे बिझनेस करणाऱ्या एका बिल्डरच्या घरात तुझा जन्म होईल, तुझे जन्म शहर कोल्हापूर असेल आणि मग स्थलांतर केल्याने तू मीरा रोड भायंदरला येशील तिथेच तुझी भेट नीरजा भट नावाच्या अभिनेत्रीशी होईल आणि मग एका फ्री सेक्स झोनला तू जोडला जाशील ह्याच झोनमध्ये रिअल श्रीधरला भेटलेल्या सर्व अप्सरा तुला विसाव्या शतकात भेटतील आणि तू त्यांच्याशी पुन्हा रत होशील.. जा... तोवर हे अस्तित्व सोस पुन्हा जन्मताना तुझ्या आईला फार प्रसवकळा सोसाव्या लागणार नाहीत असा आशिर्वाद मी देतो.''

एवढं बोलून मेगॅ सुपर कम्प्युटर थबकला
श्रीधरनं फांद्यांना पाहिलं
श्रीधरनं स्वत:ला पाहिलं
त्याच्या विश्वास बसला नाही
पण त्याने विश्वास ठेवला.

त्याने ठेवलेल्या ह्या विश्वासामुळेच तो पुढे कोल्हापुरात जन्मला आणि कवी झाला. १९८७ साली त्याने एक कलाकृती लिहायला घेतली जिचे नाव होते-

''आत्मचरित्रातले काल्पनिक क्षण' आणि तिच्या सुरवातीला होती-
''कोल्हापुरी चप्पल''

**(खण्ड तीन २००५ समाप्त)**

# स्वगत : ज्याममज्या मन्याजोशी

- सलील वाघ

गेल्या सहाएक महिन्यांत हेमंत दिवटेच्या 'अभिधानंतर'नी एकमागोमाग एक अशा दमदार कवितांच्या पुस्तकांचा एक गड्ड्याझब्बूच मराठी साहित्यविश्वाला दिलेला आहे. त्यातलाच एक ताजा धमाका म्हणजे मन्या जोशीचा ज्याम मज्या हा संग्रह. वर्जेश सोलंकी ह्या अभिधानंतरच्या पहिल्या कवीने सुरू केलेली, कवी आणि कवितेबाबतच्या अपेक्षा उंचावण्याची परंपरा निर्विवादपणे पुढे नेणारा हा संग्रह आहे. इंग्रजीत ज्याला पॅलिनड्रोम (Palindrome) म्हणतात, म्हणजे - तो कवी डालडा विकतो, रामाला भाला मारा, ती होडी जाडी होती वगैरेसारख्या द्विदिश वाक्यापासूनच- 'ज्याम मज्या' ह्या शीर्षकापासूनच ह्या संग्रहाची मजा सुरू होते. दिल्ली किंवा कलकत्तावगैरे ठिकाणी प्रेक्षणीय स्थळेबिळे बघायला गेल्यावर तिथे तांदळाच्या दाण्यावर बारीक बारीक अक्षरांत नाव वगैरे लिहून देणारे कारीगर आढळतात. मनोजच्या कविता वाचतानाही आपल्याला असेच तांदळावरचे कोरीव नक्षीकाम पाहिल्याचा आनंद मिळतो. मनोज हा अरूण कोलटकरांच्या तोडीचा कुशल भाषागीर आहे. तो स्वत: एक ओरिजनल कवी असला तरी त्याच्या कवितेतून कोलटकर आणि सारंग दोघेही इतके ऐकू येतात की 'ज्याम मज्या' हा संग्रह 'अभिधा'ने न काढता अशोक शहाणेंनी 'प्रास'तर्फे *'अरूण कोलटकरच्या काही अप्रकाशित कविता'* अशा नावाने काढला असता तरी वरवर वाचणाऱ्या कुणाला संशयही आला नसता की हा मनोजचा संग्रह आहे की अरूणचा ? कोलटकर-सारंगाशी इतकी शैलीशास्त्रीय जवळीक असल्यावर कुणालाही मनोज हा अनुकरणात अडकलेला कवी आहे की काय असा सहजच संशय येईल. त्या संशयाला छेद देणारी गुणवत्ता मनोजकडे असल्याने तो ह्या पर्जन्यछायेच्या पलिकडच्या गावात पोचू शकतो. नवनियतकालिकांच्या पिढीत, समाजाच्या नीतीमत्तेबद्दल बोलणाऱ्या श्रीधर तिळवेप्रमाणे मनोजही समाजाच्या नैतिक अवकाशातच उमटतो. मनोज हा नैतिकतेबद्दल बोलत बोलत अत्यंत आखीव अवकाशाच्या सीमारेषेत भाषा कोरतो. त्याच्या त्याच्या संदर्भविश्वाचं एक छोटसं टुमदार गाव आहे. त्या गावातून तो आपल्याला एक राईड मारून आणतो. कुशल वैमानिकाप्रमाणे किंवा चालकाप्रमाणे दोन्ही हात सोडून भाषेची गाडी चालवणे, एका चाकावर गाडी फिरवणे, शार्प यू टर्न घेणे, गाडी गोल गोल फिरवणे, उडवणे, आगीतून जंप मारणे, पाण्यातून नेणे, चालत्या गाडीवर झोपणे वगैरे चित्तथरारक कवायती आणि श्वास रोखायला लावणाऱ्या कसरती तो करतो. श्रीधर तिळवे किंवा मंगेश काळे हे जसे भाषेतले कुस्तीगीर आहेत तसा मनोज हा भाषेचा कसरतपटू आहे. कसतरपटू हा थोडासा अवमूल्यन झालेला शब्द आहे, पण भाषेचं कौशल्य अंगी असणं आणि समजूनउमजून अक्कलहुशारीने राजीखुशीने भाषा वापरणं हा आजकालच्या मराठीत अत्यंत दुर्मिळ होत चाललेला गुण मनोजच्याकडे असल्याने त्याच्या भाषिक प्रभूत्वाच्या प्रयोगाला चांगल्या अर्थाने कसरत शब्द वापरायला काहीच हरकत नाही. ती साधीसुधी कसरत नसून तारेवरची कसरत आहे. इतक्या सात्विकपणे आणि सोज्वळपणे भाषा वळवणारा कोणीही कवी आज आपल्या पिढीत नाही. त्याच्या सोज्वळतेने त्याच्याच पिढीतल्या मनोज सुरेंद्र पाठकच्या कवितेची आश्चर्यकारकरित्या आठवण येते. प्रमाणभाषेत आक्षेपार्ह ठरतील असे अनेक शब्द त्याच्या कवितेत अलगद येतात. उदाहरणार्थ, गांड हा शब्द एकंदर पुस्तकात १२ ते १५ वेळा आलेला आहे. पण मनोज ज्या पद्धतीने त्याचं पोझिशनिंग करतो त्यामुळं तो गैर न वाटता त्याला एक गोडवा येतो. त्याच्या भाषेत एक प्रकारचा प्रसन्न कैफ आणि मार्दव आहे. कित्येक गोष्टी बोलण्या-न बोलण्याच्या सीमारेषेवर तो सोडून येतो. शब्दांची चणचण त्याला जाणवते आणि भाषेची महागाई तो जाणतो त्यामुळं तो भाषा वाया घालवत नाही किंवा हिंदकळून सांडू देत नाही. अभ्यासक्रम आणि जीवन यांच्यातल्या पेचस्थानी त्याच्या कवितांचं केंद्र आहे. अभ्यासक्रमातल्या धारणा आणि समक्ष जीवनातल्या धारणा यांच्यातल्या विपरित नात्यांकडे तो कटाक्ष टाकतो. तो समाजाच्या धारणांबद्दल बोलतो मूल्यांबद्दल नाही. तो मूल्यांपर्यंत पोचत नाही. त्याने धारणांवरच आपला झोत केंद्रित केलेला आहे. अनेक मोह टाळणारी आणि विस्ताराचं बंधन न मानणारी, जागोजागी जागी राहणारी आणि पदोपदी विस्तार आखडता घेणारी त्याची कविता आहे. मनोज कवितेतल्या कवितेत अनेक डेडऍंड पाळतो आणि आपल्यालाही दाखवतो. तरीही त्या डेडऍंडमुळं त्याची लय खुंटत नाही, कविता संपत नाही किंवा भाषेच्या प्रवाहात व्यत्यय येत नाही. त्याची कविता ही भाषेच्या कॅरिकेचर्सची एक मालिका आहे. हेमंत दिवटे, वर्जेश सोळंकी, संजीव खांडेकर यांच्याप्रमाणे तो कॉस्मोमराठी भाषेत बोलतो. त्याच्यापाशी भाषेचा तल्लखपणा आहे. तो असाधारण आहे. आशयद्रव्याचं कवितेत कन्व्हर्जन करण्यासाठी लागणारी उचित समजही त्याच्याकडे आहे. धारणांकडून मूल्यांकडे सरकण्याची जोखीम जर त्याने पत्कारली तर त्याच्या कवितेला कुठलाच धोका नाही. अन्यथा साठोत्तरीवाल्यांप्रमाणे त्याची कविता अल्पजीवी आणि आतून पोकळ व्हायची भीती आहे.

# शब्दवेल प्रकाशनाची 'लक्षवेधी' पुस्तके



**टीकाहरण : श्रीधर तिळवे** (पृष्ठे ४१०, किंमत : रु. ३००/-)

विसाव्या शतकात निर्माण झालेल्या मूलभूत मराठी संहितात 'टीकाहरण' ही संहिता सर्वार्थाने वेगळी आहे. साहित्यशास्त्र, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र यांच्यात आधुनिकतेने निर्माण केलेले भेद ही संहिता पुसून टाकते. ती कुठलेही केंद्र निर्माण करत नाही किंवा ॲकॅडमिक आकारही धारण करत नाही. भालचंद्र नेमाडे यांनी मांडलेल्या देशीवादाचे खंडन करून ती नेमाडे यांच्या देशीवादाविरोधात 'अवकाशवाद', आदीलेखकाविरोधात 'आध्यात्मिक लेखक', नैतिकतेविरोधात 'दर्शनता' अशा नवीन संकल्पना मंडित करते. स्वतःच्या मुळापासून वैश्विकीकरणाच्या फांद्यांपर्यंत एका विशाल संस्कृतीला सामोऱ्या जाणाऱ्या नव्या पिढीचे मनोगत जर कुणाला तपासायचे असेल तर ही संहिता वाचण्याशिवाय पर्याय नाही.



**स्त्रीवाहिनी : श्रीधर तिळवे** (पृष्ठे १४४, किंमत : रु. १००/-)

'स्त्रीवाहिनी' ही एका पुरुषाने स्त्रीच्या भूमिकेतून लिहिलेली कविता आहे. महानगरातील समकालीन स्त्रीच्या विविध रूपांचा आणि पर्यायाने स्त्रीत्त्वाचा शोध, हा या कवितेचा विषय. एकीकडे पारंपरिक कुटुंबव्यवस्थेशी डळमळीत होऊ लागलेलं तिचं नातं आणि दुसरीकडे विविध महानगरी व्यवसायात वावरताना विस्तारलेला, विस्तारणारा तिचा पैस असा मोठा पट या कवितेत उभा राहतो. यातली स्त्री आपल्या शरीराबद्दलच्या न्यूनगंडातून-भयगंडातून मुक्त झालेली आणि लैंगिक संवेदनांना मोकळेपणाने व्यक्त करणारी आहे. स्त्रीच्या आत्मविस्ताराची ही कविता आहे आणि एका पुरुषाने ती लिहावी, यात मराठी कवितेचा आपसुकच विकास झाला आहे. – प्रा. अभिजीत देशपांडे




**पार्टी : सखा कलाल** (पृष्ठे ७३, किंमत : रु. ६०/-)

'पार्टी हा कलालांचा ताजा लेखसंग्रह. यापूर्वीचे त्यांचे 'ढग' आणि 'सांज' हे दोन कथासंग्रह गाजले. 'ढग'ला महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार लाभला. तर 'सांज'ला शिवाजी विद्यापीठात क्रमिक पुस्तकाचा दर्जा मिळाला. कलालांचं लेखन त्या उप्परही सुरू होतंच. विविध नियतकालिकांतून कलालांनी लेख लिहिले. त्या लेखांचा संग्रह म्हणजे 'पार्टी'. लेखनातला नितळ आत्मपरभाव आणि कलालांची घटना-प्रसंगांच्या निवेदनाची समर्थ शैली हळूवार बोचकारे घेत वास्तवाचे भान देत जाते, संस्कारांचं दर्शन घडवित जाते आणि जगण्याचा वेगळा अर्थ स्पष्ट करते. हे वाचत असताना अंतर्मुख व्हायला होतं. एक चांगला, विचारगर्भ लेखसंग्रह वाचल्याचा आनंद 'पार्टी' देत राहतो. – दै. लोकसत्ता




**डेकॅथलॉन : श्रीधर तिळवे** (पृष्ठे ३०४, किंमत : रु. २००/-)

श्रीधर तिळवे हे नव्वदोत्तरीतील मराठीतील एक महत्त्वाचे कवी आहेत. १९८२ ते १९८७ ह्या दरम्यान त्यांनी लिहिलेल्या त्यांच्या कवितांचा 'डेकॅथलॉन' हा संग्रह आहे. गझलेपासून सुरू होणारा हा संग्रह मरणावलीत स्वच्छंदता वृत्ती प्रकट करतो. अफवा ह्या विभागातील कविता परिवर्तनवादी वृत्ती प्रकट करतात. गाथा हा विभाग आध्यात्मिक अनुभवाची सृष्टी उभा करतो तर युरेका विभागातील कवितांतून विचारप्रणालीचा मृत्यू झाल्यावर स्थितीशील पक्षात गतिशील होणाऱ्या कार्यकर्त्यांची घुसमट व्यक्त होते. अशा दहा प्रकारात यातील कविता विभागल्या आहेत. संत तुकाराम व नामदेव ढसाळ ह्यांच्यानंतर इतक्या व्यापक अवकाशाला सामोरी जाणारी ही मराठीतील एक अवकाशसमृद्ध कविता आहे.

**शब्दवेल प्रकाशन**
१३०३, अे, राजघाट रोड, कोल्हापूर - ४१६ ०१२. दूरध्वनी : ०२३१ - २६२६७६५